# DE MORGAN'S

## ELEMENTS OF ALGEBRA:

TRANSLATED INTO THE MARATHI LANGUAGE

BY

*COLONEL GEORGE RITSO JERVIS,*

CHIEF ENGINEER BOMBAY PRESIDENCY,

*Assisted*

BY




*VISHNOO SOONDER CHUTRAY,*

*GUNGADHUR SHASTRI PHUDKAY,*

AND

*GOVIND GUNGADHUR PHUDKAY.*

---

**Bombay.**

*APRIL,*

1848.

# ड मार्गन याचा

# बीजगणित मूळपीठिका

यांचें मराठी भाषांतर

## कारनेल जार्ज रिट्सो जर्विस साहेब

मुंबईखात्याचे चीफ इंजनेर

यांणी

## विष्णु सुंदर छत्रे, गंगाधर शास्त्री फडके
आणि
## गोविंद गंगाधर फडके

यांचा साहाय्यानें केलें

मुकाम मुंबई

माहे एप्रिल सन १८४८

TO

THE HONORABLE GEORGE RUSSELL CLERK,

GOVERNOR OF BOMBAY,

One of the most eminent of those Statesmen who have laboured in many ways, and with conspicuous success, for the mental and moral improvement of the Natives of Hindoostan; and who considers that the introduction into India of European knowledge and modern science, by translation from the languages of Europe into the languages of the East, is the true basis on which the Education of the mass of the Native population should be founded; this translation into Mahrathi of Professor De Morgan's pre-eminently lucid treatise on the Elements of Algebra, is, with sentiments of unfeigned admiration and regard, dedicated, by his most obedient humble servant

GEORGE RITSO JERVIS.

*Bombay, 15th April 1848.*

Vinayak Bapu Gokhale

U52eu

# बीजगणित

## मूळपीठिका

बुद्धि पाजवून तीक्ष्ण केली असतां, केवढा लाभ होईल. हें सांगत फिरण्याचें प्रयोजन नाहीं, कांकीं, तो लाभ बहुत मोठा आहे, असें सर्व लोक कबूल करितात. कोण एखादा मूर्ख मनुष्य आपल्ये मनांत समजेल, कीं मी फार शाहाणा होईन, परंतु जो माणूस, मी अतिशाहाणा होईन, हें भय, जितकें जितकें धरितो, तितका तितका तो शाहाणपणापासून दूर रहातो. सारांश हाच, कीं गणितविद्येपासून लाभ होतो, असें पुष्कळ लोक मानितात; परंतु तो लाभ संपादायासाठीं शिकण्यास राजी, असें थोडे आढळतात. गणितविद्येस बहुत लोक वाखाणितात, परंतु व्यापार उदीम, अशी हलकें कामाचे गरजे खेरीज, या विद्येस शिकणारे थोडे. अशा कामांत लोभानें प्रवासाचे श्रम घेण्यास ही, ते राजी होतात. अशा लोकांचा उपयोगासाठीं गणिताचा पहिला भाग तयार केला. परंतु हा दुसरा भाग पहिल्या भागापेक्षां किती उत्तम आहे, हें जर ते जाणतील, तर ते याजवर जो वेळ घालविला, तो फुकट गेला, असें कधीं ही मानणार नाहीं. इतकेंच केवळ नाहीं, दुसऱ्या विद्यांचा अभ्यासाविषयीं उपयोगी पडे, अशी याविद्येंत निपुणता प्राप्त होईपर्यंत, आपला वेळ चागला गेला, असें ही ते मानणार नाहीं.

ज्ञानप्राप्ती स्वकष्टानें आणि स्वविचारानें होत्ये. दुसऱ्याचे सांगण्यावरून, केवळ पाठ करणें, हा ज्ञान प्राप्तीचा उपाय नव्हे. जें काहीं करायाचें, त्याचें कारण सांगण्याची अवश्य संवय केली पाहिजे. अशी संवय करण्यास, जरी पहिल्यानें अवघड वाटतें, तथापि ती अभ्यासानें सोपी होत्ये. आणि एकदां संवय झाली, म्हणजे, ती कधीं सुटत नाहीं.

मुंबई

इश्वीसन् १८४७

# बीजगणितमूळपीठिका.

---

## प्रवेशक.

जो कोणी बीजगणित शिकायास इच्छील, त्याला अगोधर अंकगणिताची चांगली माहीत असावी, आणि तो खचीत व्यवहारी आणि दशांश अपूर्णांकांत पक्का जाणता असावा. एवढें ज्ञान नसेल तर हेंच बरें, कीं त्याणें आरंभीं तें शिकून घ्यावें, कांकीं त्या शिवाय बीजगणिताचें संपादन करायास दुसरा काहीं सुगम मार्ग नाहीं.

अंकगणिताचीं कामें, चिन्हानीं होतात. अंक ह्मणजे भलत्ये परिमाणाचें चिन्ह आहे; तें परिमाण कोणत्ये जातीचें आहे, तें तो अंक दाखवीत नाहीं. जर कोणी मनुष्य आपल्येपाशीं मेंढरें किती आहेत, त्यांची गणना कळायास तो ती खड्यानीं करितो, तेव्हां ते खडे त्या मेंढ्रांचें संख्याचिन्ह आहेत. ही रीति फार लांब आणि श्रमाची आहे, यास्तव हल्लीं, अंकांची संख्या जाणायासाठीं, कागदावर अनेक तऱ्हेचीं चिन्हें करितात; आणि जेव्हां १ अशा चिन्हाचा अर्थाचा नेम ठरविला, तेव्हां त्यावरून दुसऱ्या प्रत्येक चिन्हाचा अर्थ ठरविला जाईल. जेव्हां लांबीविषयीं विचार करितों, तेव्हां, इच्छेप्रमाणें, भलती कांहीं लांबी घेऊन, तीस एक ह्मणतों. व्यवहारांत तो एक अनेक वस्तूंचा मागें विशेषण रूपानें लागतो; जसें एक हात, एक कोस; परंतु अंकगणितामध्यें त्या एकानें गणना होत्ये, तेव्हां तो नुसता १ आहे. आतां + या चिन्हास वहिवाटींत आणिलें, आणि असें मानिलें कीं जेव्हां दोन अंकांमध्यें + हें चिन्ह ठेविलें, तर असें जाणावें, कीं त्या दोन परिमाणाची बेरीज घेण्याचें चिन्ह आहे. जसें, जर

१ हें लांबीचें चिन्ह आहे —

१ + १ हें ही लांबीचें चिन्ह आहे — —

१+१ याचें संक्षेपानें याप्रमाणें चिन्ह घेतों (२); ह्मणजे हें चिन्ह, दोन, ही संख्या दाखवावयास नवें कल्पित घेतलें आहे. तसें २+१ संक्षेपानें याप्रमाणें चिन्ह घेतों (३); ह्मणजे तीन. तसें ३+१, संक्षेपानें, याप्रमाणें चिन्ह घेतों, (४); ह्मणजे चार. याप्रमाणें पुढेंही.

जेव्हां १, २, ३, इत्यादिकांचा अर्थ १ कोस, २ कोस, ३ कोस, इत्यादि; अथवा १ शेर, २ शेर, ३ शेर, इत्यादि असेल, तेव्हां त्या अंकास विशेषणांक ह्मणतात. परंतु जेव्हां १, २, ३, इत्यादि विशेष्य वस्तूचे अंक अशी कल्पना न केली, जसें, **साहा आणि चार मिळून दहा होतात**, तेव्हां त्या अंकास केवळ अंक ह्मणतात. गणित पुस्तकांत शिकणारास केवळ अंकाची मात्र ओळख होत्ये; विशेषणांक आणि केवळ अंक, या दोहोंमध्यें जो भेद आहे, तो त्यास उघडा समजत नाहीं. समजातीय एकंचा विशेषणांकानीं, गणितामध्यें, किती कृती केल्या जातात? **केवळ मिळवणी आणि वजाबाकी.** कोसास कोस मिळविले जातात, अथवा कोसांतून कोस वजा केले जातात. गुणाकारांत १, २, ३, इत्यादि अंकामध्यें कांहीं नव्ये तऱ्हेचें ध्वनित होतें; तें असें कीं, कांहीं काम **वारंवार** करायाचें, त्यास तेवढ्या **वेळा** ह्मणतात. ६ कोस ५ **वेळा घे.** यांत एकंचा दोन जाती आहेत; ह्मणजे एक एकं १ कोसाचा दर्शक आणि दुसरा एकं १ **वेळेचा** दर्शक, गुणाकारांत अशी दोन एकं मातील, एक तरी अगत्य **वेळेचा** दर्शक असला पाहिजे; आणि ६ कोस ३ **कोसानीं** गुणावे, असें ह्मणणें, हें फार अयोग्य आहे. ६ कोस ३ कोस **वेळा** घे यापासून काय समजेल? कांहींच समजणार नाहीं.

परंतु या पुढील प्रश्नावर कांहीं विचार कर. **जर कापडाचे एक गजाला ५ रुपये पडतात, तर १२ गजांस किती पडतील?** याचें उत्तर जाणणें, तर १२ **गज ५ रुपयानीं** गुणिलात किं काय? नाहीं. कारण अशा रीतीनें गुणाकार होत नाहीं. या प्रश्नास उलगडून उत्तर काढण्यासाठीं, याप्रमाणें कृती होत्ये: सांगितलें आहे कीं प्रत्येक गजाची किंमत ५ रुपये आहे;

तर जेवढ्या वेळा कापड विकणारा एक एक गज, वारंवार मोजून देतो, तितके वेळा विकत घेणारानें, वारंवार, ५ रुपये दिले पाहिजेत; ह्मणजे तो ५ रुपये १२ वेळा देतो. यावरून मुख्यत्व वेळांवर आहे.

भागाकारांत अशी कल्पना आहे, कीं कांहीं पुनःपुनः करायाचें अथवा विभागावयाचें आहे; ह्मणजे भळतें कांहीं परिमाण अमुक समभागांत विभागावयाचें १८ कोसांस ३ कोसांनी भाग. अर्थ ह्याच, शोधून पाह्या कीं ३ कोस किती वेळा पुनःपुनः घ्यावे, असें कीं १८ कोसां बराबर होतील: परंतु याप्रमाणें जर ह्मटलें, कीं १८ कोस ३ नीं भाग, तर अर्थ ह्याच, १८ कोस ३ समभागांत विभागावयाचे, आणि त्या प्रत्येक समभागांत किती कोस आहेत हें शोधायाचें.

१८ कोस ३ कोसांनी भागले असतां ६ येतात; ह्मणजे अर्थ ह्याच कीं १८ कोस पुरे होण्यासाठीं, ३ कोस पुनःपुनः ६ वेळा घेतले पाहिजेत.

१८ कोस भागिले ३ नीं, ह्मणजे ६ कोस येतात; अर्थ ह्याच कीं, जर १८ कोस ३ समभागांत विभागिले, तर प्रत्येक समभाग ६ कोसां बराबर आहे. वर्चे दोन उदाहरणांत, जर केवळ अंकानी कृती केली, तर दोहोंचें उत्तर एकच होतें; १८ भागिले ३ ह्मणजे ६.

दुसरा नवा एक प्रश्न करितों, १२ गजामध्यें ८ गज किती वेळा जातात? याचें उत्तर हेंच आहे, कीं एके वेळे पेक्षां अधीक आणि दोन वेळां पेक्षां कमी; हें ही उत्तर बरोबर पुरें नाहीं, कांकीं पुनःपुनः वेळांची भागांची कल्पना अजून बरोबर समजांत आली नाहीं. जेव्हां वेळा हा शब्द एथें बोलण्यांत आणितों, तेव्हां तो केवळ बोलायाची तऱ्हा आहे, आणि ती वेळा यंत्रांतील नियमानें चालणाऱ्या अवयवाचा गतीनें समजत्ये अशी आहे, ज्याचें चलन धरून सोडून उड्या मारीत मारीत होतें, आणि असें मनांत आण कीं प्रत्येक उडींत आठ गजांचें काम होतें आणि त्याजाने एक पूर्ण उडीपेक्षां कोठेही मध्यें उभें राहवत नाहीं. अशा रीतीनें उडी मारील तेव्हां एकदांच बरोबर आठ गज उडी मारील

नाहीं तर काहींच नाहीं. यापासून उघड समजतें, कीं अशा यंत्रावयवानें ८ आणि १६ गज समभागाचे उडीमध्यें, ह्मणजे १२ गजांवर त्याचानें उभें राहवत नाहीं. परंतु, आतां कल्पना कर, कीं हें यंत्र एक पळांत बरोबर ८ गज चालतें. वर असें लिहिलें कीं एक एक उडी ८ गजांबरोबर आहे, तर १२ गज ह्मणजे एक उडी आणि एक अर्धी उडी होईल. तशाच रीतीनें १२ गजांमध्यें ८ गंज हे **एक वेळा आणि अर्ध वेळा** आहेत.

अंकगणितामध्यें एक अपूर्णांक दुसरे अपूर्णांकानें भागावा, असें असेल; तर या पुढील उदाहरणापासून त्याचा अर्थ कळेल; उदाहरण. $\frac{2}{3}$ यास $\frac{5}{7}$ याणीं भागिले तर $\frac{14}{15}$ होतात; अथवा $\frac{2}{3}$ मध्यें $\frac{5}{7}$ शा १ वेळेचा $\frac{14}{15}$ जातो.

हीं पुढील उदाहरणें शिकणारानें मनांत विचार करून ठसवून घ्यावीं.

जर पूर्ण १ दिवसांत एक रुपयाचे $\frac{5}{7}$ मिळवितो, तर एक रुपयाचे $\frac{2}{3}$ एक दिवसाचे $\frac{14}{15}$ शांत मिळविल.

जर वर्चे एक, याचा अर्थ फिरविला, असा कीं, जो $\frac{5}{7}$ होता तो हल्लीं १ आहे, तेव्हां जो $\frac{2}{3}$ होता तो हल्लीं $\frac{14}{15}$ होईल.

जर अ रेघेचे $\frac{5}{7}$ ब, रेघेचे बरोबर आहे, तर अ रेघेचे $\frac{2}{3}$ ब रेघेचे $\frac{14}{15}$ होतील.

वर सांगीतल्ये जातीचीं उदाहरणें बरोबर पक्कीं समजलीं पाहिजेत, अशे जातीचीं उदाहरणें त्यांचे मनांत पक्कीं समजून ठसलीं नाहीं तों पर्यंत बीजगणित शिकणारांस आरंभीं तें फार कठीण आहे असें वाटतें, जर वर जें लिहिलें तितकें ध्यानांत आलें नाहीं, तर निश्चय समजावें कीं शिकणाराला अंकगणिताची पुरी माहीत नाहीं, तेव्हां त्यास या बीजगणिताचे पुस्तकापासून कसा लाभ होईल.

**अंकगणिताचा अंक चिन्हामध्यें नियमित संबंध** आहे; उदाहरण, २+२ हे नेहेमी ४ आहेत, हीं अंकचिन्हें कोणत्येही वस्तूचीं असोत, कोस, गज, विघे, इत्यादि कांहीं असोत. **बीजामध्यें अंकचिन्हस्थळीं अक्षरें**

स्तूविषयीं बरोबर एकसारखा आहे; तशी रीतीनें बीजगणितांत अंकांच्या साधारण गुणावर कल्पना करितों, आणि त्या कल्पनांपासून जो निश्चितार्थ उत्पन्न होतो, तो सर्व अंकांवर बरोबर सारखाच लागू पडतो. हें बीजगणिताचें मोठें एक अंग आहे, आणि शिकणाराला या अंगानें बीजगणित येण्याची योग्यता येत्ये.

परंतु ही व्याख्या थोड्ये शब्दानीं सांगीतली, ही जो थोडें बहूत बीजगणित शिकलेला असेल, त्यास मात्र समजेल. जो कोणी कोणतीही विद्या शिकायास इच्छितो, त्यास जर त्या विद्येविषयीं कांहींच माहीत नाहीं, तर त्यास त्या विद्येची व्याख्या थोड्या शब्दानीं समजाविता येत नाहीं. आतां आरंभीं पूर्ण आणि अपूर्ण या अंकांचा एक सामान्य गुणाचें उदाहरण सांगतों.

(८) एकं घे, आणि असा अपूर्णांक घे कीं त्यास (८) वेळा घेतला तर पूर्ण एक एकं होईल, ह्मणजे तो एकंचा (८) वा भाग आहे. आतां त्या दोहोंस प्रत्येकीं १ मिळीव; तर ८+१ ह्मणजे ९ होतील आणि $\frac{१}{८}$+१ ह्मणजे १$\frac{१}{८}$ आहे. पहा, प्रथम अंक ह्मणजे ९ यामध्यें दुसरा अंक ह्मणजे १$\frac{१}{८}$ हा बरोबर (८) वेळा जातो. एकंचे ($\frac{२}{३}$) घे, आणि असा अपूर्णांक घे कीं, एक वेळेचे ($\frac{२}{३}$) घेतले असतां पूर्ण १ एकं होईल, तर एथें तो अपूर्णांक १$\frac{१}{२}$ होईल. आतां त्या दोहोंस प्रत्येकीं एक मिळीव, तर १$\frac{२}{३}$ आणि २$\frac{१}{२}$ होतील. या प्रथम अंकांत ह्मणजे १$\frac{२}{३}$ शांत दुसरा अंक ह्मणजे २$\frac{१}{२}$ हा बरोबर ($\frac{२}{३}$) वेळा जाईल. हीं पुढील उदाहरणें तपासून पाहा, त्यामध्यें इच्छेप्रमाणें भलते कांहीं पूर्णांक किंवा अपूर्णांक घालावे.

( ) अमुक एकादि एकं घे आणि असा पूर्णांक किंवा अपूर्णांक घे कीं, जास वारंवार ( ) तितके वेळा घेतला तर, पूर्ण एक एकं होईल. त्या दो-



होंस १ मिळीव; तेव्हां प्रथमाचे बेरिजेंत दुसऱ्याची बेरीज ( ) अमुक वेळा किंवा वेळेचा भाग जाईल.

हीं पुढील उदाहरणें तपासून पाहा.

| ( ) | पूर्ण किंवा अपूर्णांक जाला वारंवार ( ) अमुक वेळा घेतला तर पूर्ण एकं होतो. | पहिल्ये अंकास एक मिळविला. | दुसरे संख्येस १ मिळविला. | जितके वेळा तिसऱ्ये कोष्टकांतील अंकांत चवथ्ये कोष्टकांतील अंक जातो. |
|---|---|---|---|---|
| ७ | $\frac{१}{७}$ | ८ | १$\frac{१}{७}$ | ७ |
| $\frac{१}{३}$ | ३ | १$\frac{१}{३}$ | ४ | $\frac{१}{३}$ |
| २$\frac{१}{४}$ | $\frac{४}{९}$ | ३$\frac{१}{४}$ | १$\frac{४}{९}$ | २$\frac{१}{४}$ |
| $\frac{१}{२०}$ | २० | १$\frac{१}{२०}$ | २१ | $\frac{१}{२०}$ |
| १ | १ | २ | २ | १ |

प्रथम आणि दुसऱ्या आसनांतील अंकामध्यें पुढील सांगितल्याप्रमाणें परस्पर संबंध आहे, तो असा कीं दुसरे आसनांतील पूर्णांक किंवा अपूर्णांक आहे तो १ भागिला प्रथम आसनांतील पूर्ण किंवा अपूर्णांकानें; अथवा १ यामध्यें प्रथम आसनांतील अंक जितके वेळा किंवा वेळेचा भाग जातो असा संबंध आहे. उदाहरण, जर प्रथम आसनांतील संख्येस अंक ह्मणतात

तर दुसरे आसनांतील संख्या १ भागिली अंकानें इतकी आहे.

आणि प्रथम आणि पांचव्या आसनांतील अंकांचें ऐक्य जें ध्यानांत येतें, तें या पुढील रीतीप्रमाणें सांगितलें जाईल;

अंकास १ मिळवून त्या बेरिजेस अंक जितके वेळा १ मध्यें जातो त्यांत १ मिळवून त्या बेरीजेनें भागिलें तर तो भागाकार अंकच होईल.

वर सांगीतलेली गोष्ट यांईकर्त्ती त्याजपेक्षां अधीक संक्षेपानें सां-

गतां येल्ये. अंक स्मटला तर भलता कांहीं अंक घेतां येतो, आणि इच्छेप्रमाणें त्या अकाचे जागीं भलतें कांहीं चिन्ह घेतां येतें, तर त्या चिन्हाविषयीं मूळाक्षरांतून भलतें काहीं अक्षर घे, मनांत आण कीं त्या अंकाचें चिन्ह एथें अ, घेतला. वर सांगीतल्याप्रमाणें + हें चिन्ह मिळवणीचें आहे. असें जाण, आणि एक अंक दुसऱ्ये अंकास भागायास, जसें अंकगणितामध्यें लिहितात, तसें लिहावें, ह्मणजे भाज्यवर आणि भाजक खालिं आणि त्यांचामध्यें रेघ. आणि = या चिन्हानें समजावें कीं जो अंक त्याचे पुढें आहे, तो त्याचे दुसरे बाजूचे मागल्ये अंका बरोबर आहे. तेव्हां वर सर्व अंकाचा सामान्य गुण जो सिद्ध करून दाखविला तो याप्रमाणें अक्षर चिन्हांनीं दाखविला जातो;

$$\frac{अ+१}{\frac{१}{अ+१}} = अ$$

आतां या विद्येचा प्रथम भागाची व्याख्या सांगायास आरंभ करितों.

१ व्याख्या. या विद्येविषयीं, हिंदुलोकामध्यें, सर्वांपेक्षां प्राचीन पुस्तक, जें हल्लीं सांपडलें, तें संस्कृत भाषेंत, भास्कराचार्य या नामें पुरुषानें केलें, त्यास बीजगणित ह्मणतात. त्याचा काळ सुमारें इस्वी सन्न ११५०.

२ व्या०. अंकास अक्षरानें दाखविलां येतें, आणि पुढें समजांत येईल कीं तो, इच्छेप्रमाणें, भलता कांहीं सामान्य अंक असेल; किंवा तो कांहीं अव्यक्तविशेष अंक असेल, त्याचेजागीं, व्यक्त अंक होई पावेतों, अक्षर चिन्हानें दाखविला जातो; अथवा तो कांहीं व्यक्त पूर्ण किंवा अपूर्णांक असेल, त्याचें इतकें बहुत वारंवार काम पडतें, याजकरितां कांहीं संक्षेप अक्षर चिन्हांनीं लिहायास सोईस पडतें. ह्मणजे $\pi$ या चिन्हास पि, आणि $e$ या चिन्हास इ, हीं दोन अक्षरें इंग्लिश भाषेंतून दोन विशेष्य निश्चितार्थ स्थळीं लिहितात,

ते निश्चितार्थ पुरे दाखवायास अशक्य, परंतु सुमारानें ३·१४१५९२७ आणि २·७१८२८१८ हे दोन अंक याचे जवळ जवळ आहेत.

३ व्या०. जीं अक्षरें कामांत आणितात तीं **बाळबोध** लिपीचीं मूळ अक्षरें आहेत, इंग्रेजी भाषेंत इटालिक लहान अक्षरें घेतात, आणि तीं कळायासाठीं एथें लिहून दाखविलीं.

## मूळ अक्षरें.

| इंग्रेजी | | उच्चार | बाळबोध | इंग्रेजी | | उच्चार | बाळबोध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| *A* | *a* | ए | अ | *N* | *n* | एन् | न |
| *B* | *b* | बी | ब | *O* | *o* | ओ | ओ |
| *C* | *c* | सी | क | *P* | *p* | पी | प |
| *D* | *d* | डी | ड | *Q* | *q* | क्यु | क्क |
| *E* | *e* | ई | ई | *R* | *r* | आर | र |
| *F* | *f* | एफ | फ | *S* | *s* | एस | स |
| *G* | *g* | जी | ग | *T* | *t* | टी | ट |
| *H* | *h* | एच | ह | *U* | *u* | यु | यु |
| *I* | *i* | ऐ | ऐ | *V* | *v* | वि | व |
| *J* | *j* | जे | ज | *W* | *w* | डबल्यु | व |
| *K* | *k* | के | के | X | *x* | एक्स | क्ष |
| *L* | *l* | एल | ल | *Y* | *y* | वै | य |
| *M* | *m* | एम | म | Z | *z* | जेड | झ |

४ व्या०. **पूर्ण** आणि **अपूर्णांक** यांस सर्वदा अंक म्हणतात. व्यवहारी बोलण्यांत २½ यांस अंक म्हणत नाहीं, परंतु बीजगणितांत त्यांना अंतात; जर २½ आणि २, ३, ४, इत्यादि या दोहोंमध्यें फेर काय तें साठीं प्रयोजन असेल, तर प्रथम २½ यांस **अपूर्णांक** म्हणता २, ३, ४, यांस **पूर्णांक** म्हणतात.

तें, कीं अ आणि ब एकच अंकाचे ठिकाणीं घेतले आहेत, तर, उत्तर हेंच आ-
हे, कीं कांहीं अंक बाकी राहत नाहीं, ह्मणजे शून्य रहातें. अशी
जातीचे प्रश्नावरून जेव्हां कांहीं राहिलें नाहीं असें ह्मणतात, तेव्हां प्रश्ना-
चे उत्तरासाठीं ० असें चिन्ह लिहितात, ह्मणून शून्य अंका प्रमाणें रूप
धरितें.

५ व्या०. हें पुढील चिन्ह + अधिकाचा अर्थ दाखवितें, असें कीं जे-
व्हां दोन अंकांचे किंवा अक्षरांचे मध्यें हें चिन्ह लिहिलें तर दुसरी रकम
पहिल्ये रकमेशीं मिळवायाची आहे. जसें. अ + ब यास असें ह्मणतात,
अ अधीक ब याचा अर्थ हाच, कीं अ या अक्षराचे जे अंक असतील, ते ब
अक्षराचे अंकाशीं मिळवायाचे आहेत.

तुसला + अ, लिहिला, त्याचा अर्थ केवळ हाच, अ शून्याशीं मिळवि-
ला, अथवा ० + अ ह्मणजे, तो अ मात्र आहे.

६ व्या०. — या चिन्हास उणें ह्मणतात, त्याचा अर्थ कमी करणें, फ-
लित हेंच, कीं दुसरा अंक पहिल्ये अंकातून वजा करायाचा. जसें. अ — ब
यास अ उणा ब ह्मणतात, अर्थ हाच, कीं अ, बनें कमी करायाचा अथवा अ
यांतून ब वजा करायाचा

जेव्हां अ, बपेक्षा उणा असेल, तर हें वरचें उदाहरण नाहीं सारिखें
आहे, कां कीं जी अशी आकृती होउं सकत नाहीं ती करायास सांगतों असें,
३—६ ही कृती अशक्य आहे. अशे जातीचे उत्तराचा अर्थ काय आहे तो
कल्पनेनें पुढें शोधला जाईल, अशी कृती अशक्य आहे ह्मणून, त्याचा अ-
शक्यपणा कसकशे जातीचे अयुक्ततेनें होतो, हेंही पुढें शो[illegible]
लें जाईल.

७ व्या०. हें पुढील चिन्ह × गुणाकार दाखवितें, त्याचा अर्थ असा दाखविला जातो, कीं प्रथम अंकामध्यें जितके एक किंवा एकांचे भाग असतील, तेवढे वेळा किंवा वेळांचा भाग पुनः पुनः दुसरा अंक घेण्याचें आहे. जसें अ×ब यास अ गुणिला ब असें ह्मणतात. आणि हें चिन्ह सुचवितें कीं ब, अ वेळा घ्यावा. जसें, १½ × ६ ह्मणजे ६ एक वेळा आणि एक अर्धी वेळा घ्यावयाचे आहेत ह्मणजे ९. अ ब ही पद्धती अ आणि ब यांचा गुणाकार दाखविल्ये; आणि या दोन अक्षरांस गुणाकाराचे गुण्य गुणक ह्मणतात, आणि तीं अक्षरें हीं परस्परांचीं गुणक आहेत. ०×अ आणि अ×० हीं दोन्हीं ० असलीं पाहिजेत; कांकीं अ काहीं वेळा अथवा वेळेचा भाग हीन घेतला, तर काहींच परिमाण होत नाहीं, आणि ०, किती ही वेळा वारंवार घेतलें, तर काहींच फळ उत्पन्न होत नाहीं. नवे शिकणारे वरचे या गोष्टींविषयीं नेहेमी चुकतात, यास्तव, त्यांचे स्मरणांत या गोष्टीचा निश्चितार्थ ठसायासाठीं, हीं दोन पुढील कृत्यें उदाहरणासाठीं सांगतों. त्यांचें उत्तर स्पष्ट उघड आहे, आणि त्या उत्तरास बीजगणित रूपानें दाखविलें जाईल.

भलत्या कितीएक पेट्या आहेत, त्या प्रत्येक पेट्यांत काहींच भरलें नाहीं, तर सर्वांत किती भरलें असेल ?

जर अ, हें अक्षर पेट्यांची संख्या दाखवितें, तर ० वारंवार अ वेळा घेतलें, अथवा अ × ०, तर केवळ शून्य होतें.

एक पेटी आहे, ती सोन्यानें भरलेली आहे, परंतु त्यांत अ ला काहीं भाग नाहीं; तर त्यांत अचें काय आहे ?

जर, प, हें अक्षर पेट्यांत जितके सोन्याचे शेर आहेत, ते दाखवितें, तर अचा भाग ह्याचा आहे ० × प, ह्मणजे ० आहे; ह्मणजे काहींच नाहीं.

नवे शिकणारे अशी चूक करितात याचें कारण असें आहे, कीं

गुणिला नाहीं, याचें फलित ह्मणजे काहींच उणा होत नाहीं, किंवा त्याचें आगदींच रूप बदललें नाहीं, असें मनांत आणून चूक करितात: परंतु अपूर्णांकाचे अंकगणितांमध्यें आणि बीजगणितामध्यें गुणाकार ह्मटला, तर ह्याच अर्थ धरिला जातो, कीं अमुक वेळा किंवा वेळांचा भाग वारंवार घ्यावयाचा आहे. जर कोणताही अंक अगदींच गुणिलेला नसला, तर कांहींच अंक उत्पन्न होत नाहीं, कांकीं त्याचा कांहींच भाग घेतला नाहीं; जो अंक रूप बदल न होतां तसाच रहातो, तोच अंक गुणिला १ नें, अथवा एक वेळा घेतला असा आहे. तर अ ह्मणजे १×अ हाच आहे.

जेव्हां केवळ अक्षरें, किंवा अंकसुद्धां अक्षरें कामांत आणितात, तेव्हां × हें गुणाकारचिन्ह टाकितात. जसें अ ब, ह्मणजे ह्याच अर्थ आहे, कीं ब, अ वेळा घेतला आहे; ३ अ याचाही अर्थ ह्याच; कीं अ तीन वेळा घेतला आहे. जेव्हां दोन अंकच कामांत घेतले आहेत तेव्हां मात्र त्यांचामध्यें × हें चिन्ह लिहिलेंच पाहिजे. जसें ३×६ हे गुणाकार चिन्हा वाचून जवळजवळ ३६ याप्रमाणें लिहवत नाही, कांकीं तो अंक ६+६+६ होत नाहीं परंतु अंकगणित रीतीनें ३ गुणिले १० अधीक ६ याप्रमाणें होतात. बहुत करून अंकामध्यें × हें चिन्ह सोडून, केवळ त्याचे जागीं बिंदु करून, याप्रमाणें लिहितात ३.६; परंतु यापासून शिकणारांस कांहीं भ्रम होईल, कीं या रूपाचा अर्थ $३+\frac{६}{१०}$ आहे ह्मणून, दशांशाचे चिन्हाचा बिंदु नेहेमी संभाळून त्याणें वर लिहावा. जसें, ३˙६

८ व्या०. अपूर्णांकांतील अंश आणि छेद यांमध्यें जी रेघ लिहितात, ती भागाकार दाखविते. जसें $\frac{अ}{ब}$ यास याप्रमाणें ह्मणतात अ भागिला ब आणि अर्थ ह्याच कीं अ मध्यें ब किती वेळा किंवा वेळेचा भाग जातो. जसें, $\frac{३}{२}$ अथवा ३ भागिले २ ह्मणजे $१\frac{१}{२}$ आहे. अर्थ ह्याच कीं ३ या मध्यें २ एक वेळा, आणि एक अर्धी वेळा जातो. अर्धा ह्मणजे $\frac{१}{२}$ या रूपानें लिहिण्या-

स योग्य,कांकीं एकामध्यें जे दोन जातात तो एका वेळेचा अर्धा भाग आहे. कदाचित अ ÷ ब याप्रमाणें लिहितात.

$\frac{अ}{०}$ असें लिहिल्यानें बहुत करून नवे शिकणारे असें मनांत घेतात कीं, अच आहे; परंतु त्यांत कांहींच अर्थ नाहीं. साहामध्यें शून्य किती वेळा जातें? उत्तर हेंच कीं असे प्रश्न अयुक्त आहेत. अ आणि $\frac{अ}{१}$ हे एकच आहेत. कांकीं अ याचा अर्थ भलते एकंची संख्या, अथवा एकंचे भाग आहेत; तर असें विचारिलें अस्तां, कीं अ यामध्यें १ हा किती वेळा किंवा वेळेचा भाग जातो तर उत्तर हेंच कीं नुस्ता अ आहे.

९ व्या॰. हीं पुढील सांगीतलेलीं उदाहरणें, अ अक्षराचा वेगळाल्या पद्धती आहेत; त्या पद्धती शिकणारानें घोकून त्याशीं पक्कें माहीत व्हावें:

$अ + ०$ $\quad$ $अ \times १$ $\quad$ $अ \times १ \times १$ $\quad$ $\frac{अ}{१}$ $\quad$ इत्यादि.
$० + अ$
$अ - ०$ $\quad$ $१ \times अ$ $\quad$ $१ \times अ \times १$ $\quad$ $\frac{अ \times १}{१}$ $\quad$ इत्यादि.

१० व्या॰. **बरोबरी** आणि **तर किंवा यामुळें** प्रमाणांत दाखवाया साठीं, पुढें संक्षेप चिन्हानें लिहितात. $अ = ब$ यांत अर्थ हाच, कीं अ आणि ब जा अंकस्थळीं घेतले, ते दोन अंक बरोबर एकच आहेत: आणि याप्रमाणें ह्मणतात, अ बरोबर ब. ∴ या चिन्हाचा अर्थ प्रमाणांत तर किंवा यामुळें याचें संक्षेप चिन्ह आहे. जसें, $अ = ब$ आणि $ब = क$ ∴ $अ = क$, आणि याप्रमाणें ह्मणतात, अ बरोबर ब आणि ब बरोबर क, यामुळें अ बरोबर क.

११ व्या॰. बीजगणितांतील प्रत्येक चिन्हाचा संग्रहास **पद्धती** ह्मणतात, आणि जेव्हां दोन पद्धती, = या चिन्हानें जोडिल्या, तर त्या सर्वांस **समीकरण** ह्मणतात.

**एकरूप समीकरण** तेंच आहे कीं ज्याचा दोन बाजू बरोबर आहेत; त्या समीकरणामध्यें भलत्ये कोणत्येही अंकाचेस्थळीं अक्षर लिहि-

लें असलें, जसें वर (७ व्ये पृष्ठावर समीकरण दाखविलें) तसें हें.

$$\frac{अ+१}{\frac{१}{अ}+१}=अ$$

यांत अ कोणत्येंही किमतीचा असला, तरी हें समीकरण खोटें होऊं शकत नाहीं; अथवा अची कशीही किंमत कल्पिली, तथापि त्या किमतीविषयीं हें समीकरण खरेंच आहे.

हीं पुढील सांगीतलेलीं समीकरणांचीं उदाहरणें एकरूप आहेत, असें स्पष्ट दिसतें.

$$अ+ब=ब+अ \qquad अ+१+१=अ+३-१$$
$$अ+अ=२अ \qquad अ+अ+अ=३अ$$
$$\frac{१}{२}अ+\frac{१}{२}अ=अ \qquad \frac{१}{३}अ+\frac{१}{३}अ+\frac{१}{३}अ=अ$$
$$२अ+३अ-अ+४अ=८अ+६अ+५अ-११अ$$

हीं पुढील उदाहरणें एकरूप आहेत, असें प्रथमतः दिसण्यांत येत नाहीं; परंतु शोधिलीं असतां, प्रत्येकस्थितींत तीं बरोबर खरीं आहेत.

$$\frac{१}{१+अ}+\frac{१}{१+२अ}=\frac{२+३अ}{१+३अ+२अअ}$$

$$अ-\frac{अ}{१+क्ष}=\frac{अक्ष}{१+क्ष}$$

**संकेतसमीकरण** तेंच आहे, कीं जें अक्षरांचे प्रत्येक किमतींत खरें होणार नाहीं, परंतु त्यांतल्ये कित्येक नियमित किमतींत मात्र खरें आहे.

जसें, $ब+१=७$ आणि $अ-३=१२$,

हीं दोन उदाहरणें ब बरोबर ६ आणि अ बरोबर १५ अशा संकेतावांचून खरीं होणार नाहींत.

ळ आतात, आणि ते समीकरण खरें होतें, तेव्हां असें ह्मणतात कीं तो अंक त्या समीकरणास स्थापितो जसें अ − ३ = १२, हें समीकरण अ बरोबर १५, केवळ या अंकाने स्थापिलें जातें.

१२ व्या०. जेव्हां बीजांतल्या पद्धती एक किंवा अनेक, कुंडलींत मांडिलेल्या असतात, तेव्हां त्यांचा अर्थ हाच, कीं त्या कुंडलींतील अनेक पदें आहेत, तथापि, तीं बाजूचे पदांशीं केवळ एक अक्षरासारिखा संबंध ठेवितात. जसें,

अ − (ब − क)

याचा अर्थ हा कीं, अ यांतून नुसता ब किंवा नुसता क उणा करायाचा नाहीं, परंतु ब − क वजा करायाचा ह्मणजे ब यांतून क उणा करून जी बाकी राहील ती अ यांतून वजा करायाची आहे. ह्मणून अ − ब − क असें नाहीं.

**उदाहरण.** जेव्हां अ = २०, ब = १२, क = १०, ड = ३, तेव्हां या पद्धती पासून उत्तर काय निघेल? अ − (ब − {क − ड}), एथे या उदाहरणांत क − ड, हेंच आहे, १० − ३ ह्मणजे ७; ब − (क − ड) हेंच आहे १२ − ७, ह्मणजे ५; तर अ − (ब − {क − ड}) हेंच आहे २० − ५, ह्मणजे १५.

आणि, (अ + ब) (क + ड) याचा अर्थ हाच, कीं क + ड हा अ + ब वेळा घेण्याचा आहे, आणि प (क + र) याचा अर्थ हाच, कीं क + र, प वेळा घेण्याचा आहे.

या वरचा व्याख्या बीजगणिताचा लिहिण्याचा प्रथम परिपाटी आहेत. पुढें शिकतानां दुसऱ्या परिपाटी उघड होतील. आतां बीजांतील मिळवणी, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, या चार प्रथम कृत्यांतील कांहीं एक उघडे विशेष गुण सांगतों.

1. अंक किंवा अक्षरचिन्हें, कोणत्येही क्रमानें मांडून मेळविलीं अस-

३+१+२ २+१+३

याप्रमाणें अक्षरचिन्हांनीं अ+ब+क+ड=ब+क+ड+अ=ब+अ+ड+क, इत्यादि.

२. लहानांतून मोठें पद वजा करणें, असा प्रसंग आणल्याशिवाय, मेळवणी आणि वजाबाकीचीं पदें, इच्छेप्रमाणें, स्थळभेदें करून मांडितां येतात. जसें, कोणी मनुष्य २० रुपये हारेल आणि ५० रुपये जिंकेल, तर त्याचे अवळ इतकेच रुपये राहतील कीं जसें आरंभीं ५० रुपये जिंकला आणि त्यांतून २० रुपये हारला, परंतु त्याचे जवळ २० रुपयांपेक्षां उणे असतें तर, त्याचानें ५० रुपये जिंकवतें, परंतु २० रुपये हारववतें नाहीं. जसें, १०−२०+५० हें अशक्य; परंतु १०+५०−२० हें शक्य आहे. याच प्रमाणें ८−६+१०−११ या पुढील रूपानें मांडितां येतात:

८−६+१०−११ ८+१०−११−६ १०+८−११−६

८+१०−६−११ १०+८−६−११ १०−६+८−११;

परंतु या पुढील रूपानें मांडवत नाहीं:

१०−११+८−६ −११+८+१०−६ इत्या०

१०−११−६+८ −६−११+८+१० इत्या०

**प्रश्न.** अ−ब+क−ड हें संभवण्यासाठीं कोणत्ये प्रकारचे संकेत केले पाहिजेत? उत्तर, कीं अ, ब पेक्षां अधिक असावा, किंवा ब पेक्षां उणा तरी नसावा, आणि अ−ब+क हे ड पेक्षां उणें नसावें. या गोष्टीविषयीं पुढें विचार होईल.

३. गुणाकार आणि भागाकार कोणत्येही क्रमानें करितां येतात. त्याण-

ते अंक पूर्ण किंवा अपूर्ण असोत, शिकणारानें बीजाचा आरंभ केल्याचे, पूर्वी, या सर्व जातींचा अंकगणितरीती शिकून सिद्ध केलेल्या आहेत, असें मानिलें आहे.

अंकगणितांत हें ही दाखविलें आहे कीं, भागाकार आणि गुणाकार यांचा कृत्याचा क्रम फिरवितां येतो; म्हणजे, अ भागिला ब आणि त्यांचा भागाकार गुणिला कनें, अशी सांगीतलेली पद्धती या पुढील पद्धती प्रमाणेंच आहे, म्हणजे अ गुणिला क आणि त्यांचा गुणाकार भागिला बनें, अथवा

$$क \times \frac{अ}{ब} = \frac{कअ}{ब}$$

सारांश, वर ३ ऱ्ये आणि ४ थ्ये दृष्टांवर गुणाकार म्हणजे वेळा किंवा वेळेचा भाग घेण्याचें सांगितलें आहे, त्याचा अर्थ वाढवून पाहातां, प्रत्येक गुणाकार भागाकार आहे, आणि प्रत्येक भागाकार गुणाकार आहे. म्हणजे, अ ६ याणीं भागणें म्हणजे अचा साहावा भाग घेणें आहे, अथवा अ एक वेळेचा एक षष्ठांश वेळा घ्यावा, अथवा अ यास $\frac{१}{६}$ याणें गुणायाचा आहे. याच सारिखें, अ यास $\frac{१}{४}$ याणें भागणें म्हणजे १ एकंचे किती चतुर्थांश अ मध्यें जातात असें विचारणें; त्यास उत्तर हेंच, कीं अ मध्यें जितके एकं आहेत तितके वेळांचा चौपट वेळा म्हणजे अ यास चोहोंनी गुणावें.

पुनः १० यास $\frac{२}{३}$ याणीं भागावें. म्हणजे १० गुणिले $\frac{३}{२}$ हें आहे. १० यास $\frac{२}{३}$ याणीं भागावें म्हणजे एक एकंचे $\frac{२}{३}$ श १० मध्यें किती वेळा जातात हें शोधून काढावयाचें आहे. आतां $\frac{२}{३}$ आणि $\frac{१}{३}$ मिळून १ एकं होतो आणि $\frac{१}{३}$ हा $\frac{२}{३}$ चे अर्धा आहे; म्हणून पूर्ण १ एकं मध्यें $\frac{२}{३}$ हे एक वेळा आ-

णि एक अर्धी वेळा जातात. यामुळें, १० मध्यें $\frac{२}{३}$ हे १० वेळा आणि १० अर्धे वेळा जातात, अथवा १५ वेळा. म्हणजे १० यांस $\frac{२}{३}$ यांणी भागिले तर १० हे, एक वेळा आणि एक अर्ध वेळा घेतल्या प्रमाणें आहेत, अथवा १० गुणिले $१\frac{१}{२}$, म्हणजे गुणिले $\frac{३}{२}$ नें.

याच सारिखें, १० हे $\frac{७}{२}$ यांणीं भागणें, म्हणजे १० यांस $\frac{२}{७}$ यांणीं गुणावें हीं दोन्हीं बरोबर. अशा प्रश्नांत विचार हाच आहे कीं १० मध्यें ७ एकंचे अर्धे किती वेळा जातील? जितके त्यांत ७ एकं आहेत तितके दुपट वेळा; म्हणजे १ वेळेचे $\frac{१०}{७}$ याचें दुपट अथवा एक वेळेचे $\frac{२०}{७}$. परंतु $\frac{२०}{७}$ हे १० यांचे $\frac{२}{७}$ आहेत, अथवा १० एक वेळेचे $\frac{२}{७}$ घेतलं.

शिकणाराने या पुढील पद्धती प्रमाणें वेगवेगळीं अनेक जातीचीं उदाहरणें करून लावण्याचा अभ्यास केला पाहिजे.

अ गुणिला $\frac{प}{क}$ म्हणजे अ भागिला $\frac{क}{प}$ हें सारिखेंच आहे.

अ भागिला $\frac{प}{क}$ म्हणजे अ गुणिला $\frac{क}{प}$ हें ही सा०

$$\text{अथवा } \frac{प}{क}\times अ = \frac{अ}{\frac{क}{प}} \text{ आणि } \frac{अ}{\frac{प}{क}} = \frac{क}{प}\times अ$$

बीजगणितांतल्या पद्धतींस अंकरूप देणें, आणि वेगवेगळ्या अक्षरांची वेगवेगळी किंमत समजणें, अशा जातीच्या कृतींचा शिकणारानें प्रथमतः अभ्यास केला पाहिजे. म्हणजे याप्रमाणें

जेव्हां $अ = \frac{१}{२}$ आणि $ब = \frac{२}{५}$ तर $\frac{अ+ब}{अ-ब}$ याची काय किंमत आहे.

$$अ+ब = \frac{१}{२} + \frac{२}{५} = \frac{९}{१०} \qquad अ-ब = \frac{१}{२} - \frac{२}{५} = \frac{१}{१०}$$

$$\frac{अ+ब}{अ-ब} = \frac{\frac{९}{१०}}{\frac{१}{१०}} = ९$$

जेव्हां $अ = १\frac{१}{२}$ तर $\frac{१+अअ}{१+अ} = \frac{अअअ}{२+\frac{१}{२}अ}$ असें समीकरण खरें आहे कीं नाहीं?

$$अअ = \frac{३}{२}\times\frac{३}{२} = \frac{९}{४} \qquad १+अअ = १\frac{५}{४} = \frac{१३}{४}$$

$$१+अ = १+\frac{३}{२} = \frac{५}{२} \qquad (१+अअ)\div(१+अ) = \frac{१३}{४}\div\frac{५}{२} = \frac{१३}{१०}$$

$$अअअ = \frac{३}{२}\times\frac{३}{२}\times\frac{३}{२} = \frac{२७}{८} \qquad \frac{१}{२}अ = \frac{३}{४} \qquad २+\frac{१}{२}अ = \frac{११}{४}$$

$$अअअ \div (२+\frac{१}{२}अ) = \frac{२७}{८}\div\frac{११}{४} = \frac{२७}{२२}$$

तर अअ+ब(अ+ब)=१६+२१=३७

परंतु जीं समीकरणें एकरूप आहेत, असें खचित सांगताल, त्यांचा खरेपणा काढायाचे कृत्यांचा अभ्यास, हा सर्वपेक्षां बोध होण्यास फार उपयोगी आहे. ह्मणजे याप्रमाणें

अ=४ आणि ब=२ असें असेलतर

$$\frac{\text{अअ}-\text{बब}}{\text{अ}-\text{ब}}=\frac{\text{अअअ}+\text{बबब}}{\text{अअ}+\text{बब}-\text{अब}}$$ हें खरें आहे कीं नाहीं?

$$\frac{\text{अअ}-\text{बब}}{\text{अ}-\text{ब}}=\frac{\text{१६}-\text{४}}{\text{२}}=(\text{६})\ \text{अअअ}=\text{६४},\ \text{बबब}=\text{८}$$

तर $\frac{\text{अअअ}+\text{बबब}}{\text{अअ}+\text{बब}-\text{अब}}=\frac{\text{६४}+\text{८}}{\text{१६}+\text{४}-\text{८}}=\frac{\text{७२}}{\text{१२}}=(\text{६})$ तर हें समीकरण खरें आहे.

आतां अ=$\frac{\text{२}}{\text{३}}$ आणि ब=$\frac{\text{१}}{\text{२}}$ असें असलें, तर वरचें समीकरण खरें आहे कीं नाहीं?

$$\frac{\text{अअ}-\text{बब}}{\text{अ}-\text{ब}}=\frac{\frac{\text{४}}{\text{९}}-\frac{\text{१}}{\text{४}}}{\frac{\text{२}}{\text{३}}-\frac{\text{१}}{\text{२}}}=\frac{\frac{\text{७}}{\text{३६}}}{\frac{\text{१}}{\text{६}}}=\left(\frac{\text{७}}{\text{६}}\right)$$

$$\frac{\text{अअअ}+\text{बबब}}{\text{अअ}+\text{बब}-\text{अब}}=\frac{\frac{\text{८}}{\text{२७}}+\frac{\text{१}}{\text{८}}}{\frac{\text{४}}{\text{९}}+\frac{\text{१}}{\text{४}}-\frac{\text{१}}{\text{३}}}=\frac{\frac{\text{९१}}{\text{२१६}}}{\frac{\text{१३}}{\text{३६}}}=\left(\frac{\text{७}}{\text{६}}\right)$$ यावरून हें समीकरण खचित खरें आहे.

या पुढील एकरूप समीकरणाचा उदाहरण क्रमाची सत्यता शिकणारानें ताडून पहावी; ती अशी, कीं प्रथमतः अक्षरांस पूर्णांकाचें रूप द्यावें नंतर दुसऱ्यानें अपूर्णांकाचें रूप द्यावें. कांकी, जर समीकरणाचा दोन बाजूचा किंमती बरोबर असतील, तर त्यावरून त्यांचे एकरूपाचा खरेपणा निघेल. कुली कर्तेस-

मयीं पदामध्यें इतकें मात्र संभाळावें कीं समीकरणांतील अक्षरांस,उण्यांतून अधिक वजा करावें लागेल,अशी किंमत देऊं नये,आणि अक्षरांस अशीही किंमत देऊं नये कीं,कृती केल्यानें पदांमध्यें असा कांहीं अपूर्णांक निघेल कीं ज्याचे छेदस्थळीं शून्य येईल. याविषयीं ६ वी आणि ८ वी व्याख्या पाहा ह्मणजे ध्यानांत येईल.

$$(\text{अ}+\text{क्ष}+\text{य})(\text{अ}+\text{क्ष}-\text{य})=\text{अअ}+२\text{अक्ष}+\text{क्षक्ष}-\text{यय}$$

$$(\text{अ}+\text{ब})(\text{अ}+\text{ब})=\text{अअ}+२\text{अब}+\text{बब}$$

$$(\text{अ}-\text{ब})(\text{अ}-\text{ब})=\text{अअ}-२\text{अब}+\text{बब}$$

$$(\text{अ}+\text{ब})(\text{अ}-\text{ब})=\text{अअ}-\text{बब}$$

$$(\text{मम}-\text{नन})(\text{मम}-\text{नन})+४\text{ममनन}=(\text{मम}+\text{नन})(\text{मम}+\text{नन})$$

$$(\text{अ}+\text{ब})(\text{अ}+\text{ब})+(\text{अ}-\text{ब})(\text{अ}-\text{ब})=२\text{अअ}+२\text{बब}$$

$$(\text{अ}+\text{ब})(\text{अ}+\text{ब})-(\text{अ}-\text{ब})(\text{अ}-\text{ब})=४\text{अब}$$

$(\text{अ}+\text{ब}+\text{क})(\text{अ}+\text{ब}-\text{क})(\text{ब}+\text{क}-\text{अ})(\text{क}+\text{अ}-\text{ब})=२\text{अअबब}+२\text{बबकक}+२\text{ककअअ}-\text{अअअअ}-\text{बबबब}-\text{कककक}$, $(\text{अ}+\text{ब})(\text{अ}+\text{ब})(\text{अ}+\text{ब})=\text{अअअ}+३\text{अअब}+३\text{अबब}+\text{बबब}$

$$\frac{१}{\text{अ}}+\frac{१}{\text{अ}-१}+\frac{१}{\text{अ}-२}=\frac{३\text{अअ}+२-६\text{अ}}{\text{अअअ}+२\text{अ}-३\text{अअ}}$$

$$\frac{\text{अ}+\text{ब}}{\text{अ}-\text{ब}}+\frac{\text{अ}-\text{ब}}{\text{अ}+\text{ब}}=\frac{२\text{अअ}+२\text{बब}}{\text{अअ}-\text{बब}}$$

$$\text{अक्षक्ष}+\text{बक्ष}+\text{क}=\frac{(२\text{अक्ष}+\text{ब})(२\text{अक्ष}+\text{ब})+४\text{अक}-\text{बब}}{४\text{अ}}$$

$$\frac{\text{क्षक्षक्ष}-\text{ययय}}{\text{क्षक्ष}-\text{यय}}=\frac{\text{क्षक्षक्ष}+\text{क्षक्षय}+\text{क्षयय}+\text{ययय}}{\text{क्षक्ष}+\text{क्षय}+\text{यय}}$$

$$\frac{\text{क्ष}+\text{अ}}{\text{क्ष}+\text{ब}}=\frac{\text{क्षक्ष}+(\text{अ}+\text{क})\text{क्ष}+\text{अक}}{\text{क्षक्ष}+(\text{ब}+\text{क})\text{क्ष}+\text{ब}+\text{क}}$$

जेव्हां बीजांत एकरूप अक्षराचीं अनेक पदें असतील तेव्हां त्यांस संक्षेपें करून अधिक सरळ रूपांत आणितां येतील. जसें

अ+१२अ−३अ−६अ+२अ−अ=५अ

या वरचे शेवटील उदाहरणांमध्यें सर्व अधिक पदांची बेरीज मिळवून १५ अ होतात, आणि त्यांतून पहिले अ तीन वेळा, दुसरे अ ६ वेळा, आणि तिसरा अ १ वेळा, ह्मणजे सर्व मिळून १० वेळा; ह्मणजे १० अ वजा करायाचे आहेत; अशानें १५ अ−१० अ=५ अ होतात.

त्याच प्रमाणें अ+ ब−३ अ+४ ब=५ ब−२ अ कांकीं ब आणि ४ ब मिळविले असतां ५ ब होतात, याशी अ मिळविला आहे. आणि नंतर त्यांतून ३ अ वजा केले आहेत. परंतु, पहिला अ मिळवून नंतर ३ अ वजा केले असतां, आणि अ नमिळवितां केवळ २ अ वजा केले, तर हीं दोन्हीं बरोबर आहेत. ह्मणजे त्यांस हें रूप होतें

अ+५ ब−३ अ=५ ब−२ अ

उदाहरणें.

अ+ अब−२ अब+४ अ+६ अ=११ अ−अब

२क्षक्ष+६क्ष−४क्ष − क्षक्ष+क=क्षक्ष+२क्ष+क

३ क्ष − १५ + $\frac{१}{२}$ क्ष − क्ष − ७ = २$\frac{१}{२}$ क्ष − २२

क्ष + य + क्ष − य + ३ क्ष = ५ क्ष

कोणत्येही पद्धतीमध्यें क्ष य हीं अक्षरें सर्व पदांमध्यें साधारण असतील जसें,

+६ क्ष य, − क्ष य, +४ क्ष य, +२ क्ष य, −११ क्ष य, −१२ क्षय, जे क्ष य या वेगवेगळ्या सर्व पदांची किंमत जें एक पद दाखवितें तें याप्रमाणें काढलें जातें; क्ष य या अधिक पदांची बेरीज १२ आहे, आणि उण्ये पदांची बेरीज २४ आहे. तर सर्व अधिक पदांची बेरीज, आणि तितक्येच उण्ये पदांची बेरीज टाक, त्य-

मग संक्षेपरूप होत नाही. उदाहरण; अ अ + अ या पदाचें संक्षेपरूप होत नाही. असें पद २अ नव्हे, किंवा २अ अ, किंवा अ अ अ, असेंही नव्हे; तर तें हें आहे, अ घेतला अ वेळा अधिक अ घेतला एक वेळा, यास्तव हें आहे अ घेतला अ+१ वेळा, अथवा (अ+१) अ. हेंही त्याचें दुसरें रूप आहे, ह्मणजे (अ+१) घेतला अ वेळा, अथवा अ (अ+१), वर १५ वें पृष्ठ पाहा ह्मणजे ध्यानांत येईल.

याप्रमाणें बीजकृतीनें अ+अ या दोन पदांचा २अ, असा एक पदरूप संक्षेप होतो, परंतु अ अ+ अ या पध्दतीचा संक्षेप त्याप्रमाणें होत नाहीं, आणि बीजानें त्यास कांहींच संक्षेपरूप देववत नाहीं. आणि अंकगणितरीतीनें त्यास संक्षेपरूप देतां येतें परंतु, जोंपर्यंत अ कोणत्ये अंकस्थळीं घेतला, हें समजे पावेतों संक्षेप होत नाहीं.

अ+ब यामध्यें अ, किती वेळा जातो? एथें बमध्यें अ किती वेळा जातो हें इतकें जाणल्यावांचून या प्रश्नाचें उत्तर देववत नाहीं; यामुळें अ+ब यांत अ किती वेळा जातो. तेव्हां हें केवळ $\frac{अ+ब}{अ}$, अशी बीजरूप पद्धतीनें दाखविलें जातें. परंतु शिकणारानें लक्षांत आणिलें पाहिजे, कीं, हें प्रश्नाचें उत्तर नाहीं, परंतु प्रश्नानें उत्तर दाखविण्यासाठीं अशी एक बीजरीति योजिली आहे.

मअ−नअ यामध्यें अ किती वेळा जातो? एथें, म आणि न या दोहोंचे अंकांची किंमत जाणल्यावांचून, वरचे प्रश्नाचें उत्तर बरोबर देववत नाहीं; तथापि मअ आणि न अ यांचा बीजअर्थ साहा यानें बीज पद्धतीचें उत्तर त्या गणित पद्धतीचे उत्तराजवळ जवळ एक पायरी आलीकडे आणितें, तशानें $\frac{मअ-नअ}{अ}$ या रूपाशिवाय दुसरे रूपानें लिहितां येतें, कां, स्पष्ट आहे कीं न वेळा म ——— वजा केली असतां म−न वेळा राहाते ——— ——— ———

ळा जातो.

वर सांगितल्या गोष्टी बीजगणितांतील सर्व कृती करित्येसमयीं लक्ष्यांत ठेविल्या पाहिजेत. ८ अ+५अ हे किती किमतीचे आहेत? एथे अ कोणत्ये अंकस्थानीं घेतला आहे, हें जाणल्यावांचून, अशो प्रश्नाचें उत्तर देववत नाहीं; परंतु ८ अ+५अ यांचें अतिसंक्षेप बीजरूप काय आहे? असा प्रश्न केला तर, उत्तर हेंच कीं, १३अ. आणि बीजांतील मिळवणी, वजाबाकी, गुणाकार, इत्यादिकांचा कृती बीजपद्धतीस एकरूपांतून दुसरें अधिक संक्षेपरूप देण्याचा रीति दाखवितात. उदाहरण अ+ब आणि अ−ब यांची बेरीज काय आहे? हें बीजरीतीनें विस्तारें लिहिलें असतां, त्यास या प्रमाणें पहिलें रूप होईल; जसें

(अ+ब)+(अ−ब)

परंतु यांचें सर्वांपेक्षां संक्षेपरूप २अ आहे; आणि २अ, असें संक्षेपरूप केल्यानें, त्या कृतीस बीजगणिताची मिळवणी ह्मणतात.

## मिळवणी.

क+ई यास अ+ब याशीं मिळवायाची इच्छा आहे. जर अ+ब यास क मिळविला, तर अ+ब+क होतो, परंतु इतकेंच केल्यानें पूर्ण मिळवणी झाली नाहीं; कांकीं मिळवायाचें परिमाण केवळ क नाहीं, तर क+ई इतकें परिमाण आहे. यामुळें अ+ब+क+ई हीच पूर्ण मिळवणी झाली. अथवा

(अ+ब)+(क+ई) = अ+ब+क+ई . . . . . (१)*

अ+ब यास क−ई मिळविणें असल्यास, प्रथम क मिळवून, अ+ब+क होतात. परंतु असें केल्यानें, बेरीज अधिक झाली, कां कीं, क पासून ई वजा करून बाकी मात्र मिळवायाची. ह्मणून बेरिजेंतून ई वजा करून ती बेरीज शुद्ध कर, ह्मणजे अ+ब+क−ई असें होईल.

---

* जेव्हां वर दिलेल्या समीकरणासारिख्या समीकरणाची गरज पुढें लागेल, तेव्हां, त्यास लौकर आणायासाठीं, त्या समीकरणासमोर एक अंक किंवा अक्षर वर प्रमाणें (१) अशी खूण करितात.

(अ+ब)+(क−ई)=अ+ब+क−ई ........ (२)

(१) आणि (२) या पद्धतींस अधिक संक्षेपरूप देणें अशक्य. आतां हीं पुढील उदाहरणें तपासावीं.

अ+ब यांस अ−ब मिळीव,

(अ+ब)+(अ−ब)=अ+ब+अ−ब=२अ.

३क्ष−अ यास २अ−क्ष मिळीव

(३क्ष−अ)+(२अ−क्ष)=३क्ष−अ+२अ−क्ष=२क्ष+अ.

अब−ब यास २अब+क−६ब मिळीव

उत्तर २अब+क−६ब+अब−ब, अथवा ३अब+क−७ब

वरचे आणि त्यासारिख्या कृतीवरून, मिळवणीची रीति याप्रमाणें निश्चित होत्ये:

रीती. **एक पद्धती वांचून, बाकी दुसऱ्या सर्व पद्धतींचे प्रथम पदांपुढें + हें चिन्ह कर; आणि असें मनांत आण कीं त्यांचा समुदाय एकच पद्धती आहे. नंतर अक्षरांविषयीं सरूप पदांचा संक्षेप होईपर्यंत कर.**

## उदाहरण.

अ−ब+३क−अब

४अब−ब+२अ−क्ष

४क्ष+६अ+अब−७

यांची मिळवणी कर.

उत्तर ९अ−२ब+४अब+३क+३क्ष−७

या पुढील उदाहरणांच्या बेरिजा घे.

| | | |
|---|---|---|
| अ–ब | अ–२ब | अ+मअ–४ |
| ब–क | ब–२क | ६–अ+२मअ |
| क–ड | क–२ड | १२मअ–१२–३अ |
| ड–क्ष | ड–२क्ष | प+अ–$\frac{१}{२}$ |
| अ–क्ष | अ–ब–क–ड–२क्ष | १५मअ–२अ–१०$\frac{१}{२}$+प |

(१) आणि (२): यांपासून ही पुढील रीती निघत्ये:

**जेव्हां कुंडलींतल्ये पत्थतीचे पूर्वी बाहेर + चिन्ह मांडिलें असतें. तेव्हां कुंडलीचा रेघा पुसून टाकून पत्थतीचे किमतींत फेर पडत नाहीं.**

अ+(ब+क–ई) = अ+ब+क–ई

## वजाबाकी.

अ यांतून ब+क वजा कर. अ यांतून प्रथम ब, वजा केला तर अ–ब होतो, परंतु इतकेंच केल्यानें वजाबाकीची कृती पुरी झाली नाहीं, कांकीं ब, यांत क मिळविला पाहिजे, आणि नंतर त्यांची बेरीज अ यांतून वजा केली पाहिजे. यामुळें कही वजा केला पाहिजे, तेणेंकरून हें रूप होईल अ–ब–क, अथवा

अ–(ब+क) = अ–ब–क · · · · · · (३)

अ यांतून ब–क वजा कर. ब वजा केला, तर अ–ब होईल, परंतु केवळ असें केल्यानें क अधिक वजा केला असें झालें; अथवा खरे किमतीपेक्षां अ–ब, हा क याणें उणा आहे. यामुळें, खरी किंमत अ–ब+क ही आहे, अथवा

अ–(ब–क) = अ–ब+क · · · · · (४)

वरचे गोष्टीप्रमाणें, हीं पुढील कित्येक उदाहरणें आहेत:

अ+ब—(अ—ब)=अ+ब—अ+ब=२ब

मक्ष—(क—३मक्ष)=मक्ष—क+३मक्ष=४मक्ष—क

**कुडलींत अनेक पदें असतील, आणि कुंडलीचे बाहेर पूर्वी—चिन्ह असेल, तर कुंडलींतील सर्व पदांचीं चिन्हें बदल केलीं, ह्मणजे + यास — केलें, आणि — यास + केलें, तर ती कुंडली पुसून टाकितां येत्ये.**

ही गोष्ट (३) आणि (४) यांपासून उघडी स्पष्ट होत्ये.

ही वर सांगीतली रीति मनांत पक्की ठेविली नाहीं, तर, ती अनास्था चूक करण्याचें कारण होत्ये; तर ही चूक नवे शिकणारेच करितात असें नाहीं, परंतु अधिक शिकलेलेही, ही चूक करितात. ह्मणून लक्षांत येण्याकरितां ती रीति मोठे अक्षरानें वर लिहून दाखविली आहे. आणि नवे शिकणाराचे मनांत ही गोष्ट अधिक ठसायासाठीं, त्यास कळलें पाहिजे कीं, या रीतीची अनास्था करणें ह्मणजे वेडेपणाचा पुढील गोष्टी कबूल केल्याप्रमाणें होतील; ह्मणजे, सर्व कर्जे मिळकती आहेत असें होईल, आणि सर्व प्राप्ती तोटा असें होईल; कर्ज सोडणें ह्मणजे उपद्रव देणें, आणि जसा जसा मनुष्यास लुटावा तसा तसा तो द्रव्यवान होतो; आणि याप्रमाणें मिथ्या वेड्या वेड्या दुसऱ्या हजारों गोष्टी होतील.

पूर्वील रीतीचा दुसरा ताळा पुढें सांगतों. जर पुढील पद्धती काय आहेत; हें जाणण्याची इच्छा असेल ह्मणजे,

अ—(ब+क—प—क)······(७)

तर स्मरण ठेविलें पाहिजे, कीं जरीं भलतीं दोन परिमाणें एक सारिखींच वाढविलीं, तरी त्यांची वजाबाकी पहिल्ये शुद्ध परिमाणाचे वजाबाकी बरोबर होईल: या सांगीतल्याप्रमाणें अ+क्ष आणि ब+क्ष यांची वजाबाकी अ आणि ब याचे वजाबाकी बरोबर आहे. वरचे उदाहरणांत असें दाखविलें कीं, अ यांतून हें उणें क-

रायाचें ह्मणजे,

ब+क−प−क्ष असें होईल

अ याशीं, आणि ब+क−प−क्ष, याशीं ही (प+क्ष) हे वेगवेगळे मिळून, याप्रमाणें होईल. अ+(प+क्ष) उणें

(ब+क−प−क्ष)+(प+क्ष)

अथवा ब+क−प−क्ष+प+क्ष अथवा ब+क

ह्मणजे अ−(ब+क−प−क्ष) याजबरोबर आहे.

अ+प+क्ष−(ब+क) अथवा अ+प+क्ष−ब−क

अथवा अ−ब−क+प+क्ष ...... (घ)

(ग) आणि (घ) ह्या खुणेचा वर्चा दोन पद्धती ताडून पाहातां ही रीति खरी आहे असें स्पष्ट दिसतें.

वजाबाकीची रीति या पुढील प्रमाणें आहे.

रीति. **जी पद्धती वजा करायाची आहे तीचे प्रथम पदास + हें चिन्ह आहे, असें मनांत आण; नंतर त्याच पद्धतीचे दुसऱ्या सर्व पदांचीं चिन्हें बदल कर, ह्मणजे + यास − कर, आणि − यास + कर, नंतर जिचीं चिन्हें अशीं बदल केलीं ती पद्धती जा पद्धतींतून वजा करायाची आहे तिशीं जोडावी; नंतर होईल तितका संक्षेप कर.**

अ+ब−क−क्ष+२ज्ञ+३अब−१४ यांतून

क−२अ+क्ष+ज्ञ−४अब+२½ हे वजा कर

३अ+ब−२क−२क्ष+ज्ञ+७अब−१६½ ही बाकी

| | | | |
|---|---|---|---|
| अ+क | क्ष+य−३−अ | अ−ब+क−ड+ई | यांतून |
| २क−अ | क्ष−य+३−अ | अ−२ब+क+ड−ई | हे वजा कर |
| २अ−क | २य−६ | ब−२ड+२ई | ही बाकी |

अ+ब+२क+३ड+४ई−५फ−६ग यांतून
१२ड+४ई−३क+२अ+ब−ग+फ हे वजा कर
५क−९ड−६फ−५ग−अ बाकी

अ−(ब−(क+क्ष))+(ब−(क्ष−२ब))

हें काय आहे?

कुंडली काढून टाकण्याची जी रीति सांगीतली आहे तिजपासून हें रूप होतें,

अ−ब+(क+क्ष)+ब−(क्ष−२ब)

याच रीतीनें,याचा ही रूपभेद होतो.

ह्मणजे अ−ब+क+क्ष+ब−क्ष+२ब=अ+क+२ब

हीं पुढील उदाहरणें करून दाखीव.

अ−{अ−(अ−(अ−क्ष))}=क्ष

अ−{ब−(अ−(ब−क्ष))}=२अ−२ब+क्ष

पूर्वी,जें वर सर्व सांगीतलें,त्यावरून समजात आलें कीं,बीजगणित पद्धतीची मिळवणी आणि वजाबाकीचीं,वेगळालीं पदें,कशीं ही क्रमानें मांडिलीं,तरी त्यांत कांहीं अंतर पडणार नाहीं;तर या पुढील पद्धतीचें शक्य अथवा अशक्य रूप आहे किंवा नाहीं,याविषयीं कांहींच लक्षांत आणायाची गरज पडणार नाहीं.१४ आणि १५ वें पृष्ठ पाहा ह्मणजे समजेल,परंतु शक्य किंवा अशक्य रूप हीं दोन्हीं सारिखींच असें मनांत आणवेल.जसें यांत,३−७+८,तर एथें जो वजा करायाचा आहे,तो पहिल्यानेंच अगत्य वजा करावा असें मनांत आणणार नाहीं,आणि यासाठीं अशी पद्धती अशक्य रूपाची ह्मणून कामांत आणवत नाहीं,असें ही मनांत आणणार नाहीं; परंतु पदांचा क्रम कसा ही मांडला तरी त्याची कांहीं चिंता नाहीं;असें मानून,वरचें उदाहरण याप्रमाणें आहे असें समजात घेईल,जसें ३+८−७,याप्रमाणें ही गोष्ट दुसरे सर्व पद्धतींस साधारण लागत्ये. जर मिळवणी आणि वजाबाकीचे कृतीसाठीं पदांचे रचनेचे शक्यपणाविषयीं कांहीं अगोधर विचार करा-

शक्य रूपानें पदें मांडिलीं असतां त्याचें निष्पन्न वरचा प्रमाणें होईल,ह्मणून हें खालीं पहा

$$१२-(३+८-७)=१२-३-८+७=८$$

## गुणाकार आणि भागाकार.

बीजगणिताचे पदांशीं गुणाकार आणि भागाकार करतेसमयीं, नेहमी लक्षांत ठेवावें,कीं जीं अक्षरें कामांत घेतात, तीं पूर्ण किंवा अपूर्णांक दाखवितात. अपूर्णांक गणितामध्यें ज्याचे अंश आणि छेद वेगवेगळे पूर्णांक आहेत,त्यांचे मिळवणी इत्यादिकांचे रीतीविषयीं अंकगणितांत जें सांगीतलें आहे तें प्रथम आपण येथें दाखविलों.

जेव्हां अ आणि ब हे पूर्णांक आहेत,तेव्हां हे सर्व पुढील प्रश्न ज्यांचा अर्थ एकच आहे,त्याचें उत्तर $\frac{अ}{ब}$ हें होईल. हें पाहा

१. जर एक एक ब समभागांत विभागिला,आणि त्या भागांतून अ भाग घेतले, तर ते किती एकं किंवा एकंचे भाग होतील?

२. अ याचे ब भागांत किती एकं किंवा एकंचे भाग आहेत?

३. अ यामध्यें ब किती वेळा किंवा वेळेचें भाग जातात? याप्रमाणें $\frac{३}{७}$ ह्मणजे एकंचा एक सप्तमांश तीन वेळा घेतला असें दाखवितें, तर **तीन याचा सातवा भाग काय आहे?** आणि **तीन यामध्यें सात एका वेळेचे किती भाग जातात?** या दोन प्रश्नांचें उत्तर $\frac{३}{७}$ आहे.

जेव्हां अपूर्णांकाचे अंश आणि छेद हे दोनही अपूर्णांक आहेत, तेव्हां मागील सांगीतल्याप्रमाणें त्या अपूर्णांकाचा अर्थ बोलण्याचे रीतीप्रमाणें सांगाया पडतें.उदाहरण,जेव्हां अ ३आणि ब ७,आहेत तेव्हां त्यास $\frac{अ}{ब}$ असें रूप

देउन सांगण्यास, कठिण पडत नाहीं; परंतु अ $२\frac{१}{२}$ आणि ब $\frac{४}{९}$ असें अपूर्णांकाचें रूप $\frac{अ}{ब}$ असें असलें तर भाषेनें त्याचा अर्थ सांगायास कठीण पडतें. कल्पना कर, कीं काहीं विशेष एक एकं घेतला, ह्मणजे १ कोस आहे असें ह्मण.

## उदाहरणें.

कोसाचे $\frac{३}{७}$ काय आहेत?
उत्तर हेंच; एक कोस सात समभागांत विभागून त्यांतून तीन भाग घे.

कोसाचे $\frac{२\frac{१}{२}}{\frac{४}{९}}$ हे काय आहेत?
उत्तर हेंच; (**एक कोस $\frac{४}{९}$ समभागांत विभागून**) त्या भागाचे $२\frac{१}{२}$ घे.

वर दुसऱ्या उदाहरणांतल्ये उत्तरांत जे शब्द मोठ्ये अक्षरांनी लिहिले ते असमजुतीचे आहेत, आणि जरी त्यांनां अर्थ नाहीं; तथापि त्यांचा समजा याजोगा काहीं एक अर्थ दिला जाईल. जेव्हां ७ याचा ठिकाणीं $\frac{४}{९}$, आणि ३ याचा ठिकाणीं $२\frac{१}{२}$ मांडिले, तेव्हां वरचे दोन उदाहरणांतून, प्रथम उदाहरणाचा अर्थ फिरविल्यावांचून, उच्चारण्याची रीति मात्र बदल केल्यानें, समजुतींत येई अशी बोलण्याची रीति काढवेल. या पुढील प्रमाणें.

अशी एक लांबी घे, कीं ती ७ वेळा घेतली असतां एक कोस होईल, नंतर ती प्रथम घेतलेली लांबी ३ वेळा घे.

अशी एक लांबी शोधून घे, कीं ती एक वेळेचे $\frac{४}{९}$ घेतली असता एक कोस होईल नंतर ती प्रथम घेतलेली लांबी $२\frac{१}{२}$ वेळा घे.

आतां $२\frac{१}{२} \div \frac{४}{९}$ ह्मणजे $\frac{४५}{८}$ कोस, अथवा $५\frac{५}{८}$ कोस होतात, जी घेतलेली लांबी तिचे नउ भाग करून त्यांतले चार भाग घेतले असतां एक कोस बरोबर असेल तर ती पहिली घेतलेली लांबी $२\frac{१}{२}$ वेळा घेतली तर $५\frac{५}{८}$ कोस होत्ये; हें गणित रीतीनें शिकणारास स्पष्ट समजेल. आणि जर याप्रमाणें प्रश्न केला कीं, $२\frac{१}{२}$ **यामध्यें $\frac{४}{९}$ किती वेळा किंवा वेळेचे भाग जातात**, तर त्याचें उत्तर $५\frac{५}{८}$ हेंच आहे.

बीजगणितांत अक्षरांविषयीं बोलण्याची जी रीति कामांत आणितात,

असा प्रश्न केला असतां याप्रमाणें सर्वदां उत्तर दिलें जाईल :— य यास क्ष समभागांत विभाग; तेव्हां प्रत्येक भागामध्यें जितके रुपये आहेत, तितके रुपये एक बिघ्याची किंमत होईल. ह्मणून जर १८ बिघ्यांची किंमत ३६ रुपये आहेत, तर ३६ सांचा १८ वा भाग २ रुपये आहेत, याजकरितां एक बिघ्याची किंमत २ रुपये आहेत. परंतु जर एक बिघ्याचा $\frac{१}{२}$ याची किंमत २$\frac{१}{२}$ रुपये आहेत, आणि जर असें ह्मटलें कीं २$\frac{१}{२}$ यास $\frac{१}{२}$ समभागांत भागायाचें, तर त्याचा अर्थ खचित याच बोलण्याप्रमाणें आहे, कीं २$\frac{१}{२}$ **यांस २ वेळा घे,** अथवा गणित रीती प्रमाणें २$\frac{१}{२}$ यांस $\frac{१}{२}$ याणीं भाग. आतां; भलतें कांहीं परिमाण $\frac{१}{१०}$ समभागानीं भाग, हें आणि त्याच परिमाणास १० वेळा घे, हीं दोन्हीं एकच आहेत, असें ह्मणणें, पहिल्या लक्ष्यानें जरी उपहास्य दिसतें, तथापि कांहीं परिमाण १० समभागांत भागून त्यांतून एक भाग घेणें अशी कृती, आणि तेंच परिमाण $\frac{१}{१०}$ याणीं गुणणें हीं दोन्हीं एकच आहेत; या गोष्टीसारिखें पूर्वीं कांहीं काम केलें आहे ही गोष्ट स्मरणांत ठेविली पाहिजे, आणि याशिवाय दुसरी ही पुढील गोष्ट स्मरणांत ठेविली पाहिजे, कीं जेव्हां असें ह्मणतों जर क्ष बिघ्याला य रुपये पडतात, तर य यास क्ष समभागांत भागिल्यानें एक बिघ्याची किंमत सांपडत्ये, तेव्हां ह्या गोष्टीवरून वरचें उपहास्य नाहीं असें झालें. कांकीं पूर्णांकांचे किंवा अपूर्णांकांचे स्थळीं अक्षरें मांडिलीं जातात.

अपूर्णांकाचे आश्रयानें त्रिराशींतील अनेक प्रश्न शिकणारानें उलगडून काढावे, हें काम त्यास फार उपयोगी आहे; ह्मणून पहिल्यानें त्या अपूर्णांकाचे प्रश्न पूर्णांकाचे आश्रयानें पडताळून पाहावे. मग नुसते आपल्ये विचारानें सिद्ध क-

१. जर ६ गजांची किंमत ७ रुपये असेल तर ५ गजांस काय किंमत पडेल?

जसें ६ गज ५ गजांस आहेत, तसे ७ रुपये यांस आहेत, ह्मणजे $\frac{७\times५}{६}$ अथवा ५$\frac{५}{६}$ रुपये आहेत. हें उत्तर.

जर एक गजाचे $\frac{२}{३}$ यांची किंमत एक रुपयाचे $\frac{५}{७}$ असेल, तर एक गजाचे $\frac{४}{९}$ याची किंमत काय असेल?

जसें एक गजाचे $\frac{२}{३}$ एक गजाचे $\frac{४}{९}$ शांश आहेत, तसें एक रुपयाचे $\frac{५}{७}$ यांस आहेत, ह्मणजे $\frac{\frac{५}{७}\times\frac{४}{९}}{\frac{२}{३}}$ अथवा एक रुपयाचे $\frac{१०}{२१}$. हें उत्तर.

२. जर, एक गजाचे $\frac{२}{३}$ याची किंमत एक रुपयाचे $\frac{५}{७}$ असेल तर · · ·

जर, २ गजांची किंमत एक रुपयाचे $\frac{५}{७}\times३$ अथवा $\frac{१५}{७}$ असेल तर · · ·

जर, १ गजांची किंमत एक रुपयाचे $\frac{१५}{७}\div२$ अथवा $\frac{१५}{१४}$ असेल तर · · ·

जर, ४ गजांची किंमत एक रुपयाचे $\frac{१५}{१४}\times४$ अथवा $\frac{३०}{७}$ असेल तर · ·

जर, एक गजाचे $\frac{४}{९}$ यास एक रुपयाचे $\frac{३०}{७}\div९$ अथवा $\frac{१०}{२१}$ असेल तर · ·

ज्या रीती पूर्णांकांचे संबंधानें अपूर्णांकांविषयीं लागतात, त्या शिकणारास पूर्वींच माहीत झाल्या आहेत; तर त्याच रीती आतां बीजरूपानें मांडितों. पहिल्यानें, पूर्णांकाचे स्थळीं अक्षरें घेतलीं, असें मानून

$$\frac{अ}{ब}=\frac{मअ}{मब} \qquad \frac{अ}{ब}+\frac{क}{ड}=\frac{अड+बक}{बड}$$

$$अ+\frac{ब}{क}=\frac{अक+ब}{क} \qquad \frac{अ}{ब}-\frac{क}{ड}=\frac{अड-बक}{बड}$$

$$अ-\frac{ब}{क}=\frac{अक-ब}{क} \qquad \frac{अ}{ब}-क=\frac{अ-बक}{ब}$$

$$\frac{अ}{ब}\times क=\frac{अक}{ब} \qquad \frac{अ}{ब}\times\frac{क}{ड}=\frac{अक}{बड}$$

$$\frac{अ}{ब}\div क=\frac{अ}{बक} \qquad क\div\frac{अ}{ब}=\frac{बक}{अ}$$

$$\frac{अ}{ब}\div\frac{क}{ड}=\frac{अ}{ब}\times\frac{ड}{क}=\frac{अड}{बक}$$

शिकणारानें वरचे प्रत्येक समीकरणाची वळख करून घेतली पाहिजे, आणि जर शिकणारा अपूर्णांकाचे वेगळाल्ये कृतींविषयीं माहीत असेल, तर त्याला

तीं समीकरणें समजण्यास सोपें पडेल. जसें या पुढील उदाहरणांत $\frac{\text{अ}}{\text{ब}}\times\frac{\text{क}}{\text{ड}}=\frac{\text{अक}}{\text{बड}}$, यावरून शिकणारास अपूर्णांक गणितांतील रीतीची वळख येईल, **एक अपूर्णांक दुसऱ्ये अपूर्णांकाने गुणायाचा असल्यास, अंश अंशानी गुणून ते नवे अंश होतील, आणि छेद छेदानीं गुणून ते नवे छेद होतील.**

जेव्हां अक्षरें, अपूर्णांकाचे ठिकाणीं कामांत घेतलीं आहेत तेव्हां वरची रीति त्यावर ही लागू पडत्ये. हें दाखविण्यासाठीं एक उदाहरण करून दाखवितों. $\frac{\text{अ}}{\text{ब}}=\frac{\text{मअ}}{\text{मब}}$. आतां अ,चे ठिकाणीं $\frac{\text{प}}{\text{क}}$, ब,चे ठिकाणीं $\frac{\text{र}}{\text{स}}$ आणि म,चे ठिकाणीं $\frac{\text{क्ष}}{\text{य}}$, घे, आणि असें मनांत आण कीं, प,क,र,स,क्ष,आणि य,हे सर्व पूर्णांकाचे ठिकाणीं आहेत. तर

$$(\text{गणित रीतीने})\ \frac{\text{अ}}{\text{ब}}=\frac{\frac{\text{प}}{\text{क}}}{\frac{\text{र}}{\text{स}}}=\frac{\text{पस}}{\text{कर}}$$

$$\text{मअ}=\frac{\text{क्ष}}{\text{य}}\times\frac{\text{प}}{\text{क}}=\frac{\text{क्षप}}{\text{यक}}\qquad \text{मब}=\frac{\text{क्ष}}{\text{य}}\times\frac{\text{र}}{\text{स}}=\frac{\text{क्षर}}{\text{यस}}$$

$$\frac{\text{मअ}}{\text{मब}}=\frac{\frac{\text{क्षप}}{\text{यक}}}{\frac{\text{क्षर}}{\text{यस}}}=\frac{\text{क्षयपस}}{\text{क्षयकर}}$$

$$\text{परंतु}\ \frac{\text{क्षयपस}}{\text{क्षयकर}}=\frac{(\text{क्षय})\times\text{पस}}{(\text{क्षय})\times\text{कर}}=\frac{\text{पस}}{\text{कर}}$$

म्हणून $\frac{\text{मअ}}{\text{मब}}=\frac{\text{अ}}{\text{ब}}$. या उदाहरणांत अ,ब,म, हे सर्व अपूर्णांक आहेत.

पूर्वीं गणितांत सांगितलें गेलें आहे कीं, पूर्णांकांचे किंवा अपूर्णांकांचे उदाहरणांत, फळांत अंतर पडल्याशिवाय, गुणाकार, किंवा, भागाकार यांचे क्रम फिरवितां येतील. जेव्हां गुणाकार आणि भागाकार, या दोहोंविषयीं, बोलावयाचें आहे, तेव्हां त्यांचे भेदावर लक्ष्य ठेवण्याचें प्रयोजन नाहीं; कांकीं अ, याणें

भागावें आणि $\frac{१}{अ}$ याणी गुणावें हीं दोन्हींही एकसारिखींच आहेत. या पुढील सांगितल्ये उदाहरण समुदायावर लक्ष्य ठेविलें पाहिजे, आणि वेगवेगळाले गुणाकार पर्यायानें पुनःपुनः करून सिद्ध केले पाहिजेत.

१. अ, ब, क, आणि ड, यांचा गुणाकार; २. अब आणि कड, यांचा गुणाकार; ३. अक आणि बड, यांचा गुणाकार; ४. अड आणि बक, यांचा गुणाकार; ५. अबक आणि ड, यांचा गुणाकार; ६. अबड आणि क, यांचा गुणाकार; ७. अकड आणि ब, यांचा गुणाकार; ८. बकड आणि अ, यांचा गुणाकार, ह्मणून कोणत्येही क्रमानें अक्षरें मांडिलीं तरी त्या सर्वांचा गुणाकार अबकड या पदाबरोबर आहे.

एकेरी पदांचे गुणाकार करून त्या गुणाकार पदांचीं अक्षरें कशीही क्रमानें मांडितां येतील, आणि जर त्या पदांस कांहीं गुणकांक जोडिला असेल तर ते अंक परस्पर गुणून गुणाकार मांडावा. नुसते दोन अंक असल्यास त्यांचा मध्यें × हें चिन्ह करावें लागतें. जसें. २अब × ४कड, हे या पुढील वेगळाल्ये रीतीनें मांडतां येतात;

२अब४डक  २×४अबकड  ८अकबड  ८अबकड, इत्यादि.

पदांचे आरंभीं गुणकांक मांडावे हें सोयीचें आहे, आणि पदांचीं एक जातीचीं अक्षरें एकत्र मांडावीं हें ही सोईवार पडतें. ह्मणून

२अअब × ३अबबक, हे, ६अअअबबबक. याप्रमाणें मांडितात.

१२अबक्ष × ४अबक्षक्ष = ४८अअबबक्षक्षक्ष, ३अबक × $\frac{१}{२}$अब = $\frac{३}{२}$ अअबबक

जेव्हां अपूर्णांक परस्परांचे जवळ जवळ, किंवा एका अक्षराजवळ मांडिले असतात, तेव्हां ते परस्परांचा गुणाकार आहे असें आणवितात. जसें. याप्रमाणें २$\frac{अ}{ब}$क$\frac{ई}{फ}$ यांचा अर्थ, २×$\frac{अ}{ब}$×क×$\frac{ई}{फ}$ अथवा, २ $\frac{अकई}{बफ}$ हा आहे.

जरी अ, अब, अबक, इत्यादि, यांस पूर्ण, आणि $\frac{अ}{ब}$, $\frac{क}{ड}$, $\frac{अक}{ब}$, इत्यादि, यांस, अपूर्ण पदें ह्मणतात, तें ह्मणणें त्यांचे अंकगणित गुणाविषयीं नाहीं, परंतु बीजगणित गुणाविषयीं आहे; कांकीं, अपूर्णांकाचे ठिकाणीं अक्षरें मांडिलीं जातात, तर जें बीजरूपानें मनन केलें असतां पूर्ण होतें, तेंच अंकगणित रूपानें

मनन केलें असतां अपूर्ण होतें; आणि याप्रमाणें याचें उलटें ही होतें. उदाहरण, अशी कल्पना कर, कीं अ हा $\frac{१}{२}$ याचे ठिकाणीं घेतला, आणि ब हा $\frac{१}{४}$ याचे ठिकाणीं घेतला, तर अ हा जो बीजरूपानें पूर्ण पद आहे तोच गणित रूपानें $\frac{१}{२}$ अपूर्ण पद होतो; परंतु, $\frac{अ}{ब}$ हें बीज रूपानें जें अपूर्णपद तें अंकगणित रूपानें $\frac{१}{२} \div \frac{१}{४} = २$, पूर्ण पद होतें.

यामुळें, पूर्ण किंवा अपूर्ण पदांविषयीं बोलणें पडलें, तर नेहमी त्याचे बीजरूपावर लक्ष्य ठेवावें, त्यांचे गणित किमतीचा विचार करूं नये.

या पुढील समीकरणांमध्यें जी रीति लक्षांत येत्ये, ती रीति बीजांतल्ये पदांचा गुणाकाराचा आधार आहे:

$$म\,(अ+ब) = मअ + मब$$

$$म\,(अ-ब) = मअ - मब$$

पहिल्यानें, हेंच केलें पाहिजे कीं, अ+ब यांस म वेळा घ्यावा. जर केवळ अ हा म वेळा घेतला, तर स्पष्ट दिसतें, कीं अ जितक्या वेळा किंवा वेळेचे भाग घेतला, तितके वेळा ब किंवा बचे भाग घेण्याचे राहिले. यामुळें म अ हा मब इतक्यानें उणा राहील, तर म अ+म ब हा इच्छिला गुणाकार आहे.

दुसऱ्यानें, याप्रमाणें केलें पाहिजे, कीं अ−ब यास म वेळा घ्यावा. जर केवळ अ हा म वेळा घेतला, तर स्पष्ट दिसतें, कीं अ जितक्या वेळा किंवा वेळेचा भाग घेतला, तितक्यानें ब किंवा बचा भाग अधिक घेतला. यामुळें म अ हा मब इतक्यानें अधिक आहे, तर म अ−म ब हा इच्छिला गुणाकार आहे.

यावरून हें पुढील समीकरण सिद्ध केलें जाईल:

$$म\,(अ+ब-क-ड) = मअ + मब - मक - मड$$

म्हणून: अ+ब, यांचे ठिकाणीं, प घे; आणि क+ड, यांचे ठिकाणीं, क घे; तर, अ+ब −क−ड हे प−क आहे २५ आणि २६ पृष्ठ पहा.

आणि म (अ+ब−क−ड) = म (प−क्क) = मप−मक्क

परंतु, मप = मअ+मब आणि मक्क = मक+मड

तेव्हां, मप−मक्क = मअ+मब−(मक+मड)

= मअ+मब− मक−मड

या पुढील उदाहरणास मागील सांगीतलेल्या रीती लागू होतात:

$$३(\text{अ}+\text{ब}) = ३\text{अ}+३\text{ब} \qquad ३\tfrac{१}{२}(\text{अ}-\text{ब}) = ३\tfrac{१}{२}\text{अ}-३\tfrac{१}{२}\text{ब}$$

$$\text{अब}\,(\text{अ}-\text{ब}) = \text{अअब}-\text{अबब} \qquad २\text{अ}(\text{अ}-\text{अअ})^{*} = २\text{अअ}-२\text{अअअ}$$

$$३\text{अबक}\,(\text{अब}-\text{अक}+४) = ३\text{अअबबक}-३\text{अअबकक}+१२\,\text{अबक}$$

$$२\left(\frac{\text{क्ष}}{२}+\frac{\text{क्ष}}{३}\right) = \text{क्ष}+\frac{२\text{क्ष}}{३} \qquad ६\left(\frac{\text{क्ष}}{२}+\frac{\text{क्ष}}{३}\right) = ३\text{क्ष}+२\text{क्ष}$$

$$४०\left(\frac{१}{२}-\text{क्ष}\right) = २०-४०\text{क्ष} \qquad \text{अ}\left(\frac{३}{४}+\text{ब}\right) = \frac{३}{४}\text{अ}+\text{अब}$$

$$\frac{\text{अ}}{\text{ब}}\left(\frac{\text{ब}}{\text{अ}}+\text{ब}\right) = \frac{\text{अ}}{\text{ब}}\,\frac{\text{ब}}{\text{अ}}+\frac{\text{अ}}{\text{ब}}\text{ब} = १+\text{अ}$$

$$\frac{\text{क्षय}}{\text{ज्ञ}}(\text{क्षज्ञ}+१) = \frac{\text{क्षक्षयज्ञ}}{\text{ज्ञ}}+\frac{\text{क्षय}}{\text{ज्ञ}} = \text{क्षक्षय}+\frac{\text{क्षय}}{\text{ज्ञ}}$$

$$\frac{\text{अ}}{\text{अ}+\text{ब}}\left\{\text{क}+\text{ड}-\text{ई}\right\} = \frac{\text{अक}}{\text{अ}+\text{ब}}+\frac{\text{अड}}{\text{अ}+\text{ब}}-\frac{\text{अई}}{\text{अ}+\text{ब}}$$

$$\text{पक्करस}\left(\frac{१}{\text{प}}+\frac{१}{\text{क्क}}+\frac{१}{\text{र}}-\frac{१}{\text{पक्कर}}\right) = \text{क्करस}+\text{परस}+\text{पक्कस}-\text{स}$$

अ+ब यांस क+ड याणीं गुणायासाठीं, क्षण मात्र, अ+ब यांचे ठिकाणीं प, घे. तर प, हा क+ड याणी गुणिला, आणि क+ड हा, प याणीं गुणिला हीं एकच आहेत, ह्मणजे, पक+पड आहे,

(अ+ब) (क+ड) = (अ+ब) क+ (अ+ब) ड

परंतु (अ+ब) क = अक+बक आणि (अ+ब) ड = अड+बड

∴ (अ+ब) (क+ड) = (अक+बक) + (अड+बड)

= अक+बक+अड+बड.

---

* या उदाहरणांत पद्धती शक्य किंवा अशक्य रूपाची आहे किं नाहीं याविषयीं ही गोष्ट एथें लक्षांत आणिली नाहीं.

अ+ब यांस क−ड याणीं गुणायाचें असेल,तेव्हां अ+ब=प,घे,तर प (क−ड) =पक−पड हें होतें,अथवा

(अ+ब) (क−ड) = (अ+ब) क− (अ+ब) ड

= (अक+बक) − (अड+बड)

= अक+बक−अड−बड

अ−ब यांस क−ड याणीं गुणायाचें असेल,तेव्हां अ−ब=प घे,तर प (क−ड)= पक−पड,अथवा

(अ−ब) (क−ड) = (अ−ब) क− (अ−ब) ड

= (अक−बक) − (अड−बड)

= अक−बक−अड+बड

वरची कृति करण्याचा दोन रीती आहेत,परंतु शिकणारानें सद्यः पहिल्या रीतीवर लक्ष्य द्यावें.

पहिली रीति. अ+ब−२क या गुण्यास ड−अ−क या गुणकानें गुणायाचें.

एथे,गुण्य ड वेळा घेऊन,त्या गुणाकारांतून,तो गुण्य अ वेळा,आणि क वेळा घेऊन,एकामागें एक वेगवेगळे वजा केले पाहिजेत; ह्मणजे गुण्य अ+क वेळा घेऊन,ड वेळांतून वजा करायाचा आहे.

गुण्य ड वेळा = अड+बड−२कड

यांची बेरीज { गुण्य अ वेळा = अअ+अब−२अक
गुण्य क वेळा = अक+बक−२कक

ह्मणजे,गुण्य,अ+क वेळा=अअ+अक+अब+बक−२अक−२कक, हें

गुण्य ड वेळांतून वजा करून बाकी } अड+बड+२अक+२कक−२कड
−अअ−अक−अब−बक

दुसरी रीति. वरचीं उदाहरणें पाहिलीं असतां उघड दिसतें,कीं गुणाकाराची रीति या पुढील प्रमाणें आहे: **गुण्य गुणकाचीं पहिलीं पदें यांस + हें चिन्ह आहे असें मनांत आण; नंतर गुण्याचे प्रत्येक पदाला**

अनुक्रमें गुणकाचे प्रत्येक पदानें गूण, आणि पदें एक जातीचे चि-न्हाचीं असतील, त्यांचे गुणाकाराचे पूर्वी + हें चिन्ह कर, आणि जीं प-दें भिन्न जातीचीं असतील तर, त्याचे गुणाकारा पूर्वी − हें चिन्ह कर.

मागील उदाहरण एथे शिरस्त्याप्रमाणें वरचे रीतीवरून वेगळाल्ये पदापुढें यो-ग्य चिन्हें मांडून, करून दाखविलें आहे.

अ+ब−२क

ड−अ−क

| | | |
|---|---|---|
| ड याणी गुणून······ | अड+बड−२कड | हा इच्छिला गुणाकार आहे. |
| अ याणी गुणून······ | −अअ−अब+२अक | |
| क याणी गुणून······ | −अक−बक+२कक | |

जेव्हां वेगवेगळ्ये ओळीमध्यें एकसारिखींच पदें येतात, तेव्हां मागून त्यांचा संक्षेप करायासाठीं, तरी एकजातीचीं पदें एकाखालीं एक लिहायास सोई पडते, जसें या पुढील उदाहरणांत:

क्षक्ष−२क्ष+१ यांस

क्ष−४ याणीं गुण

| | | |
|---|---|---|
| क्ष याणी गुणून··· | क्षक्षक्ष−२क्षक्ष+क्ष | हा इच्छिला गुणाकार आहे. |
| ४ याणी गुणून···· | −४क्षक्ष+८क्ष−४ | |
| | क्षक्षक्ष−६क्षक्ष+९क्ष−४ | हा अतिसंक्षेपरूप आहे. |

परंतु सद्यः वरचा रीती पेक्षां ही पुढील रीति बरी वाटत्ये:

क्षक्ष−२क्ष+१ यांस

क्ष−४ याणी गुण

| | | |
|---|---|---|
| क्षवेळा गुणून यांतून···· | क्षक्षक्ष−२क्षक्ष+क्ष | पहिले ओळींतून |
| ४ वेळा गुणून······ | ४क्षक्ष−८क्ष+४ | दुसरी ओळ वजा कर |
| | क्षक्षक्ष−६क्षक्ष+९क्ष−४ | हा इच्छिला गुणाकार झाला |

हीं पुढील तीन उदाहरणें मोठ्ये उपयोगाचीं आहेत, यासाठीं शिकणारानें

तीं आणि त्यांसारिखीं दुसरीं उदाहरणें पद्दातांच लिहायास समर्थ असलेंपाहिजे.

अ+ब यांस
अ+ब याणी गुण
अअ+अब यांशि
अब+बब यांस मेळीव
अअ+२अब+बब हा गुणाकार आहे

अ–ब यांस
अ–ब याणी गुण
अअ–अब यांतून
अब–बब यास वजाकर
अअ–२अब+बब हा गुणाकार आहे

अ+ब यांस
अ–ब याणी गुण
अअ+अब यांतून
अब+बब यांस वजा कर
अअ–बब हा गुणाकार

## ह्या पुढील व्याख्या एथे सांगायास योग्य आहेत.

**चौरस** ह्मणजे चार बाजूंची आकृति आहे, त्या चार बाजूंची लांबी बरोबर आहे, आणि जवळजवळच्या बाजू परस्परांवर लंब आहेत.





**घन** ह्मणजे भरींव आकृति आहे, जिच्या मर्यादा साहा समचौरसें आहेत, जसा घडलेला चौरस दगड ज्याची लांबी, रुंदी, आणि जाडी बरोबर आहे.

जें चौरस चार इंच लांबीचें आहे, त्यामध्यें एक एक इंच लांबीचीं ४×४

इतकीं चौरसें आहेत, जें चौरस क्ष इंच लांबीचें आहे, त्यामध्यें एक इंच लांबीचीं, अशीं क्षक्ष इतकीं चौरसें आहेत. चौरस इंचाचा क्ष ओळी आहेत, आणि प्रत्येक ओळीमध्यें क्ष चौरसें आहेत.

जो घन चार इंच लांबीचा आहे, त्यामध्यें एकेक इंच लांबीचे, असे, ४×४×४ इतके घन आहेत; जो घन क्ष लांबीचा आहे, त्यामध्यें एकेक इंच लांबीचे क्षक्षक्ष इतके घन आहेत. घन इंचाचे क्ष, थर आहेत, आणि प्रत्येक थरामध्यें क्षक्ष घन इंच आहेत.

वर दाखविलें कीं, कोणती रेघ भलत्ये क्ष एकंमाचे लांबीवर चौरस केलें असतां क्षक्ष असें ह्मटलें जातें, आणि कोणती रेघ भलत्ये क्ष एकंमाचे लांबीवर घन केला असतां, क्षक्षक्ष असें ह्मटलें जातें. अशा संबंधामुळें, क्षक्ष यांस क्ष याचे चौरस, अथवा वर्ग, आणि क्षक्षक्ष यांस क्षचा घन, असें ह्मणण्याची नेहेमी रीति पडली आहे. परंतु क्षक्षक्षक्ष यांस क्षचा चतुर्घात, आणि क्षक्षक्षक्षक्ष यांस क्षचा पंच घात, इत्यादि ह्मणण्याची रीति आहे. अशानें क्ष नुसता असला तर त्यास क्षचा प्रथम घात, आणि क्षक्ष यांस क्षचा द्वितीय घात, आणि क्षक्षक्ष यांस क्षचा तृतीय घात परंतु वर्ग आणि घन, हे दोन शब्द द्वितीय आणि तृतीय घात यांचे ठिकाणीं ह्मटल्यानें, सोईवार पडतें. यासाठीं असें ह्मणण्याची चाल सोडीत नाहीं.

वरचा तीन उदाहरणांचे गुणाकार या पुढील प्रमाणें मांडले जातात.

१. (अ+ब) (अ+ब) = अअ+२अब+बब

अथवा, **भलते कोणते दोन परिमाणाचे** बेरिजेचा **वर्ग, त्या दोन परिमाणाचे वर्गांची** बेरीज, **त्याच दोन परिमाणाचे गुणाकाराचे दुपटीनें** अधिक वाढविली, **इतक्या बरोबर आहे.**

२. (अ−ब) (अ−ब) = अअ−२अब+बब

अथवा **भलते कोणतेही दोन परिमाणाचे** वजाबाकीचा **वर्ग** न **परिमाणाचे वर्गांची** बेरीज **त्यांच दोन परिमाणाचे गुणाकाराचे दुपटीनें** उणी केली **इतक्या बरोबर आहे.**

३. (अ+ब) (अ−ब) = अअ−बब

अथवा भलते कोणतेही दोन परिमाणांचे बेरिजेस, त्याच परिमाणांचे वजाबाकीनें गुणिलें तर तो गुणाकार त्या दोन परिमाणांचे वर्गांचे वजाबाकी बरोबर आहे.

आतां अब आणि २अ हीं दोन भलतीं परिमाणें आहेत. असें मनांत आण. तर वर सांगीतल्यावरून याप्रमाणें होईल.

अब × अब = अअबब, आणि २अ × २अ = ४अअ

२ (अब × २अ) = ४अअब

(अब+२अ) (अब+२अ) = अअबब+४अअब+४अअ

(अब−२अ) (अब−२अ) = अअबब−४अअब+४अअ

(अब+२अ) (अब−२अ) = अअबब−४अअ

हीं पुढील उदाहरणें शिकणाराचें अभ्यासाकरितां फार उपयोगी आहेत.

$(अ \pm \frac{१}{अ})$ यांचा वर्ग =* $अअ \pm २ + \frac{१}{अअ}$

$(अ + \frac{१}{अ})\ (अ - \frac{१}{अ}) = अअ - \frac{१}{अअ}$

(२अक्ष±ब) यांचा वर्ग = ४अअक्षक्ष±४अबक्ष+बब

(२अक्ष+ब) (२अक्ष−ब) = ४अअक्षक्ष−बब

(अ+ब+क) यांचा वर्ग = (अ+ब) (अ+ब)+२ (अ+ब) क+कक

= अअ+बब+कक+२अब+२बक+२कअ

---

* समीकरणांत ± अशीं चिन्हें समीकरणांत, वारंवार आलीं, तर दोन समीकरणें एकठिकाणीं जोडिलेलीं आहेत असें जाणावें. वरचीं चिन्हें घेण्याचा अनुक्रम धरिला तर शेवटपर्यंत वरचीं चिन्हें धरावीं, आणि खालच्यांचा अनुक्रम धरिला तर शेवटपर्यंत खालचीं धरावीं, जसें

अ±ब = क∓ड

हें अ+ब = क−ड अथवा अ−ब = क+ड याप्रमाणें होईल.

शिकणारानें अशीं द्विरूप चिन्हांनीं काम करूं नये परंतु पुस्तकांत अशीं वारंवार येतात म्हणून त्यांचा अर्थ कळायासाठीं मात्र एथें दाखविलीं आहेत.

(अ+ब+क) (अ+ब−क) = (अ+ब) (अ+ब) −कक

= अअ+बब−कक+२अब

(क+अ−ब) (ब+क−अ) = (क+अ−ब) (क−अ−ब)

= कक− (अ−ब)(अ−ब)

= २अब+कक−अअ−बब

= २अब− (अअ+बब−कक)

वरचे दोन शेवटील उदाहरणांवरून, या पुढील चार पद्धतींचा गुणाकार कर.

अ+ब+क, अ+ब−क, ब+क−अ, क+अ−ब;

२अअबब+२बबकक+२ककअअ−अअअअ−बबबब−कककक, हा गुणाकार आहे.

खालचे उदाहरणाचे साहाय्यानें वरचीं उदाहरणें करून दाखीव आणि खालचेंही उदाहरण कर.

(प+क−र) याचा वर्ग = पप+कक+रर+२पक−२कर−२पर

हीं पुढील अनेक प्रकारचीं गुणाकाराचीं उदाहरणें, अभ्यासाकरितां केवळ तोंडानें सांगीतलीं पाहिजेत.

(अ+बक्ष) (अ+कक्ष) = अअ+अबक्ष+अकक्ष+बकक्षक्ष

(क्ष+अ) (क्ष+ब) = क्षक्ष+अक्ष+बक्ष+अब

(क्ष−अ) (क्ष−ब) = क्षक्ष−क्षक्ष−बक्ष+अब

(क्ष+१) (क्ष−३) = क्षक्ष−२क्ष−३

(क्ष−१) (क्ष−३) = क्षक्ष−४क्ष+३

(२क्ष+१) (क्ष−१) = २क्षक्ष−क्ष−१

हीं पुढील कल्यें शिकणाराचे अभ्यासाकरितां लिहिलीं आहेत.

१. जर अ आणि ब हीं भलतीं दोन परिमाणें असतील, आणि त्यांत ब पेक्षां अ मोठा असेल, आणि जर व त्यांचे बेरिजेचा वर्ग, ड त्यांचे वजाबाकीचा वर्ग, त्यांची बेरीज आणि वजाबाकी यांचा गुणाकार असेल तर याप्रमाणें होईल.

वज+उ = २(अअ+बब)　　वज−उ = ४अब

वज+ष = २अ(अ+ब)　　वज−ष = २ब(अ+ब)

उ+ष = २अ(अ−ब)　　ष−उ = २ब(अ−ब)

२. जर भलते दोन अंकांची वजाबाकी केवळ एक एकं आहे, तर त्या अंकाचे वर्गाची वजाबाकी, त्या अंकांचा बेरिजे बरोबर आहे, आणि जर दोन वेगळाले अपूर्णांक एकत्र मिळून पूर्ण एक एकं होईल, जसें $\frac{१}{४}$ आणि $\frac{३}{४}$, तर त्यांची वजाबाकी त्यांचे वर्गांचे वजाबाकी बरोबर आहे.

३. क्षक्ष− यय आणि २क्षय या दोन पद्धतीचे वर्गांची बेरीज, क्षक्ष+ यय यांचे वर्ग बरोबर आहे.

रीतीप्रमाणें, अ−ब याचा वर्ग आणि ब−अ याचा वर्ग हे दोन्ही बरोबर आहेत; कांकीं अ−ब याचा वर्ग ह्मणजे अअ−२अब+बब आणि ब−अ याचा वर्ग ह्मणजे. बब−२बअ+अअ हीं दोन्ही बरोबर आहेत हें स्पष्ट दिसतें, १५ व्ये पृष्ठावर पहा जेव्हां अ बरोबर ब असेल, तेव्हां ब−अ किंवा अ−ब शून्य आहे; परंतु असें नसेल तर अ−ब अथवा ब−अ, या दोहोंतील एक तरीं अशक्य असावें; कांकीं तसें नसतां अ−ब अथवा ब−अ अशा उदाहरणांमध्यें लाहानांतून मोठें वजा करायाचें अगत्य पडेल. परंतु त्याच कारणावरून, ब−अ अथवा अ−ब या दोहोंतून एक तरीं अगत्य शक्य असावें; यामुळें त्यांतील शक्य पद्धतीचा वर्ग, अअ+बब−२अब, हाही अगत्य शक्य असावा. ह्मणून, जर अ अथवा ब या दोहोंतून एक दुसऱ्यापेक्षां अधिक आहे, तर २अब यापेक्षां अअ+बब हा अगत्य अधिक असावा. जरी बीज कृतीवरून समजण्याजोगें उत्तर निघतें तरी ती कृती समजायाजोगी असावी असा निश्चय करवत नाहीं हेंही नजरेस येतें. (३−७) अशक्यरूप आहे तथापि (३−७) (३−७) यांचा गुणाकार आणि (७−३) (७−३) याचा गुणाकार बीजांती-

व्यक्त पद सापडून त्याचा किंमतीने कृतीची तपासणी पुनः होई, तो-पर्यंत भलत्ये अव्यक्त परिमाणाची किंमत काढायास ती कृती खरी आहे किंवा नाहीं, हें आणवत नाहीं.

## भागाकार.

जे भागाकार करायास उघडे, व जे भागाकार करायास उघडे नाहींत, या दोन प्रकारानी सद्यः बीजांतील भागाकार सांगतों. उदाहरण. अब यास अ याणें भाग, ह्मणजे, अब यांत अ किती वेळा जातो, हें विचारिलें असतां, हेंच उत्तर स्पष्ट आहे, कीं जा कारणास्तव अ हा ब वेळा घेतला तोच अ आहे, आणि बअ यांचा अर्थ अब याचे बरोबर आहे, त्या कारणास्तव अब यांत अ हा ब वेळा आहे; या मुळें अब हा अनें भागिला तर भागाकार ब आहे. या प्रकारांत भागाकार करण्याची ही पुढील सांगीतलेली रीति सर्वांपेक्षां सोपी आहे: जेव्हां भाज्यांत, भाजकांतील अक्षरें गुणक असतील तेव्हां तीं अक्षरें दोहोंकडे छेकावीं ह्मणजे भागाकार झाला.

या पुढील उदाहरणांत ही रीति उघड दिसत्ये.

| भाज्य | भाजक | भागाकार | भाज्य | भाजक | भागाकार |
|---|---|---|---|---|---|
| अब | अ | ब | १२अअक्ष | ६अअक्ष | २ |
| अबक | अब | क | २$\frac{१}{२}$ बयज्ञ | $\frac{१}{४}$ बय | १० ज्ञ |
| २अबक्ष | २क्ष | अब | अअअअ | अअअ | अ |
| अअबबक्ष | अब | अबक्ष | अअअअ | अअ | अअ |
| ६अबकक | ३अबक | २क | क्षयज्ञ | क्षयज्ञ | १ |

वजाबाकी आणि भागाकार यांचे कल्पनेचे धांदलीमुळें नवे शिकणारे, ० आणि १ या दोहोंचे गुणाविषयीं बहुतकरून चुकतात. हें बहु-

अनेक वेळा जात नाहीत परंतु, केवळ एक वेळ जातात. आतां बीजांत ही गोष्ट सर्वदा लक्षांत ठेविली पाहिजे कीं वेळा ह्मटल्या असतां, एक वेळा, किंवा अनेक वेळा, किंवा एक वेळेचा भाग, किंवा एक वेळा आणि एक वेळेचा भाग, किंवा अनेक वेळा, आणि एक वेळेचा भाग. हाच अर्थ वेळा या शब्दाचा आहे. यामुळें, जरीं

क्ष यास क्ष याणें उणा केला असतां शून्य होतें.

तथापि क्ष यास क्ष याणें भागिला असतां एक होतो.

$\frac{अ}{ब}$ आणि $\frac{मअ}{मब}$ हे सारखेच आहेत, असा अपूर्णांकांतील सिद्धांत वर सांगीतल्ये उदाहरणास अनुसरून जवळ जवळ आहे. कांकिं $\frac{अ}{ब}$ यास म याणें गुणिला असतां $\frac{मअ}{ब}$ होतो, आणि $\frac{मअ}{ब}$ यास म याणें भागिला असतां $\frac{मअ}{मब}$ होतो. परंतु गुणक आणि भाजक बरोबर असेल, तर गुणाकार केला आणि लागलाच भागाकार केला असतां भलतें कांहीं परिमाण पहिल्येच रूपासारिखें रहातें.

गुणाकाराचे रीतीवरून असें घडतें कीं, जर अनेक पदांची कोणतीही पद्धती असेल, आणि त्या प्रत्येक पदामध्यें एक किंवा अनेक अक्षरें साधारण असतील, तर दुसरी एक पद्धती त्याच साधारण एक अक्षरानें अथवा त्या अक्षरांचा गुणाकारानें गुणिली इतकी आहे हें स्पष्ट आहे. जसें, अब+अक हा ब+क गुणिला अ याचे बरोबर आहे; आणि अअब−अबक हा अ−क गुणिला अ ब याचे बरोबर आहे. यावरून, जेव्हां भलत्ये पद्धतीस एक किंवा अनेक अक्षरांचे गुणाकारानें भागायाचें आहे, तेव्हां भाज्याचे प्रत्येक पदांतून तीं अक्षरें छेकून टाकावीं. परंतु जेथे कोणत्ये एक पदाचीं सर्व अक्षरें अशीं छेकलीं जातात, त्या ठिकाणीं १ लिहिण्याचें पक्कें स्मरण ठेवडें पाहिजे. उदाहरण, अ+अब, भागिला अ ह्मणजे १+ब याचें बरोबर आहे, आणि अक−अअक+अकक, भागिला अक ह्मणजे १−अ+क याचे ब-

| भाज्य | भाजक | |
|---|---|---|
| २अब−२बक+४अबक | २ब | अ−क+२अक |
| अअअ−अअ+अ | अ | अअ−अ+१ |
| ६अब−३अ+३ब | ३ | २अब−अ+ब |
| अअब−अबब | अब | अ−ब |
| अक्षक्षय−क्षक्षक्षयय | क्षक्षय | अ−क्षय |

अब यास अ याणें भागायाचें असल्यास या पुढील कृतीनें करावें. अशा कृतीचें फळ $\frac{\text{अब}}{\text{अ}}$ हा अपूर्णांक होतो; त्याचे, अंश आणि छेद यांस अ याणें भागिलें असतां त्यांचे किमतींत अंतर पडत नाहीं. परंतु त्याचा रूपभेद $\frac{\text{ब}}{\text{१}}$ म्हणजे ब हा होतो.

वरचे उदाहरणांत अशी कृती अनुपयोगी आहे; परंतु असें मनांत आण कीं अब यास अक याणी भागायाचें आहे. या उदाहरणांत अ, ब, आणि क, हे कोणत्ये अंकस्थानीं घेतले आहेत, हें कळल्याशिवाय याचा भागाकार पूर्ण होण्यास अशक्य. परंतु त्या भागाकाराचें रूप $\frac{\text{अब}}{\text{अक}}$ अशा चिन्हानें दाखवितात. वरचे रीतीप्रमाणें $\frac{\text{ब}}{\text{क}}$ असें संक्षेपरूप दिलें जाईल. या ठिकाणीं भागाकार पूर्ण झाला नाहीं, परंतु त्यास संक्षेप देऊन भागाकार अधिक सरळ केला आहे.

$$\frac{\text{२ब}}{\text{२क}}=\frac{\text{ब}}{\text{क}} \qquad \frac{\text{अअब}}{\text{अक्ष}}=\frac{\text{अब}}{\text{क्ष}} \qquad \frac{\text{३अममन}}{\text{६अअम}}=\frac{\text{मन}}{\text{२अ}}$$

$$\frac{\text{प}}{\text{पक}}=\frac{\text{१}}{\text{क}} \qquad \frac{\text{३अब}}{\text{अअब}}=\frac{\text{३}}{\text{अ}} \qquad \frac{\text{२१विवब}}{\text{२८क्षब}}=\frac{\text{३वि}}{\text{४क्ष}}$$

एक पदानें भागिलेल्या अनेक पदांचा पद्धतीस संक्षेपरूप देतां येतें. उदाहरण. क्षज्ञ+यज्ञ−ज्ञक्ष यास क्षयय याणीं भागिलें असतां या पुढील प्रमाणें होईल.

$$\frac{क्षय}{क्षयय}+\frac{यज्ञ}{क्षयय}-\frac{ज्ञक्ष}{क्षयय} \text{ अथवा } \frac{१}{य}+\frac{ज्ञ}{क्षय}-\frac{ज्ञ}{यय}$$

$$\frac{२वि-क्षक्ष+विक्ष}{विक्ष}=\frac{२}{क्ष}-\frac{क्ष}{वि}+१$$

$$\frac{अ+ब+क}{अबक}=\frac{१}{बक}+\frac{१}{अक}+\frac{१}{अब}$$

$$\frac{अ+ब}{अअ}=\frac{१}{अ}+\frac{ब}{अअ} \qquad \frac{अअ+१}{अ}=अ+\frac{१}{अ}$$

$$\frac{क्ष+४य-३ज्ञ+२}{६}=\frac{क्ष}{६}+\frac{२य}{३}-\frac{ज्ञ}{२}+\frac{१}{३}$$

वर जें सांगीतलें आहे त्यांत भागाकाराचा उघड प्रकार आहे. जांचीं उत्तरें काढण्यास अधिक कृती केली पाहिजे, त्यांतील एक उदाहरण सांगतों : **क्षक्षक्ष+ययय, यामध्यें क्ष+य किती वेळा जातात?** काहीं वेळपर्यंत अशा कृतीची गरज लागणार नाहीं यास्तव ती तकुब ठेउन तिचे योग्य जागीं पुढें सांगण्यांत येईल. तथापि काहीं जातीचे उदाहरणाचीं उत्तरें पूर्वील गुणाकाराचे कृत्यांपासून एकदांच निघतील. ३७ आणि ३८ पृष्ठ पाहा. उदाहरण, उघड दिसतें कीं, क्षक्ष−९ यामध्यें क्ष+३ हे क्ष−३ वेळा जातात.

कित्येक अपूर्णांकांस नुसत्ये दृष्टीनें संक्षेप देतां येतो त्याविषयीं हीं पुढील उदाहरणें पाहा.

$$\frac{अ+अब}{अ-अब}=\frac{१+ब}{१-ब} \qquad \frac{३क्ष+६क्षक्ष}{९क्षय-३क्ष}=\frac{१+२क्ष}{३य-१}$$

$$\frac{अ-अअ}{२अ+अज्ञ}=\frac{१-अ}{२+ज्ञ} \qquad \frac{अअ+३अब}{अब+१२अ}=\frac{अ+३ब}{ब+१२}$$

बीजाच्या पद्धतीस काहीं मिळविलें, तर तेंच लागलेंच वजा करावें; आणि तीस कोणेकानें गुणिलें, तितक्यानें लागलेंच भागावें; तसेंच जितकें वजा केलें, तितकें लागलेंच मिळवावें. आणि जितक्यानें भागिलें, तितक्यानें लागलेंच गुणावें. अशा

उलट सुलट कृतीनें किंमत बदलल्यावांचून, बीजाचा पद्धती फिरवून निरनिराळ्ये रूपानें मांडाव्या लागतात. जो क्ष खालीं चार प्रकारानी लिहिला आहे त्यावरून ही वरची कृती समजांत येईल.

$$क्ष+अ-अ \qquad क्ष-अ+अ \qquad \frac{अक्ष}{अ} \qquad \frac{क्ष}{अ}\times अ$$

$$\text{जसें}\quad अ+क्ष = २अ+क्ष-अ = \left(१+\frac{क्ष}{अ}\right)अ$$

$$अअ+२अब-क = अअ+२अब+बब-(क+बब)$$

$$= (अ+ब)(अ+ब) - (क+बब)$$

$$बब-४अक = बब\left(१-\frac{४अक}{बब}\right) = अबक\left(\frac{ब}{अक}-\frac{४}{ब}\right)$$

$$म+न = मन\left(\frac{१}{न}+\frac{१}{म}\right) = न\left(\frac{म}{न}+१\right) = म\left(१+\frac{न}{म}\right)$$

$$क्ष = \frac{१}{\frac{१}{क्ष}} = \frac{१+क्ष}{\frac{१}{क्ष}(१+क्ष)} = \frac{१+क्ष}{\frac{१}{क्ष}+१}$$ . ६ आणि ७ वें पृष्ठ पाहा.

अपूर्ण बीजाचा संक्षेप करण्याचा वेगळाल्या रीती जा पुढें येणार त्यांविषयीं खालीं उदाहरणें लिहिलीं आहेत. अंकगणितांत अपूर्णांकांविषयीं जा रीती सिद्ध झालेल्या आहेत, त्या बीजांतल्ये मिळवणी इत्यादिकांचे रीतीसहित लाविल्या आहेत. पुढील उदाहरणें चार प्रकारानीं दाखविलीं आहेत आणि प्रत्येक प्रकाराचे आरंभीं एक एक सोपें उदाहरण लिहिलेलें आहे. आणि त्या उदाहरणाचा उलगडण्यासजी कृती लागत्ये ती बाकी राहिलेल्ये उदाहरणावर लागू होत्ये.

प्रथम प्रकार.

$$\frac{अ}{ब} = \frac{मअ}{मब}$$

$$\frac{१+\frac{१}{क्ष}}{१+\frac{१}{क्षक्ष}} = \frac{\left(१+\frac{१}{क्ष}\right)क्षक्ष}{\left(१+\frac{१}{क्षक्ष}\right)क्षक्ष} = \frac{क्षक्ष+क्ष}{क्षक्ष+१}$$

$$\frac{वि+\frac{१}{२}}{\frac{२}{३}वि+\frac{१}{४}} = \frac{\left(वि+\frac{१}{२}\right)१२}{\left(\frac{२}{३}वि+\frac{१}{४}\right)१२} = \frac{१२वि+६}{८वि+३}$$

$$य = \frac{य(य-१)}{य-१} = \frac{यय-य}{य-१} \qquad \frac{क्ष}{अ} = \frac{क्षक्ष+अक्ष}{अक्ष+अअ}$$

$$\frac{१}{अ+ब} = \frac{अ-ब}{अअ-बब} = \frac{अ+ब}{अअ+२अब+बब} = \frac{४}{४अ+४ब}$$

$$\frac{क्ष-४}{२\frac{१}{२}} = \frac{२क्ष-८}{५} = \frac{४क्ष-१६}{१०} = \frac{२अक्ष+८अ}{५अ}$$

$$\frac{७क्ष-४}{१०} = \frac{\frac{१}{२}(७क्ष-४)}{\frac{१}{२}(१०)} = \frac{३\frac{१}{२}क्ष-२}{५}$$

$$\frac{\frac{१}{अ}+\frac{१}{अब}}{ब-अ+\frac{१}{ब}} = \frac{अब\left(\frac{१}{अ}+\frac{१}{अब}\right)}{अब\left(ब-अ+\frac{१}{ब}\right)} = \frac{ब+१}{अबब-अअब+अ}$$

दुसरा प्रकार.

$$अ+\frac{क्ष}{य} = \frac{अय+क्ष}{य} \qquad अ-\frac{क्ष}{य} = \frac{अय-क्ष}{य} \qquad \frac{क्ष}{य}-अ = \frac{क्ष-अय}{य}$$

$$१-\frac{१}{क्ष} = \frac{क्ष-१}{क्ष} \qquad क्ष-\frac{१}{क्ष} = \frac{क्षक्ष-१}{क्ष}$$

$$२-\frac{य-१}{य+१} = \frac{२य+२-(य-१)}{य+१} = \frac{य+३}{य+१}$$

$$अ-\frac{अअ}{अ+ब} = \frac{अब}{अ+ब} \qquad अ-\frac{अब}{अ+ब} = \frac{अअ}{अ+ब}$$

$$अ+ब-\frac{अअ-२अब}{अ+ब} = \frac{४अब+बब}{अ+ब}$$

$$अ+ब+\frac{अअ-२अब}{अ+ब} = \frac{२अअ+अब}{अ+ब}$$

$$\frac{य+१}{य-१}+य+१ = \frac{य+यय}{य-१} = य\,\frac{य+१}{य-१}$$

$$\frac{अ+ब-क}{अ-क}-२ = \frac{ब-अ+क}{अ-क} \qquad \frac{क्ष}{य}-क्ष = \frac{क्ष-क्षय}{य}$$

$$\frac{अब+बक+कअ}{अ+ब+क}-क = \frac{अब-कक}{अ+ब+क}$$

तिसरा प्रकार.

$$\frac{अ}{ब}+\frac{क्ष}{य} = \frac{अय+बक्ष}{बय} \qquad \frac{अ}{ब}-\frac{क्ष}{य} = \frac{अय-बक्ष}{बय}$$

$$\frac{\text{अ+ब}}{\text{क+ड}} - \frac{\text{अ}}{\text{क}} = \frac{\text{कब−अड}}{\text{कक+कड}} \qquad \frac{\text{अ−ब}}{\text{क−ड}} - \frac{\text{अ}}{\text{क}} = \frac{\text{अड−बक}}{\text{कक−कड}}$$

$$\frac{\text{क्ष}}{\text{क्ष+य}} - \frac{\text{य}}{\text{क्ष−य}} = \frac{\text{क्षक्ष−२क्षय−यय}}{\text{क्षक्ष−यय}} \qquad \frac{\text{प}}{\text{क}} + \frac{\text{क}}{\text{पप}} = \frac{\text{पपप+कक}}{\text{पपक}}$$

चवथा प्रकार.

$$\frac{\text{अ}}{\text{ब}} \times \frac{\text{क्ष}}{\text{य}} = \frac{\text{अक्ष}}{\text{बय}} \qquad \frac{\text{अ}}{\text{ब}} \div \frac{\text{क्ष}}{\text{य}} = \frac{\text{अय}}{\text{बक्ष}}$$

$$\frac{\text{क्ष−१}}{\text{क्ष+१}} \times \frac{\text{क्ष+२}}{\text{क्ष−१}} = \frac{\text{(क्ष−१) (क्ष+२)}}{\text{(क्ष+१) (क्ष−१)}} = \frac{\text{क्ष+२}}{\text{क्ष+१}}$$

$$\frac{\text{२अब}}{\text{अ+ब}} \div \frac{\text{अ−ब}}{\text{३अ}} = \frac{\text{६अअब}}{\text{अअ−बब}} \qquad \frac{\text{३अक्ष}}{\text{यय}} \times \frac{\text{यवि}}{\text{२क्ष}} = \frac{\text{३अवि}}{\text{२य}}$$

$$\frac{\text{म}}{\text{अन}} \div \frac{\text{२म}}{\text{३बन}} = \frac{\text{३ब}}{\text{२अ}} \qquad \frac{\text{पक}}{\text{क}} \times \frac{\text{३कक}}{\text{ककई}} = \frac{\text{३पक}}{\text{कई}}$$

वर चार प्रकारानीं जितकीं उदाहरणें सांगीतलीं आहेत, त्यांचा नव्ये शिकणारानीं स्वतां दृढ अभ्यास करून, त्याशीं अगत्य पक्कें माहित व्हावें; प्रथमतः यापेक्षां अधिक उदाहरणांचा अभ्यास करण्याचें प्रयोजन नाहीं; कांकीं दुसरे उदाहरणाविषयीं यापेक्षां चांगली रीति पुढें सांगण्यांत येईल.

वर जें सर्व सांगीतलें, तें केवळ निरवालस अंक गणितानुरूप आहे, जीं अक्षरें घेतलीं तीं केवळ अंकांचीं संक्षेप चिन्हें आहेत असें मानावें, आणि सर्व एकरूप समीकरणें हीं केवळ गणितांतील प्रतिज्ञांचीं संक्षेपरूपें आहेत, असेंही मानावें. जसें,

$$\text{(अ+ब)}\ \text{(अ+ब)} = \text{अअ+२अब+बब}$$

ही पद्धती या पुढील वाक्याचा अर्थ दाखविल्ये: जर भलत्ये दोन अंकांची मिळवणी

घेतली, आणि ती बेरीज त्याच बेरिजेनें गुणली तर जें फळ उत्पन्न होतें, तें आणि प्रत्येक अंक त्याणीं तेंच गुणावे आणि त्या गुणाकारांचे बेरिजेस त्या अंकांचे गुणाकाराची दुप्पट मिळवावी हें, हीं दोन्हीं बरोबर आहेत.

जर भलते काहीं अंक देउन, आणि त्याशीं काहीं एक कृती करांयास सांगीतली, तर त्यास **अंकगणितानुरूप** कृत्य ह्मणतात; आणि, याप्रमाणें प्रश्न केला, कीं दिलेल्ये अंकांशीं सांगीतलेली कृती केली, तर काय अंक उत्पन्न होईल. उदाहरण, २५ आणि ३०० यांचे गुणाकाराचा पंनासावा भाग काय आहे.

जेव्हां भलते कांहीं खरे अंक दिले, अथवा दिले आहेत अशी कल्पना केली, ती अमळशानें पुढें समजण्यांत येईल. आणि असा प्रश्न केला, ज्याचें इच्छाफळ कोणतें कृतीवरून उत्पन्न होईल. हें पहिल्यानें एकदांच पाहिल्यानें लक्ष्यांत येत नाहीं, तेव्हां त्यास **बीजगणितानुरूप** कृत्य ह्मणतात. तशे जातीचा प्रश्न एथें खालीं सांगीतला आहे: ३, आणि, १७ हे दोन अंक दिलेले आहेत; तर तो अंक काय आहे, कीं जितक्याने त्याचें अर्ध ३ पेक्षां अधिक, तितक्यानें त्याची दुप्पट १७ पेक्षां उणी आहे? या उदाहरणांत हें पुढील प्रश्न केले. १. असा अंक आहे किं काय? २. जर आहे, तर ३ आणि १७ यांशी कोणती कृती केल्यानें तो अंक निघेल? ३. त्या कृतीचें फळ अथवा इच्छिलेला अंक काय आहे? पुढें शिकणाराचे लक्ष्यांत येईल, कीं त्या प्रश्नांस हीं उत्तरें आहेत, कीं असा अंक आहे खरा, आणि तो ३ आणि १७ यांचे बेरिजेचे दोन पंचमांश घेतल्यानें सांपडतो, आणि यामुळें तो अंक ८ आहे.

जर पहिल्या दोन प्रश्नानींच निर्वाह झाला असता, तर प्रश्नांमध्यें ३ आणि १७ हे दोन अंक आहेत, असें सांगायाचें प्रयोजन पडलें नसतें; कारण कीं, तेंच कृत्य भलत्ये कोणत्ये दुसऱ्ये अंकावर लावतां आलें असतें; आणि ते अंक कोणतेही असोत, ते उलगडण्याची रीति एकसारिखीच रहाती. हें पुढें दाखविलें जाईल, ह्मणजे जर हा पुढील प्रश्न केला; अ आणि ब, हे दोन अंक दिले आहेत, त्यांत ब मोठा आणि अ लहान, तर तो अंक काय आहे, किं जितक्यानें त्याचें अर्ध अ पेक्षां अधिक आहे, तितक्यानें त्याची दुप्पट ब पेक्षां उणी होईल? याचें उत्तर $\frac{2}{5}$ (अ+ब)

हेंच आहे, आणि याचा ताळा या पुढील प्रमाणें आहे:

$\frac{2}{5}$ (अ+ब) याची दुप्पट $\frac{4}{5}$ (अ+ब), अथवा $\frac{4}{5}$ अ + $\frac{4}{5}$ ब याचे बरोबर आहे. हे ब पेक्षां ब − ($\frac{4}{5}$ अ + $\frac{4}{5}$ ब) इतक्यानें उणें आहे, अथवा ब − $\frac{4}{5}$ अ − $\frac{4}{5}$ ब, अथवा $\frac{1}{5}$ ब − $\frac{4}{5}$ अ राहातात; परंतु $\frac{2}{5}$ (अ+ब) याचें अर्ध $\frac{1}{5}$ (अ+ब) आहे, हें अ हून $\frac{1}{5}$ (अ+ब) − अ इतक्याने अधिक आहे, अथवा $\frac{1}{5}$ अ + $\frac{1}{5}$ ब − अ, अथवा $\frac{1}{5}$ ब − $\frac{4}{5}$ अ राहातात, हें, $\frac{2}{5}$ (अ+ब) याची दुप्पट जितक्यानें ब पेक्षां कमी आहे, तितक्या बरोबर आहे; हें सिद्ध. आतां पहा, कीं वरचे उदाहरणावरून हें कृत्य उलगडण्याची सामान्य रीति कळत्ये असेंच केवळ नाहीं, तर तें उदाहरण, कोणकोणत्ये पक्षांनीं अशक्य आहे, हें ही त्यापासून कळतें; कारण कीं, जर $\frac{1}{5}$ ब हा $\frac{4}{5}$ अ या पेक्षां अधिक किंवा उणा तरी नसला, ह्मणजे जर ब हा, ४ अ, यापेक्षां अधिक नसला, तर वरचें उत्तर $\frac{1}{5}$ ब − $\frac{4}{5}$ अ हें, वरचे गोष्टीचा अधिकपणा किंवा उणेपणा दाखवितें, तेव्हां तें विरुद्ध आहे. जेथे ब बरोबर १७, आणि अ, बरोबर ३ घेतले, तेथेंच अशी विरुद्ध गोष्ट घडली. जर असें नसेल तर हें कृत्य अशक्य आहे, असें जाणावें; उदाहरण, शिकणारानें शोधून पहावें, कीं असा कांहीं पूर्ण किंवा अपूर्ण अंक आहे कीं काय, कीं ज्याची दुप्पट ११ हून जितक्यानें कमी आहे, तितक्याने त्याचें अर्ध ३ पेक्षां अधिक आहे. या कृत्यांत विरोध अगत्य असावा; विरोध खचित कळल्यानंतर, तो कसकसा घडतो याचा विचार केला, तर या पुढील रीतीनें स्पष्ट दिसतें: इच्छिले अंकाचें अर्ध ३ यापेक्षां अधिक असावें, ह्मणून तो, ६ पेक्षां अधिक असावा. आणि त्याची दुप्पट ११ हून उणी असावी ह्मणजे ती संख्या $5\frac{1}{2}$ पेक्षां उणी असावी. परंतु जी संख्या ६ पेक्षां अधिक आहे, ती $5\frac{1}{2}$ पेक्षां उणी होत नाहीं; यामुळें दोन भागांत परस्पर विरोध येतो.

यावरून समजण्यांत येतें, कीं भलतें कांहीं कृत्य सांगण्यांत येईल, तें अशक्य किंवा विरुद्ध असतें किंवा त्यास उलगडवत नाहीं. परंतु, दुसऱ्ये पक्षीं, असें कृत्य सांगण्यांत येतें, कीं ज्याचीं अनंत उत्तरें होतील, ह्मणून यांस अनंत कृत्यें ह्मणतात. अशक्य कृत्यांमध्यें, कित्येक अशीं येतात, कीं त्यांचा अशक्यपणा उघड असतो; जसें याप्रमाणें, **असा पूर्णांक काढ कीं जो ७ याचे अर्धा**

शीं असतात,कीं त्यांचे उत्तरांचा अनंतपणा उघड असेल, आणि दुसऱ्यामध्यें त्यांचा अनंतपणा उघड दिसत नाहीं. उदाहरण, असे दोन विषम अंक काढ कीं जांची बेरीज सम अंक होईल? याचें उत्तर भलते कोणी दोन विषम अंक, हें उघड आहे; आणि ते दोन अंक काय आहेत, कीं जांचे बेरिजेचें अर्ध त्यांचे वजाबाकीचे अर्धाशीं मिळविलें असतां,मोठ्या अंकाबरोबर होईल. याचें उत्तर जरी पहिल्या प्रमाणें स्पष्ट नाहीं, तरी भलते कोणते दोन अंक, हे उत्तर आहे. कृत्यांचे, वरचे सांगीतल्ये दोन प्रकारामध्यें, अशी जातीचीं कृत्यें असतील, कीं कित्येकांस १००० उत्तरें, दुसऱ्यांस, ९९९ इत्यादि,उतरत उतरत, एक उत्तर पर्यंत असतील, अशी गोष्ट मनांत आणतां येईल. आणि एकादें कृत्य अशक्य आहे, असें जाणल्यावर, त्याचा अशक्यपणा कां होतो, हें विचारायास आपणास योग्य दिसेल? कृत्यांतील कोणते दोन भाग परस्परांस विरुद्ध आहेत, आणि त्यांचा विरोध कशामुळें येतो? ह्मणजे कृत्यास, शक्यरूप देण्यासाठीं, संकेतांमध्यें कोणकोणत्ये तऱ्हेचा, आणि किती रूपभेद करावा, लागेल?

ह्या सर्व प्रश्नांस, अंकगणितानें उत्तर देण्यास काहींच साधन नाहीं; याजकरितां, बीजगणित अंकगणिताहून भिन्नजातीची विद्या आहे, असें मानावें लागतें, आणि बीजांत जे विषय आहेत, ते अंकगणितांत नाहींत, यामुळें बीजगणितांमधील बोलण्याची सरणी, आणि कृत्य करायाची रीति, आणि अर्थ सांगण्याची चाल, हीं तिनही अंकगणितांत नाहीं.

शिकणारा, जासमयीं बीजगणित विद्या शिकायास आरंभ करितो, त्यासमयीं, किंवा त्याचे अगोदर त्याणें भूमिति विद्येचा थोडा अभ्यास केला असतां, बरें पडेल. असें केल्यानें त्यास हें समजेल, कीं भूमितीचे सर्व प्रश्न, अगोदरच, त्यासाठीं तयार केलेले आहेत, ह्मणजे, सर्व कारणें, इत्यादि, त्याचे दृष्टी पुढेंच ठेविलेलीं

करणामध्यें कृत्याचे अवयव वेगळे वेगळे करणें, ह्मणजे सर्व कृत्याचें मनन करून, त्याचीं पदें अधिक अधिक सरळ रूपांत आणून, शेवटीं तें कृत्य उलगडण्यास, किंवा त्याचे सत्यतेचा ताळा पाहाण्यास, कोणकोणत्या कल्पना केल्या पाहिजेत, हा विचार असतो.

आतां पृथक्करण रूपानें बीजगणिताचीं मूळ प्रकरणें, किंवा सिद्धता स्थापून दाखविण्याविषयीं पुढें चालवितों; बीजाची रचना नवीं नावें, किंवा, नवीं मुळें घेऊन, सद्यः करावी; त्याचे बदल जें अंकगणित आपणास माहित आहे, त्यापासून आरंभ करितों; आणि जों पर्यंत दुसरे सर्व विचारांचे कामाची गरज पडे, तोंपर्यंत त्यांस सोडून देतों. यापासून पाहाण्यांत येईल, कीं, जे पहिल्याने कधींही मनांत आले नवते, असे एकामागें एक नवे नवे निश्चितार्थ उत्पन्न होतात, आणि तेणेंकरून एक नवी भाषा बोलण्याची गरज पडेल, आणि चिन्हांस नवे नवे अर्थ द्यावे लागतील, हें कसें करावें, आणि तें कोणत्ये परिणामास जाईल, हें समजण्याविषयीं, शिकणारानें पुढील प्रथम अध्याय शिकावा; याशिवाय दुसरा काहीं मार्ग दाखवितां येत नाहीं.





# बीजगणित मूळपीठिका.

---

## पहिला अध्याय.

### एकवर्णसमीकरणाविषयीं.

आतां एकवर्ण समीकरणें उलगडायाची रीति दाखवितों. एकवर्ण समीकरण काय आहे, त्याचा अर्थ अगोदर सांगीतला पाहिजे.

बहुत करून पदाचा वर्ण जाणायास, त्या पदांतील अक्षरें मोज. ह्मणजे, अबक, हें पद तीन वर्णाचें आहे; अअबक, हें पद चार वर्णाचें आहे; कांकीं, जरी त्यांत केवळ तीन वेगळाल्ये जातीचीं अक्षरें आहेत, तथापि त्यांतलें एक अक्षर दोन वेळा येतें. हीं पुढील उदाहरणें आहेत:

अ, ब, क, क्ष, ज्ञ, य, इत्यादि, एक वर्णाचीं पदें आहेत.

अअ, बब, कक्ष, बक, यज्ञ, इत्यादि, दोन वर्णाचीं पदें आहेत.

अअअ, अअब, अबब, अबक, पअक, इत्यादि, तीन वर्णाचीं पदें आहेत. आणि याप्रमाणें पुढेंही.

कोणत्येही सांगीतल्ये अक्षरांविषयीं, पदाचा वर्ण काढणें असल्यास, केवळ तींच अक्षरें मोज. ह्मणजे ३अअक्षक्षय, हें पांच वर्णाचें पद, क्ष आणि य, या दोन अक्षरांविषयीं, तीन वर्णाचें आहे; अ आणि क्ष, यांविषयीं, चार वर्णाचें आहे, नुसते क्ष याविषयीं, दोन वर्णाचें आहे, नुसते य विषयीं, एक वर्णाचें आहे, आणि या प्रमाणें पुढेंही. जेव्हां काहींएक पदांत क्ष अगदी नाहीं, तर तें पद, क्ष विषयीं, काहींच वर्णाचें नाहीं, ह्मणजे क्ष याचे संबंधरहित आहे.

ज्या पदामध्यें कोणत्येही अक्षराचा मोठा वर्ण असेल, त्याच अक्षराविषयीं, त्या समीकरणाचा वर्ण, तोच आहे. ह्मणजे हें पुढील समीकरण.

क्षक्ष−ज्ञक्षक्षक्ष=यज्ञ−ययक्ष

हें, क्षविषयीं तीन वर्णांचें, यविषयीं दोन वर्णांचें, आणि ज्ञविषयीं एक वर्णांचें आहे.

हें पुढील कृत्य संकेतसमीकरण उलगडण्याचें आहे:—एक संकेतसमीकरण दिलें आहे, त्यांत एक अक्षराची किंमत अव्यक्त आहे; ज्या अंकाचास्थळीं तें अव्यक्त अक्षर आहे तो अंक कोणता, असा कीं तें समीकरण खरें होईल? असे एकापेक्षां अधिक अंक आहेत कीं काय? जर आहेत, तर ते किती, आणि कोणकोणते? अथवा असा अंक नाहीं कीं काय, ह्मणजे तें समीकरण अशक्यआहे कीं काय? अशक्य असलें, तर त्याचा अशक्यपणा कशानें कळेल?

कांहीं उदाहरणापासून या गोष्टीची अटकळ चांगली समजांत येईल, ज्यांचा खरेपणा शिकणारानें ताडून पाहावा.

२क्ष−१=५क्ष−१९

जेव्हां क्ष=६ असतील, तेव्हांच मात्र हें समीकरण खरें आहे.

२क्ष−१=५क्ष+१२

यांत क्ष कोणत्येही अंकस्थळीं असेल, तर हें समीकरण खरें होऊं शकत नाहीं.

१६क्ष=४८+क्षक्ष

हें समीकरण जेव्हां क्ष=४ असतील, तेव्हां खरें आहे, आणि क्ष=१२ असतील, तेव्हांही खरें आहे; परंतु दुसऱ्ये कोणतेही पक्षीं खरें नाहीं.

१२क्ष=४८+क्षक्ष

यांत क्षची किंमत कोणताही अंक असो, तरी हें समीकरण खरें होऊं शकत नाहीं.

क्षक्षक्ष+११क्ष=६क्षक्ष+६

जेव्हां क्ष=१, किंवा २, किंवा ३, असें असेल, तेव्हां हें समीकरण खरें आहे; परंतु दुसऱ्ये कोणत्येही पक्षीं खरें नाहीं.

खरेपणा आणायासाठीं वरचे उदाहरणांत क्ष=४, असें समजून उलगडू

न पहा. क्र.

क्षक्षक्ष = ६४      ६ क्षक्ष = ९६

११ क्ष = ४४      + ६ = ६

क्षक्षक्ष + ११ क्ष = १०८      ६ क्षक्ष + ६ = १०२

परंतु १०८ = १०२ हें खरें नाहीं; यास्तव क्षक्षक्ष + ११ क्ष ही पद्धती ६ क्षक्ष + ६ यां बरोबर नाहीं; ह्मणून क्ष = ४ हे या समीकरणास स्थापीन नाहीं.

आतां काहीं स्पष्ट खरी गोष्ट सांगतों :

१. बरोबर अंकांशी बरोबर अंक मिळविले असतां, त्यांची बेरीज बरोबर होईल. ह्मणजे, जर अ = ब आणि क = ड, तर अ + क = ब + ड. जर अ = ब − क, आणि क्ष = प − क्क, तर अ + क्ष = (ब − क) + (प − क्क) = ब + प − क − क्क. जर अ = क्ष − य, आणि ब = क्ष + य, तर अ + ब = (क्ष − य) + (क्ष + य) = क्ष − य + क्ष + य = २ क्ष. जर अ = ब + क, तर अ + ब = ब + क + ब.

२. बरोबर अंकांतून बरोबर अंक वजा केले, तर, त्यांची वजाबाकी बरोबर होईल. ह्मणजे, जर अ = ब आणि क = ड, तर अ − क = ब − ड. जर अ = प − क्क आणि ब = प − २क्क, तर अ − ब = (प − क्क) − (प − २क्क) = प − क्क − प + २क्क = क्क. जर अ = ज्ञ + य, तर अ − म = ज्ञ + य − म.

३. बरोबर अंक बरोबर अंकानी गुणिले, तर, त्यांचे गुणाकार बरोबर होतील. ह्मणजे, जर अ = ब आणि क = ड, तर अक = बड. जर अ = ब + क आणि ज्ञ = न तर, अज्ञ = न (ब + क) = नब + नक. जर ड = ल − व, तर २ड = २ल − २व.

$$\text{जर } \frac{\text{क्ष}}{२} + \frac{\text{क्ष}}{३} = १$$

$$\text{तर } २\frac{\text{क्ष}}{२} + २\frac{\text{क्ष}}{३} = २, \text{ अथवा क्ष} + \frac{२\text{क्ष}}{३} = २$$

$$३\text{क्ष} + ३\frac{२\text{क्ष}}{३} = ६$$

$$\text{अथवा } ३\text{क्ष} + २\text{क्ष} = ६$$

४. बरोबर अंक बरोबर अंकानी भागिले, तर त्यांचे भागाकार बरोबर हो-

समीकरणें उलगडल्यसमयीं, वारंवार मिळवणी, वजाबाकी, इत्यादि करा-यास सांगण्याचें प्रयोजन पडेल, ह्मणून संक्षेपानें दाखविण्यासाठीं या पुढील प्रमाणें चिन्हें करितात.

(+) अ याचा अर्थ हाच, कीं वरील समीकरणाचे दोनी बाजूंस अ मिळवायाचा आहे.

(−) अ याचा अर्थ हाच, कीं वरील समीकरणाचे दोनी बाजूंतून अ वजा करायाचा आहे.

(×) अ याचा अर्थ हाच, कीं वरील समीकरणाचे दोनी बाजूंस अ याणें गुणायाचें आहे.

(÷) अ याचा अर्थ हाच आहे, कीं वरील समीकरणाचे दोनी बाजूंस अ याणें भागायाचें आहे.

(+) (−) (×) आणि (÷) जेव्हां यांतील नुसतें एक चिन्ह अक्षरावांचून मांडिलें असेल, तेव्हां त्याचा अर्थ हाच होईल, कीं वरचे दोन समीकरणांची, मिळवणी, वजाबाकी, इत्यादि करायाची आहे.

वर सांगीतले संक्षेप या पुढील उदाहरणावरून समजांत येतील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १. | | अ = ब − क | | अ − ब = क + क्ष |
| | (+) क | अ + क = ब | (+) ब | अ = क + क्ष + ब |
| २. | | क − ड = ल − म | | २क्ष − ३ = ९ |
| | (+) $\overline{\text{ड+म}}$ | क + म = ल + ड | (+) ३ | २क्ष = १२ |
| ३. | | प + क = अ − ब | | ११क्ष + १८ = १०० |
| | (−) क | प = अ − ब − क | (−) १८ | ११क्ष − |

४. $प+क्र-ज्ञ = ३अ+४$

$(-)\overline{क्र-ज्ञ}.$ $प = ३अ+४-क्र+ज्ञ$

५. $\frac{क्ष}{२}-\frac{क्ष}{३}+\frac{२७}{४} = \frac{७क्ष}{६}-\frac{५क्ष}{१२}+\frac{३}{४}$

$(\times)१२$ $\frac{१२क्ष}{२}-\frac{१२क्ष}{३}+\frac{३२४}{४} = \frac{८४क्ष}{६}-\frac{६०क्ष}{१२}+\frac{३६}{४}$

अथवा $६क्ष-४क्ष+८१ = १४क्ष-५क्ष+९$

६. $अक्ष = ब$ $(अ+ब)क्ष = क$

$(\div)$ अ $क्ष = \frac{ब}{अ}$ $(\div)$ $\overline{अ+ब}$ $क्ष = \frac{क}{अ+ब}$

७. $अ-ब+२क-३ड = क्ष-अ+ब$

$ब+३क-२ड = ४क्ष-अ-२ब$

$(+)$ $अ+५क-५ड = ५क्ष-२अ-ब$

८. $२अक्ष = ब-ज्ञ$

$अ = ब+ज्ञ$

$(\div)$ $२क्ष = \frac{ब-ज्ञ}{ब+ज्ञ}$

**(५५आणि५६)** या दोन दृष्टांतील गोष्टींवरून, आणि वरचे सांगितल्या कृतीं वरून, जांत एक अव्यक्त पद आहे, अशा एकवर्णसमीकरणाचे उलगडण्या-विषयीं सांगतों.

१. या समीकरणाचा खरेपणा स्थापायास, क्षची किंमत काय असावी.

$३क्ष-७ = क्ष+१९.$

$(+)७$ $३क्ष = क्ष+२६$

$(-)क्ष$ $२क्ष = २६$

$(\div)२$ $क्ष = १३$

**ताळा** जर $क्ष=१३$, तर $३क्ष-७ = ३२$

$क्ष+१९ = ३२$

२. $३क्ष+१६=१०क्ष+९$

(−) ३क्ष $१६=७क्ष+९$

(−) ९ $७=७क्ष$

(÷) ७ $१=क्ष$

ताळा जर $क्ष=१$ तर $३क्ष+१६=१९$

$१०क्ष+९=१९$

३. $२०क्ष-१३=१०२\frac{१}{२}-क्ष$

(+) १३ $२०क्ष=११५\frac{१}{२}-क्ष$

(+) क्ष $२१क्ष=११५\frac{१}{२}$

(÷) २१ $क्ष=\frac{२३१}{२\times२१}$

$=\frac{२३१}{४२}=५\frac{१}{२}$

ताळा जर $क्ष=५\frac{१}{२}$ तर $२०क्ष-१३=९७$

$१०२\frac{१}{२}-क्ष=९७$

४. $\frac{क्ष}{२}+\frac{क्ष}{३}=१-\frac{क्ष}{४}$

(×) २ $क्ष+\frac{२क्ष}{३}=२-\frac{क्ष}{२}$

(×) २ $२क्ष+\frac{४क्ष}{३}=४-क्ष$

(×) ३ $६क्ष+४क्ष=१२-३क्ष$

(+) ३क्ष $६क्ष+४क्ष+३क्ष=१२$

म्हणजे $१३क्ष=१२$

(÷) १३ $क्ष=\frac{१२}{१३}$

ताळा जर $क्ष=\frac{१२}{१३}$ तर, $\frac{क्ष}{२}+\frac{क्ष}{३}$ अथवा $\frac{५}{६}क्ष=\frac{१२}{१३}$ चे $\frac{५}{६}=\frac{१०}{१३}$

आणि $१-\frac{क्ष}{४}=१-\left(\frac{१२}{१३}\right)$ चे $\left(\frac{१}{४}\right)=१-\frac{३}{१३}=\frac{१०}{१३}$

या समीकरणाचे दोनी बाजूस २, ३, ४, या अंकांचे कोणत्याही साधारण गुणाकारानें गुणिलें असतां, सहज उलगडा होतो. याविषयीं लघुतम गुणाकार फार उपयोगी आहे. ही गोष्ट समजण्यासाठीं मागलें उदाहरण करून पाहिलें असतां,

ध्यानांत येईल :—

$$\frac{क्ष}{२}+\frac{क्ष}{३}=१-\frac{क्ष}{४}$$

आतां २,३,आणि ४, यांचा साधारण गुणाकार ३६ आहे.

(×) ३६ $$\frac{३६क्ष}{२}+\frac{३६क्ष}{३}=३६-\frac{३६क्ष}{४}$$

अथवा $१८क्ष+१२क्ष=३६-९क्ष$

(+) ९क्ष $१८क्ष+१२क्ष+९क्ष=३६$

ह्मणजे, $३९क्ष=३६$

(÷) ३९ $$क्ष=\frac{३६}{३९}$$

अतिसंक्षेपेंकरून $$क्ष=\frac{१२}{१३}$$

आतां **लघुतम गुणाकारानें** कृती करून पहा.

२,३,४, यांचा **लघुतम गुणाकार** १२ आहे.

$$\frac{क्ष}{२}+\frac{क्ष}{३}=१-\frac{क्ष}{४}$$

(×) १२ $$\frac{१२क्ष}{२}+\frac{१२क्ष}{३}=१२-\frac{१२क्ष}{४}$$

अथवा $६क्ष+४क्ष=१२-३क्ष$

(+) ३क्ष $६क्ष+४क्ष+३क्ष=१२$

$१३क्ष=१२$

(÷) १३ $$क्ष=\frac{१२}{१३}$$

यांत वरप्रमाणें संक्षेप करण्याचें प्रयोजन नाहीं.

५. $अब+अ-ब=१$

या उदाहरणांत आणि वरचे सर्व उदाहरणांत, भेद हाच आहे कीं वरचांत एक अव्यक्त परिमाण आहे, आणि यांत दोन अव्यक्त परिमाणें आहेत. याचें खरें उत्तर हेंच, कीं या समीकरणास स्थापित करायासाठीं, अ आणि ब यांचा पुष्कळ किंमती आहेत. ब याची भलती किंमत **घेतली**, तर त्या घेतले किमतीचे सहायानें, अ याची किंमत **काढिली** जाईल. या दोन किमतीनी, हें समीकरण स्थापिलें जाईल. जसें ब=१२ असें होऊं शकतें कीं नाहीं? असें विचारिलें तर, वरचे समीकरणा—

त बच्यास्थळीं १२ मांडून पहा. तेव्हां याप्रमाणें होईल.

$$१२अ+अ-१२=१$$

अथवा $$१३अ-१२=१$$

(+) १२ $$१३अ=१३$$

(÷) १३ $$अ=१$$

उत्तर हेंच, कीं जर अ=१, तर ब=१२ होऊं शकतात. यापक्षीं अब=१२ आणि १२+१-१२=१.

ब याची कांहीं **विशेष** किंमत घेतल्याशिवाय मनांत आणावें कीं त्याची किंमत दिलेली आहे; तर समीकरणाचे पहिले बाजूचा व्यक्त ब त्याच समीकरणाचे दुसरे बाजूस व्यक्त एक आहे त्याशीं कशो तऱ्हेनें संयोग करावा. म्हणजे ब याला भलती कांहीं विशेष किंमत दिल्यावर, अ याची किंमत काढायाची रीति समजांत येईल. वरचें समीकरण पुनः मांड.

$$अब+अ-ब=१$$

(+) ब $$अब+अ=१+ब$$

परंतु, अब+अ, हे अ एक अधिक ब वेळा घेतला याचे बरोबर आहे; म्हणजे अब+अ= (१+ब)अ.

याजकरितां, (१+ब) अ=१+ब

(÷) $\overline{१+ब}$ $$अ=\frac{१+ब}{१+ब}=१$$

तर, उत्तर हेंच कीं, अ=१ असें असल्यास, तर ब याची म्हटली ती किंमत होईल.

**ताळा** जर अ=१, तर

$$अब+अ-ब=ब+१-ब=१.$$

बीजगणितरीतीनें, ज्याची अगा नसल्ये, अशीं फळें किती वगैरेनें उत्पन्न होतात तीं दाखविण्यासाठीं, हें उदाहरण दिलेलें आहे. आतां पुढें एक दुसरें उदाहरण देतों.

६. $$\text{क्षय}=\text{क्ष}+\text{य}+१$$

यांत यची किंमत व्यक्त आहे, असें जाणून, क्षची किंमत काढायाची आहे.

(−) क्ष $$\text{क्षय}-\text{क्ष}=\text{य}+१$$

परंतु, क्षय−क्ष हे क्ष, य−१ एक वेळा घेतला, इतका आहे; अथवा (य−१)क्ष.

याजकरितां $(\text{य}-१)\,\text{क्ष}=\text{य}+१$

($\div$) $\overline{\text{य}-१}$ $$\text{क्ष}=\frac{\text{य}+१}{\text{य}-१}$$

**विशेषपक्ष.** य = ५ हे घे, तर

$$\text{क्ष}=\frac{५+१}{५-१}=\frac{६}{४}=\frac{३}{२}$$

**ताळा** $$\text{क्षय}=\frac{३}{२}\times ५=\frac{१५}{२}$$

$$\text{क्ष}+\text{य}+१=\frac{३}{२}+५+१=\frac{३}{२}+\frac{१०}{२}+\frac{२}{२}=\frac{१५}{२}$$

**सामान्यताळा** $\text{क्ष}=\frac{\text{य}+१}{\text{य}-१}$ तर $\text{क्षय}=\frac{\text{य}(\text{य}+१)}{\text{य}-१}$

$$\text{क्ष}+\text{य}+१=\frac{\text{य}+१}{\text{य}-१}+\text{य}+१$$

$$=\frac{\text{य}+१}{\text{य}-१}+\frac{\text{य}(\text{य}-१)}{\text{य}-१}+\frac{\text{य}-१}{\text{य}-१}$$

$$=\frac{(\text{य}+१)+\text{य}(\text{य}-१)+(\text{य}-१)}{\text{य}-१}$$

$$=\frac{\text{य}+१+\text{यय}-\text{य}+\text{य}-१}{\text{य}-१}$$

$$=\frac{\text{यय}+\text{य}}{\text{य}-१}=\frac{\text{य}(\text{य}+१)}{\text{य}-१}$$

७. एक शेत, दोन मजूरांतून, एक जण ४ दिवसांत, आणि दुसरा ७ दिवसांत, याप्रमाणें ते कापूं शकतात. त्याणीं तें शेत बरोबर कापायास आरंभ केल्यावर, दुसरे दिवशीं तिसरा मजूर त्या कामांत मिळाला, तो एकटा तें शेत १० दिवसांत कापील असा होता. तो मजूर त्या दोन मजूरांचे संगतीं कांहीं वेळ काम करून, त्यांस सोडून गेला; सोडितेसमयीं असें कळलें, कीं त्या शेताचे चारपंचमांश कापले गेले. तेव्हां झाल्ये कामास किती दिवस लागले?

अंकगणितांतील कठीण उदाहरणें, बीजगणिताचे चिन्हांनीं उलगडायास, केवढें सोपें पडतें, हें दाखवायासाठीं हें उदाहरण घेतलें आहे.

तो पहिला मजूर, एक दिवसांत, ...
थांश कापितो, इत्यादि, तर तो क्ष दिवसांत क्षचा चतुर्थांश कापील, अथवा सर्व शेताचे $\frac{क्ष}{४}$ इतके कापील. तितकेच वेळांत दुसरा मजूर $\frac{क्ष}{७}$ इतकें कापील, परंतु तिसरा मजूर, एक दिवस उणें काम करतो, आणि तो एक दिवसांत शेताचा एक दशांश कापितो, तर, तो आपले वेळांत $\frac{क्ष-१}{१०}$ इतकें कापील. यामुळें, तिघां मिळून झालेलें काम या पुढील प्रमाणें आहे,

$$\frac{क्ष}{४}+\frac{क्ष}{७}+\frac{क्ष-१}{१०}$$

परंतु प्रश्नाचे संकेताप्रमाणें, वरचे तिघांचें सर्व काम मिळून, शेताचे $\frac{४}{५}$ कापले गेले, तर,

$$\frac{क्ष}{४}+\frac{क्ष}{७}+\frac{क्ष-१}{१०}=\frac{४}{५}$$

४, ७, १०, ५; या अंकांचा लघुतम गुणाकार १४० आहे

$$(\times)१४० \quad \frac{१४०क्ष}{४}+\frac{१४०क्ष}{७}+\frac{१४०}{१०}(क्ष-१)=\frac{४\times१४०}{५}$$

$$\text{अथवा} \quad ३५क्ष+२०क्ष+१४(क्ष-१)=११२$$

$$\text{अथवा} \quad ३५क्ष+२०क्ष+१४क्ष-१४=११२$$

$$\text{यामुळें,} \quad ६९क्ष-१४=११२$$

$$(+)१४ \quad ६९क्ष=१२६$$

$$(\div)६९ \quad क्ष=\frac{१२६}{६९}=\frac{४२}{२३}=१\frac{१९}{२३}$$

ताळा. एक दिवसांत आणि एक दिवसाचे $\frac{१९}{२३}$ शांत, पहिले मजूरानें शेताचे $\frac{१}{४}$ आणि $\frac{१}{४}$ चे $\frac{१९}{२३}$ श कापले, अथवा $\frac{१}{४}$ चे $\frac{४२}{२३}$; अथवा शेताचे $\frac{२१}{४६}$ कापले; दुसरे मजूरानें $\frac{१}{७}$ शाचे $\frac{४२}{२३}$ श अथवा $\frac{६}{२३}$. म्हणून शेताचे $\frac{१२}{४६}$ श कापले; आणि तिसरा मजूर, ज्याणें दुसरे दोघांपेक्षां १ दिवस उणें काम केलें, अथवा $\frac{१९}{२३}$ श दिवस काम केलें, त्याणें त्या वेळांत $\frac{१}{१०}$ चे $\frac{१९}{२३}$ श अथवा $\frac{१९}{२३०}$, म्हणजे $\frac{३८}{४६०}$

$२\frac{१}{२}$ आणि $६\frac{१}{३}$, यांचा साधारण गुणाकार ५७० आहेत; यांत $२\frac{१}{२}$ हे २२८ वेळा जातात, आणि त्यांत $६\frac{१}{३}$ हे ९० वेळा जातात. हेंही ५ यांचाही साधारण गुणाकार आहे. परंतु ५७०, हा लघुतम गुणाकार नव्हे, तर यांचा लघुतम गुणाकार १९ आहे, हा घेऊन शिकणारानें उदाहरण उलगडावें, परंतु ५७०, या साधारण गुणाकारानें, हें उदाहरण उलगडितों.

$$(\times)५७० \quad \frac{५७०}{२\frac{१}{२}}(\text{क्ष}-३)-\frac{५७०}{६\frac{१}{३}}(\text{क्ष}-४)=१७१०-\frac{५७०}{५}(\text{क्ष}+१)$$

$$\text{अथवा} \quad २२८(\text{क्ष}-३)-९०(\text{क्ष}-४)=१७१०-११४(\text{क्ष}+१)$$

$$\text{परंतु} \quad २२८(\text{क्ष}-३)=२२८\,\text{क्ष}-६८४ \text{ इत्यादि}$$

$$\text{यामुळें} \quad (२२८\,\text{क्ष}-६८४)-(९०\,\text{क्ष}-३६०)=१७१०-(११४\,\text{क्ष}+११४)$$

$$\text{अथवा} \quad २२८\,\text{क्ष}-६८४-९०\,\text{क्ष}+३६०=१७१०-११४\,\text{क्ष}-११४$$

$$(+)\overline{६८४+११४\,\text{क्ष}-३६०} \quad \text{तर } २२८\,\text{क्ष}-९०\,\text{क्ष}+११४\,\text{क्ष}=१७१०-११४+६८४-३६०$$

$$\text{अथवा} \quad २५२\,\text{क्ष}=१९२०$$

$$(\div)१२ \quad २१\,\text{क्ष}=१६०$$

$$(\div)२१ \quad \text{क्ष}=\frac{१६०}{२१}=७\frac{१३}{२१}$$

ताळा जर $\text{क्ष}=\frac{१६०}{२१}$ तर

$$\frac{\text{क्ष}-३}{२\frac{१}{२}}=\frac{\frac{९७}{२१}}{२\frac{१}{२}}=\frac{\frac{९७}{२१}}{\frac{५}{२}}=\frac{१९४}{१०५}=\frac{१९४}{५\times२१}$$

$$\frac{\text{क्ष}-४}{६\frac{१}{३}}=\frac{\frac{७६}{२१}}{\frac{१९}{३}}=\frac{२२८}{३९९}=\frac{२२८}{१९\times२१}$$

$$\text{३} - \frac{\text{क्ष} + \text{१}}{\text{५}} = \frac{\text{१३४}}{\text{५} \times \text{२१}}$$ हें वरचे बरोबर.

वरचे उदाहरणांपासून एकवर्णसमीकरणें उलगडायाचा या पुढील रीती निघतात.

**समीकरणांतील अपूर्णपदांचा अपूर्णपणा काढायाचा असेल, तर सर्व पदांचे छेदांचा कोणत्याही साधारण गुणाकारानें समीकरणाचा दोनही बाजू गूण; बहुत करून, या कृतीस लघुतम गुणाकार, दुसरे सर्व साधारण गुणाकारापेक्षां, सोईस पडतो.**

हीं वरची रीति या पुढील उदाहरणावर लागू करून दाखवितों.

$$\frac{\text{अ}}{\text{ब}} = \frac{\text{क}}{\text{ड}} \quad (\times)\ \text{बड} \quad \frac{\text{अबड}}{\text{ब}} = \frac{\text{कबड}}{\text{ड}}, \quad \text{अथवा अड} = \text{बक}$$

या समीकरणापासून शिकणारानें हीं पुढील समीकरणें उलगडावीं.

$$\text{अ} = \frac{\text{कब}}{\text{ड}}, \quad \text{ब} = \frac{\text{अड}}{\text{क}}, \quad \text{क} = \frac{\text{अड}}{\text{ब}}, \quad \text{ड} = \frac{\text{बक}}{\text{अ}}$$

$$\frac{\text{१}}{\text{अ}} = \frac{\text{ड}}{\text{कब}}, \quad \frac{\text{१}}{\text{ब}} = \frac{\text{क}}{\text{अड}}, \quad \frac{\text{१}}{\text{क}} = \frac{\text{ब}}{\text{अड}}, \quad \frac{\text{१}}{\text{ड}} = \frac{\text{अ}}{\text{बक}}$$

या पुढले समीकरणांतले, पहिले समीकरणावरून, शिकणारानें दुसरीं सर्व समीकरणें उलगडावीं.

$$\frac{\text{अब}}{\text{क्षय}} = \frac{\text{कड}}{\text{पक}}, \quad \text{अ} = \frac{\text{कडक्षय}}{\text{पकब}}, \quad \text{क्ष} = \frac{\text{अबपक}}{\text{कडय}}, \quad \frac{\text{अ}}{\text{य}} = \frac{\text{कडक्ष}}{\text{पकब}},$$

$$\frac{\text{अब}}{\text{क}} = \frac{\text{डक्षय}}{\text{पक}}, \quad \text{अबपक} = \text{क्षयकड}, \quad \frac{\text{ब}}{\text{डय}} = \frac{\text{कक्ष}}{\text{अपक}},$$

**२. समीकरणांतील कोणतेंही पद एका बाजूंतून काढून, दुसरे बाजूस, त्याचें चिन्ह बदल केल्यानें, नेलें जातें. यास स्थळांतर करणें ह्मणतात.** ही गोष्ट जर वरचे उदाहरणापासून आढळली नसली

लिहिल्यावरून स्पष्ट कळेल.

$$\text{अ}+\text{ब} = \text{क}+\text{ड}-\text{ई}$$

$$(-)\ \text{ब} \qquad \text{अ} = \text{क}+\text{ड}-\text{ई}-\text{ब}$$

$$(+)\ \text{ई} \qquad \text{अ}+\text{ई} = \text{क}+\text{ड}-\text{ब}$$

समीकरणांतील अपूर्ण पदांचा अपूर्णपणा काढण्याकरितां रीति लावल्येसमयीं, संभाळलें पाहिजे कीं, छेद काढल्यावर, जें चिन्ह पूर्वी अपूर्णपदाचे पुढें असतें, तें आतां अंशांचें चिन्ह होतें; यामुळें तें अंशपद कुंडळीमध्यें ठेविलें पाहिजे, नाहीं तर लागलीच मिळवणी किंवा वजाबाकी करून मांडलें पाहिजे. या सांगण्याचा अर्थ या पुढील उदाहरणावरून समजेल.

$$\text{क्ष}+\frac{\text{क्ष}-\text{अ}}{\text{ब}}-\frac{\text{क}+\text{क्ष}}{\text{अब}}=\text{ड}-\frac{\text{क्ष}-\text{ई}}{\text{अ}}$$

$$(\times)\ \text{अब} \qquad \text{अबक्ष}+\text{अ}(\text{क्ष}-\text{अ})-(\text{क}+\text{क्ष})=\text{अबड}-\text{ब}(\text{क्ष}-\text{ई})$$

$$\text{अथवा} \qquad \text{अबक्ष}+(\text{अक्ष}-\text{अअ})-(\text{क}+\text{क्ष})=\text{अबड}-(\text{बक्ष}-\text{बई})$$

$$\text{अथवा} \qquad \text{अबक्ष}+\text{अक्ष}-\text{अअ}-\text{क}-\text{क्ष}=\text{अबड}-\text{बक्ष}+\text{बई}$$

नवा शिकणारा अशी चूक बहुतकरून करितो. ह्मणजे. – क – क्ष यांचे स्थळीं आणि – बक्ष + बई यांचे स्थळीं – क + क्ष आणि – बक्ष – बई, असें लिहितो.

वरचे दुसऱ्या रीतीवरून उदाहरण,

$$\text{अबक्ष}+\text{अक्ष}+\text{बक्ष}-\text{क्ष} = \text{अबड}+\text{अअ}+\text{क}+\text{बई}$$

$$\text{अथवा} \quad (\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1)\,\text{क्ष} = \text{अबड}+\text{अअ}+\text{क}+\text{बई}$$

$$(\div)\ \overline{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1} \qquad \text{क्ष} = \frac{\text{अबड}+\text{अअ}+\text{क}+\text{बई}}{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1} \quad \cdots\cdots (1)$$

तांव्हा

$$\text{क्ष}-\text{अ} = \frac{\text{अबड}+\text{अअ}+\text{क}+\text{बई}}{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1}-\text{अ}$$

$$= \frac{\text{अबड}+\text{अअ}+\text{क}+\text{बई}-\text{अ}(\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1)}{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1}$$

$$= \frac{\text{अबड}+\text{अअ}+\text{क}+\text{बई}-\text{अअब}-\text{अअ}-\text{अब}+\text{अ}}{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1}$$

$$= \frac{\text{अबड}+\text{अ}-\text{अब}-\text{अअब}+\text{क}+\text{बई}}{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1}$$

$$\frac{\text{क्ष}-\text{अ}}{\text{ब}} = \frac{\text{अबड}+\text{अ}-\text{अब}-\text{अअब}+\text{क}+\text{बई}}{\text{ब}(\text{अब}+\text{अ}+\text{ब}-1)} \quad \cdots\cdots\cdots\cdots (2)$$

(१) (२) (३) आणि (४) या सर्वांस समछेद कर. ते याप्रमाणें होतील

(१) याचे अंश आणि छेद अब यांणीं गूण, (२) याचे अंश आणि छेद अ यांणीं गूण, (४) याचे अंश आणि छेद ब यांणीं गूण. नंतर हें समीकरण करून मांड

$$\text{क्ष}+\frac{\text{क्ष}-\text{अ}}{\text{ब}}-\frac{\text{क}+\text{क्ष}}{\text{अब}},\ \text{अथवा}\ (१)+(२)-(३)$$

अशी कृती केल्यानें याप्रमाणें निघेल

$$\frac{\text{अअबबड}+\text{अअबड}+\text{अबबई}+\text{अबई}-\text{अअब}-\text{अबड}-\text{बक}-\text{बई}}{\text{अब}\,(\text{अब}+\text{अ}+\text{ब}-१)}$$

अथवा याचे अंश आणि छेद ब यांणीं भागून $=\dfrac{\text{अअबड}+\text{अअड}+\text{अबई}+\text{अई}-\text{अअ}+\text{अड}-\text{क}-\text{ई}}{\text{अ}\,(\text{अब}+\text{अ}+\text{ब}-१)}$

तशीरीतीनेंही,

$\text{ड}-\dfrac{\text{क्ष}-\text{ई}}{\text{अ}}$ अथवा ड−(४), वरचे (१) + (२) − (३) याचे किंमती बरोबर होईल.

नवे शिकणारानें वरचीं समीकरणें कागदावर पुस्तकावांचून उलगडून मांडण्याविषयीं निपुण व्हावें

मनांत आण कीं वरचे समीकरणांत, क आणि ई, हीं दोनी शून्य आहेत, तर त्या समीकरणाचें याप्रमाणें पुढील रूप होईल

$$\text{क्ष}+\frac{\text{क्ष}-\text{अ}}{\text{ब}}-\frac{\text{क्ष}}{\text{अब}}=\text{ड}-\frac{\text{क्ष}}{\text{अ}}$$

त्यावरून क्षची किंमत ही होत्ये

$$\text{क्ष}=\frac{\text{अबड}+\text{अअ}}{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-१}$$

आणि यावरून मागें काढिलेलीं समीकरणाचा दोन बाजूची किंमत

$$\frac{\text{अअबड}+\text{अअड}-\text{अअ}-\text{अड}}{\text{अ}\,(\text{अब}+\text{अ}+\text{ब}-१)}$$

अथवा अंश आणि छेद अ याणी भागून $=\dfrac{\text{अबड}+\text{अड}-\text{अ}-\text{ड}}{\text{अब}+\text{अ}+\text{ब}-१}$

या सर्व पद्धती शिकणाराने समीकरणापासून काढाव्या.

वर सामान्य कृतीविषयीं गोष्टी झाल्या. आतां काहीं विशेष कृतीविषयीं शोध केला पाहिजे; ह्मणून त्या समजायासाठीं कसे कसे अर्थ केले पाहिजेत त्यांचा आतां विचार करितों. पूर्वी मनांत आली नवतीं अशीं तऱ्हेतऱ्हेचीं उदाहरणें पहाण्यांत येतील, आणि हरएक उदाहरण उलगडून सांगीतलें जाईल, आणि जी गोष्ट हरएक उदाहरणांत अगोदर पहाण्यांत आली नसेल, तीचें कारण दाखविण्याविषयीं, हर एक उदाहरणास एक एक कृत्य लावलें जाईल.

१. **उलटाविषय.** अ=२, ब=३, ड=$\frac{१}{६}$, असें असलें तर वरचें समीकरण याप्रमाणें होतें

$$क्ष+\frac{क्ष-२}{३}-\frac{क्ष}{६}=\frac{१}{६}-\frac{क्ष}{२}$$

$$तर\ क्ष=\frac{२\times३\times\frac{१}{६}+२\times२}{२\times३+२+३-१}=\frac{५}{१०}=\frac{१}{२}$$

वरचे समीकरणाचा ताळा पाहिला असतां, विपरीत गोष्ट त्वरेनें नजरेंत येईल. या उदाहरणांत क्ष=$\frac{१}{२}$ आहे, आणि समीकरणाचे दुसरे पदामध्यें क्ष−२, ह्मणजे $\frac{१}{२}$ उणें २ करायास अशक्य. यावरून असें दिसून येतें कीं **समीकरणाचें उत्तर शक्य निघून, त्या उत्तराने त्याचा ताळा पाहूं गेल्यास, तें समीकरण त्या रीतीनें अशक्य, असें दृष्टीस येतें.** तर ह्याच प्रश्न केला पाहिजे, कीं काहीं कृतीपासून असें समीकरण उत्पन्न होऊं शकतें कीं काय? जर होऊं शकतें, तर तें कृत्यच खोटें आहे, अथवा उलगडण्याची रीति खोटी आहे? उलगडण्याची रीति खोटी असल्यास ती नीट कशी करावी?

**दृष्टांतार्थ** उदाहरण. अ, बशीं याप्रमाणें करार करितो, कीं तुझी सर्व मालमत्ता घेऊन, तुझें सर्व कर्ज मी चुकवीन, मग दैवगतीनें नफा होऊ, किंवा तोटा होऊ. शोध केल्यावर, असें समजण्यांत आलें, कीं बची मालमत्ता, कर्जसहित, अचे मालमत्तेचे बरोबर आहे, इतकेंच कीं ब दुसरे पुरुषाशीं भागीदार आहे, आणि

यांनीं मिळून, तिसरे क पुरुषाशीं, वर प्रमाणेंच क-

वरचे अपूर्णांकाचे अंश आणि छेद यांस $\text{क्ष}^{\text{अ}}$ यांणीं भागून हें उत्तर झालें. हीं पुढील उदाहरणें त्याच प्रमाणें आहेत; पहिल्ये ओळींत खरी कृति आहे, दुसऱ्ये ओळींत रीतीचा खोटा विस्तार आहे:

$$\frac{\text{क्ष}^{३}}{\text{क्ष}^{४}} = \frac{\text{क्ष}^{३}}{\text{क्ष}^{३}.\text{क्ष}} = \frac{१}{\text{क्ष}} \qquad \frac{\text{क्ष}^{३}}{\text{क्ष}^{४}} = \text{क्ष}^{३-४} = \text{क्ष}^{-१}$$

$$\frac{\text{क्ष}^{२}}{\text{क्ष}^{८}} = \frac{\text{क्ष}^{२}}{\text{क्ष}^{२}.\text{क्ष}^{६}} = \frac{१}{\text{क्ष}^{६}} \qquad \frac{\text{क्ष}^{२}}{\text{क्ष}^{८}} = \text{क्ष}^{२-८} = \text{क्ष}^{-६}$$

$$\frac{\text{क्ष}^{१७}}{\text{क्ष}^{२०}} = \frac{\text{क्ष}^{१७}}{\text{क्ष}^{१७}.\text{क्ष}^{३}} = \frac{१}{\text{क्ष}^{३}} \qquad \frac{\text{क्ष}^{१७}}{\text{क्ष}^{२०}} = \text{क्ष}^{१७-२०} = \text{क्ष}^{-३}$$

रीति लागू होईल असें करायासाठीं, हेंच मान्य केलें पाहिजे कीं

$$\text{क्ष}^{-१},\ \text{क्ष}^{-६},\ \text{क्ष}^{-३}$$

यांस अद्यापि अर्थ नाहीं, तथापि तीं या पुढीलांचेजागीं मांडिलीं जातील, ह्मणून

$$\frac{१}{\text{क्ष}},\ \frac{१}{\text{क्ष}^{६}},\ \text{आणि}\ \frac{१}{\text{क्ष}^{३}}$$

ह्मणजे $\text{क्ष}^{-१}$ असें उत्तर आलें असलां, तें टाकून त्याचेजागीं $१ \div \text{क्ष}$ हें मांडावें त्याबदल $\text{क्ष}^{-१}$ आणि $१ \div \text{क्ष}$ या दोहोंचा अर्थ एकच आहे असें मानावें. आणि $\text{क्ष}^{-१}$ याला अद्यापि कांहीं अर्थ नाहीं, यामुळें त्याला इच्छेप्रमाणें भलता कांहींअर्थ दिला जाईल, यामुळें हें पुढील व्याख्यान स्थापिलें जातें:

**जा अक्षरास घातप्रकाशकचिन्ह ऋण आहे त्याचा अर्थ हाच, कीं एक भागिला त्याच अक्षरानें आणि त्या अक्षराचें जें अंकरूप घातप्रकाशक चिन्ह असेल तेंच त्यास धन करून लावावें; अथवा,**

$$\text{क्ष}^{-\text{अ}}\ \text{याचा अर्थ}\ \frac{१}{\text{क्ष}^{\text{अ}}}$$

गुणाकार आणि भागाकार यांचा दोन रीती सर्वत्र सामान्य आहेत असें आतां कळेल. वरचे रचनेप्रमाणें, हीं पुढील उदाहरणें देतों:

| | |
|---|---|
| $\frac{१}{क्ष^{३}} \div \frac{१}{क्ष^{८}} = \frac{१}{क्ष^{३}} \times \frac{क्ष^{८}}{१} = \frac{क्ष^{८}}{क्ष^{३}} = क्ष^{५}$ | $क्ष^{-३} \div क्ष^{-८} = क्ष^{-३-(-८)} = क्ष^{-३+८} = क्ष^{५}$ |
| $क्ष^{४} \times \frac{१}{क्ष^{६}} = \frac{क्ष^{४}}{क्ष^{६}} = \frac{१}{क्ष^{२}}$ | $क्ष^{४} \times क्ष^{-६} = क्ष^{४+(-६)} = क्ष^{४-६} = क्ष^{-२}$ |
| $\frac{१}{क्ष^{३}} \div क्ष^{४} = \frac{१}{क्ष^{३}} \times \frac{१}{क्ष^{४}} = \frac{१}{क्ष^{३+४}} = \frac{१}{क्ष^{७}}$ | $क्ष^{-३} \div क्ष^{४} = क्ष^{-३-४} = क्ष^{-७}$ |

घात प्रकाशकांविषयीं जें पूर्वीं व्याख्यान सांगीतलें त्यापेक्षां आतां कांहीं अधिक दाखविलें, ह्मणजे ज्या पदांचे घातप्रकाशक **धन** किंवा **ऋण** पूर्णांक असतील, तर सर्व पक्षीं मूळच्या दोन रीती खऱ्या रहातात. त्या रीति ह्याच आहेत, कीं

$$क्ष^{अ} \times क्ष^{ब} = क्ष^{अ+ब} \qquad क्ष^{अ} \div क्ष^{ब} = क्ष^{अ-ब}$$

परंतु अंकास किंवा अक्षरास **अपूर्ण** प्रकाशक असतील त्यांचा अर्थ माहीत नाहीं, जसें

$$क्ष^{\frac{१}{२}},\ क्ष^{\frac{१}{३}},\ क्ष^{\frac{३}{४}},\ क्ष^{२\frac{१}{२}},\ क्ष^{.६१} \text{ इत्यादि}$$

वरचे रीतीचे कांहीं खोटये विस्ताराने या वरल्ये चिन्हास सोप्ये रीतीने अर्थ देण्याचा विचार करण्यास आपल्ये मनांत अवश्य येईल तोंपर्यंत न थांबतां, आधींच ती रीति कशी आहे ती पहातों. आणि वरची रीति लागलीजाईल असा, $क्ष^{\frac{१}{२}}$ याचा अर्थ काय आहे ह्याविषयीं पहिल्यानें प्रश्न केला पाहिजे. $\frac{१}{२}+\frac{१}{२}=१$ ह्मणून या पक्षीं $क्ष^{\frac{१}{२}}$ याचा अर्थ या प्रमाणें केला पाहिजे

$$क्ष^{\frac{१}{२}} \times क्ष^{\frac{१}{२}} = क्ष^{\frac{१}{२}+\frac{१}{२}} = क्ष^{१} \text{ अथवा क्ष}$$

यामुळें, $क्ष^{\frac{१}{२}}$ तेंच परिमाण आहे, तें त्याणेंच गुणिलें असतां, गुणाकार क्ष होतो, अथवा अंकगणितरूपा प्रमाणें त्यास क्षचें **वर्गमूळ** ह्मणतात. त्याचप्रमाणें, $\frac{१}{३}+\frac{१}{३}+\frac{१}{३}=१$ ह्मणजे $क्ष^{\frac{१}{३}}$ याचा अर्थ याप्रमाणें केला पाहिजे ह्मणजे $क्ष^{\frac{१}{३}} \times क्ष^{\frac{१}{३}} \times क्ष^{\frac{१}{३}} = क्ष^{\frac{१}{३}+\frac{१}{३}+\frac{१}{३}} = क्ष^{१}$ अथवा क्ष

ह्मणजे, $क्ष^{\frac{१}{३}}$ हें क्षचें घनमूळ असावें. क्षचें **मूळ** ह्मटलें ह्मणजे तो शब्द घात याचे उलटा आहे; ह्मणजे, जर म हा नचा **त्रि** घात आहे, तर न यास मचें तृतीय मूळ ह्मणतात.

असें या पुढील प्रमाणें:

| नचें नाव. | मागल्ये नावावरून समीकरण |
|---|---|
| म चें वर्गमूळ | नन = म |
| म चें घनमूळ | ननन = म |
| म चें चतुर्घातमूळ | नननन = म |
| म चें पंचघातमूळ | ननननन = म |
| इत्यादि. | इत्यादि. |

असें, ४०९६ या अंकाचीं वर्गमूळ, घनमूळ, चतुर्घातमूळ, षड्घातमूळ, आणि द्वादश घातमूळ हीं निःशेष मुळें आहेत

त्याचें वर्गमूळ ६४ आहे, कां कीं $६४ \times ६४ = ४०९६$

त्याचें घनमूळ १६ आहे .... $१६ \times १६ \times १६ = ४०९६$

त्याचें चतुर्घातमूळ ८ आहे .... $८ \times ८ \times ८ \times ८ = ४०९६$

त्याचें षड्घातमूळ ४ आहे .... $४ \times ४ \times ४ \times ४ \times ४ \times ४ = ४०९६$

त्याचें द्वादश घातमूळ २ आहे .......... $\left\{ \begin{array}{l} २ \times २ \times २ \times २ \times २ \times २ \times \\ २ \times २ \times २ \times २ \times २ \times २ \end{array} \right\} = ४०९६$

जर मागल्ये अर्थावर विश्वास ठेविला, तर हीं उत्तरें अशा रीतीनें लिहिलीं पाहिजेत:

$$६४ = (४०९६)^{\frac{१}{२}} \qquad ८ = (४०९६)^{\frac{१}{४}}$$

$$१६ = (४०९६)^{\frac{१}{३}} \qquad ४ = (४०९६)^{\frac{१}{६}}$$

$$२ = (४०९६)^{\frac{१}{१२}}$$

परंतु, अंकगणितांतील लिहिण्याचे पद्धती प्रमाणें तीं अशीं लिहिलीं पाहिजेत:

$$६४ = \sqrt{४०९६}\text{*} \qquad ८ = \sqrt[४]{४०९६}$$
$$१६ = \sqrt[३]{४०९६} \qquad ४ = \sqrt[६]{४०९६}$$
$$२ = \sqrt[१२]{४०९६}$$

अपूर्ण प्रकाशकाचे अर्थाची गोष्ट पुढें चालत असतां, $क्ष^{\frac{२}{३}}$ ह्याचा अर्थ $क्ष^{२}$ चें घनमूळ असा असावा; कां कीं, वरच्या रीति खऱ्या असाव्या असें जर आहे, तर या प्रमाणें असावें

$$क्ष^{\frac{२}{३}} \times क्ष^{\frac{२}{३}} \times क्ष^{\frac{२}{३}} = क्ष^{\frac{२}{३}+\frac{२}{३}+\frac{२}{३}} = क्ष^{२}$$

आणि, तशीच कल्पनेनें, अनुमान केलें जातें, कीं $क्ष^{\frac{म}{न}}$ हें $क्ष^{म}$ चें न मूळाचे ठिकाणीं असावें. परंतु मूळें आणि घात यांचे परस्पर संबंधाविषयीं कांहीं अधिक माहिती झाल्यावाचून, पूर्वीं सांगीतलेला अर्थ खरा आहे कीं नाहीं याचा निश्चय करवत नाहीं, असें एथें दाखविलें जाईल. उदाहरण,

$क्ष^{२\frac{१}{२}}$ अथवा $क्ष^{२+\frac{१}{२}}$ हें $क्ष^{२} \times क्ष^{\frac{१}{२}}$ अथवा $क्ष^{२}\sqrt{क्ष}$ असें असावें

परंतु $२\frac{१}{२} = \frac{५}{२}$ ; यामुळें,

$क्ष^{२\frac{१}{२}}$ हें $क्ष^{\frac{५}{२}}$ अथवा $\sqrt{क्ष^{५}}$ असें असावें

यामुळें, $क्ष^{२}\sqrt{क्ष}$ हें $\sqrt{क्ष^{५}}$ असें असावें

यांत, **असें असावें**, या शब्दावरून असें समजतें कीं जर असें नसलें तर पूर्वींचे सांगीतले अर्थानें घेतलेले अपूर्णांकरूप घातप्रकाशकास अंकगणिताची चालती रीति लागू करवत नाहीं.** पुनः $\frac{१}{२}+\frac{१}{३} = \frac{५}{६}$ तर

---

* $\sqrt{}$ हें चिन्ह वर्गमूळ दाखविण्यासाठीं आतां बहुत करून कामांत घेतात, आणि, बीजगणिताने होणाऱ्या शंभर उदाहरणांतून नव्याण्णव उदाहरणांत वर्गमुळापेक्षां मोठें मूळ येत नाहीं.

---

**. शिकणारानें ध्यानांत आणावें, कीं $क्ष^{२\frac{१}{२}}$ आणि $क्ष^{\frac{५}{२}}$, या दोहोंची घालमेल न होई असें संभाळून, भिन्नभिन्न अर्थ मनांत आणितां येतील. परंतु $२\frac{१}{२}$ आणि $\frac{५}{२}$ हे कोठें कोठें भिन्न भिन्न अर्थाचे आहेत, अशी कल्पना करण्यास अडचण पडेल.

$क्ष^{\frac{१}{२}} \times क्ष^{\frac{१}{३}}$ अथवा $\sqrt{क्ष} \times \sqrt[३]{क्ष}$ हें $क्ष^{\frac{५}{६}}$ अथवा $\sqrt[६]{क्ष^{५}}$ असें असावें परंतु अद्यापि सिद्ध केलें नाहीं, कीं

$$क्ष^{२}\sqrt{क्ष} = \sqrt{क्ष^{५}} \text{ अथवा } \sqrt{क्ष} \times \sqrt[३]{क्ष} = \sqrt[६]{क्ष^{५}}$$

कल्पिलेल्या अर्थावरून अद्यापि खोटें उत्तर होत नाहीं हें दाखविण्याकरितां पुढील **अंकगणितरूपाचे** सिद्धांत पहिल्यानें सांगतों.

१ **सिद्धांत.** जर ब पेक्षां अ **अधिक** आहे, तर $ब^{२}$ पेक्षां $अ^{२}$, आणि $ब^{३}$ पेक्षां $अ^{३}$ **अधिक** आहे, इत्यादि. कांकीं यापक्षीं अअ हें अशा गुणाकाराचें उत्तर आहे कीं जांत, ब मध्यें जितके एक आहेत त्याहून अधिक वेळा, ब हून कांहीं अधिक घेतलें आहे; यामुळें बब पेक्षां अअ अधिक आहे: $अ^{३}$, अथवा $अ^{२}अ$, यांत ब मध्यें जितके एक आहेत, त्याहून अधिक वेळा $ब^{२}$, हून कांहीं अधिक घेतलें आहे, आणि या प्रमाणें पुढेंही. अक्षरांचे क्रम फिरवून, दुसऱ्या शब्दांनीं सिद्धांत सांगीतला जाईल, जसें: जर अ पेक्षां ब कमी आहे, तर $अ^{३}$ पेक्षां $ब^{३}$ कमी आहे, इत्यादि.

२ **सिद्धांत.** जर ब पेक्षां अ **अधिक** आहे, तर $ब^{-१}$ या पेक्षां $अ^{-१}$ आणि $ब^{-२}$ या पेक्षां $अ^{-२}$ **कमी** आहेत. कांकीं जर ब पेक्षां अ अधिक आहे, तर $\frac{१}{ब}$ यापेक्षां $\frac{१}{अ}$ कमी होईल; आणि त्यापक्षीं, $ब^{२}$ पेक्षां $अ^{२}$ अधिक आहे, यामुळें $\frac{१}{ब^{२}}$ यापेक्षां $\frac{१}{अ^{२}}$ कमी आहे, आणि या प्रमाणें पुढेंही. त्याच सारिखें, जर ब पेक्षां अ **कमी** असेल, तर $ब^{-१}$ यापेक्षां $अ^{-१}$ अधिक आहे. इत्यादि.

३ **सिद्धांत.** जर बचे **बरोबर** अ असेल, तर $ब^{२}$ याचे **बरोबर** $अ^{२}$ आहे, आणि $ब^{३}$ याचे बरोबर $अ^{३}$ आहे, आणि याप्रमाणें पुढें ही. ही गोष्ट **५६ व्ये पृष्ठावरून** स्पष्ट आहे.

४ **सिद्धांत.** जर बचे **बरोबर** अ असेल, तर बचे वर्गमूळा **बरोबर** अचें वर्गमूळ होईल, आणि बचे घनमूळा बरोबर अचें घनमूळ होईल, आणि याप्रमाणें पुढेंही. ह्मणजे अ आणि ब बरोबर असून, त्यांचें पंचघात मूळ दाखविण्यासाठीं म आणि न घे, तर म आणि न यांचे पंचघात अ आ-

णि ब आहेत; जर या दोहोंतून म अधिक असेल, तर, **पहिल्ये सिद्धांता** प्रमाणें, त्याच्या पंचघात अ, हा ब पेक्षां अधिक होईल, परंतु एथे तसें नाहीं. त्याच सारिखें, जर दोहोंतून न अधिक असला, तर अ पेक्षां ब अधिक होईल; याजकरितां न चे बरोबर म खचित असावा. याजप्रमाणें कोणताही दुसरा पक्ष सिद्ध केला जाईल.

**५ सिद्धांत.** जर ब पेक्षां अ **अधिक** आहे, तर ब चे वर्गमूळापेक्षां अ चें वर्गमूळ **अधिक** आहे. अ त्याचे वर्गमूळाच्या वर्ग आहे, आणि बही तसाच आहे; ह्मणून जर **तिसरे सिद्धांता** प्रमाणें ब चे वर्गमूळा **बरोबर** अ चें वर्गमूळ असेल, तर पहिल्याच्या वर्ग अथवा ब याचे **बरोबर** दुसऱ्याचा वर्ग अथवा अ होईल, परंतु एथें तसें नाहीं. जर **पहिल्ये सिद्धांता** प्रमाणें ब चे वर्गमूळापेक्षां अ चें वर्गमूळ **कमी** असेल, तर पहिल्याच्या वर्ग अथवा ब यापेक्षां दुसऱ्याच्या वर्ग अथवा अ **कमी** होईल, परंतु एथें तसें नाहीं. तर याशिवाय इतकाच संभव राहिला आहे, कीं जेव्हां ब पेक्षां अ **अधिक** आहे, तेव्हां ब चे वर्गमूळापेक्षां अ चें वर्गमूळ **अधिक** आहे. त्याच सारिखें, जर ब पेक्षां अ **कमी** आहे, तेव्हां ब चे वर्गमूळापेक्षां अ चें वर्गमूळ **कमी** आहे: आणि याप्रमाणें पुढेंही.

**६ सिद्धांत.** अंकगणितरूप परिमाणाला अंकगणितरूप वर्गमूळ किंवा घनमूळ किंवा दुसरें कोणतें मूळ एकच आहे. कांकीं शक्य असेल, तर अ याला म आणि न हीं दोन **निरनिराळीं** घनमूळें आहेत अशी कल्पना कर; या दोहोंतून एक अधिक असावें, तें म असो. तेव्हां, **१. सिद्धांता** प्रमाणें न च्या घन अथवा अ यापेक्षां म च्या घन अथवा अ अधिक आहे; परंतु असें ह्मणणें हें विरुद्ध आहे, याजकरितां अला दोन **निरनिराळीं** घन इत्यादि मूळें होऊं शकत नाहींत.

सर्व पूर्णांकांचीं वर्गमूळें किंवा घनमूळें, पूर्णांक नाहींत; आणि जसजसा मूळप्रकाशकाचा क्रम वाढतो तसतसा कांहीं सांगीतल्ये मर्यादेमध्यें

जांस अशेजातीचें मूळ आहे त्या मूळांतील पूर्णांक कमी कमी होत जातात. ही गोष्ट या पुढील कोष्टकावरून दाखविली जात्ये.

| अंकजांस पूर्णांक वर्ग मूळ | घन मूळ | चतुर्घात मूळ | पंचघात मूळ | षड्घात मूळ | मूळांची किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ | १ | १ |
| ४ | ८ | १६ | ३२ | ६४ | २ |
| ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | ३ |
| १६ | ६४ | २५६ | १०२४ | ४०९६ | ४ |
| २५ | १२५ | ६२५ | ३१२५ | १५६२५ | ५ |
| ३६ | २१६ | १२९६ | ७७७६ | ४६६५६ | ६ |
| ४९ | ३४३ | २४०१ | १६८०७ | ११७६४९ | ७ |
| ६४ | ५१२ | ४०९६ | ३२७६८ | २६२१४४ | ८ |
| ८१ | ७२९ | ६५६१ | ५९०४९ | ५३१४४१ | ९ |
| १०० | १००० | १०००० | १००००० | १०००००० | १० |
| इत्यादि | इ० | इ० | इ० | इ० | |

ज्या अंकास पूर्णमूळ नाहीं, त्यास बरोबरच अपूर्णांक मूळही नाहीं. सद्य; सिद्ध केल्यावाचून, ही पुढील प्रतिज्ञा केवळ सांगतों; त्याचे विरुद्ध असेल तें शोधून पहाण्यासाठीं शिकणारावर ठेवितों.

**अपूर्णांकांचा* कोणताही घात किंवा कोणतें ही मूळ पूर्णांक होऊं शकत नाहीं.**

---

* ह्मणजे ज्या अपूर्णांकाची किंमत केवळ पूर्णांक नाहीं त्याच अपूर्णांकाविषयीं ही गोष्ट आहे; कांकीं $\frac{४}{२}$, $\frac{६४}{४}$, इत्यादि यांस जरी अपूर्णांकाचें रूप आहे तथापि ते पूर्णांक आहेत.

ज्या कृत्यांत अंकाचें मूळ काढावयाचें असतें, तो अंक त्या मूळासुद्धां अनंत पर्यंत वाढविलेल्या वरचा कोष्टकांतील असला, तर तें कृत्य खरे कल्पनेचें आहे; याशिवाय ज्यांत अंकांचीं मूळें काढावयाचीं असतात, अशीं अंकगणिताचीं आणि बीजगणिताचीं सर्व कृत्यें खोट्या कल्पनेचीं आहेत. परंतु जरी अशा तऱ्हेचे कृत्यांचें **बरोबर निःशेष** उलगडणें होत नाहीं, तरी इच्छे प्रमाणें खरे उत्तराचे जवळ जवळ मूळें काढावयाचा रीती आहेत, हें दाखविलें जाईल; ह्मणून, हा पुढील सिद्धांत स्थापिला जाईल.

**जरी असा कांहीं अपूर्णांक नाहीं कीं ज्याचा न घात कांहीं सांगीतलें पूर्णांकाचे बरोबर आहे, तरी असा अपूर्णांक कल्पून घेतला जाईल कीं ज्याचा न घात आणि त्या सांगीतल्या पूर्णांकाचें अंतर कोणत्येही सांगीतल्या परिमाणापेक्षां कमी होईल, ह्मणजे ·०००१ अथवा ·०००००१, अथवा दुसऱ्ये कोणत्येही लहान अपूर्णांकापेक्षां कमी होईल.**

पहा. अशा तऱ्हेचा अपूर्णांक काढायाला कोणती रीति सोईस पडत्ये हें एथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं, परंतु तें काढतां येतें ही गोष्ट मात्र सिद्ध करून दाखवायाची आहे. वर्गमूळ आणि घन मूळ यांविषयीं ही गोष्ट अंकगणितांत सांगीतली आहे. याचा ताळा सिद्ध करायासाठीं कांहीं विस्तारानें सांगीतलें पाहिजे, तर हे पुढील **लेम्मे*** स्थापितों.

१ **लेम्मा.** दोन या अंकाचे घात एकमिळवणीनें केले जातात: जसें,

$$२+२ = २^{२} \qquad २^{२}+२^{२} = २^{३} \qquad २^{३}+२^{३} = २^{४}$$

अथवा सामान्यतः

$$२^{न}+२^{न} = २^{न}\times२ = २^{न+१}$$

२ **लेम्मा.** अपूर्णांकाचे घात, अंश आणि छेदाचे घातापासून केले जातात: जसें,

$$\left(\frac{अ}{ब}\right)^{३} = \frac{अ}{ब}\times\frac{अ}{ब}\times\frac{अ}{ब} = \frac{अअअ}{बबब} = \frac{अ^{३}}{ब^{३}}.$$

---

* लेम्मा ह्मणजे, प्रतिज्ञा आहे जी दुसऱ्ये कांहीं प्रतिज्ञेचा ताळा सिद्ध करायास साधनासाठीं कामांत घेतात.

३ **लेम्मा**. जर क पेक्षां प कमी असेल, तर अक पेक्षां अप कमी होईल.

जर क पेक्षां प कमी असेल, आणि ब पेक्षां अ कमी असेल, तर बक पेक्षां अप कमी होईल.

४ **लेम्मा**. जर एकंमापेक्षां वि कमी असेल, तर तिचे घात पदोपदीं घरत जातात. उदाहरण, जर वि एक द्वितीयांश असेल, तर तिचा वर्ग $\left(\frac{१}{२} \times \frac{१}{२}\right)$ ह्मणजे एक द्वितीयांशाचा द्वितीयांश हा वि पेक्षां कमी आहे; तिचा घन एक चतुर्थांशाचा द्वितीयांश आहे, ह्मणजे हा वि$^{२}$ पेक्षां कमी आहे; आणि याप्रमाणें पुढेंही.

५ **लेम्मा**. जर कांहीं पद्धतीचा धन पदांतील एक पद अधिक केलें असतां, ती सर्व पद्धती अधिक होत्ये, इत्यादि. जसें, अ−ब ह्या पद्धतींत अ अधिक केला असतां ती अधिक होत्ये, आणि अ कमी केला असतां कमी होत्ये; परंतु ब **अधिक केला असतां** ही पद्धती **कमी** होत्ये, आणि ब **कमी** केला असतां **अधिक** होत्ये.

६ **लेम्मा. जर १ पेक्षां वि कमी असेल,** तर

$(१+वि)^{२}$ ही पद्धती, १+३ वि अथवा १+(४−१) वि यापेक्षां कमी आहे

$(१+वि)^{३}$ ही, १+७ वि अथवा १+(८−१) वि हिजपेक्षां कमी आहे

$(१+वि)^{४}$ ही, १+१५ वि अथवा १+(१६−१) वि हिजपेक्षां कमी आहे

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

अथवा $(१+वि)^{न}$ ही, $१+(२^{न}-१)$ वि हिजपेक्षां कमी आहे

पहिल्यानें, $(१+वि)^{२}$ अथवा $(१+वि)(१+वि) = १+२ वि+वि^{२}$;
४ **लेम्मा** वरून वि$^{२}$ पेक्षां वि अधिक आहे, तर वि$^{२}$ चे स्थळीं वि मांडिली असतां ५ **लेम्मा** प्रमाणें ती पद्धती अधिक होत्ये. परंतु असें केल्यानें ती याप्रमाणें होत्ये, १+२ वि+वि अथवा १+३ वि. यामुळें $१+२ वि+वि^{२}$ ही १+३ वि हिजपेक्षां कमी आहे; ह्मणजे, $(१+वि)^{२}$ ही १+३ वि हिजपेक्षां कमी आहे.

पुनः $(१+\text{वि})^{२}$ ही, $१+३\,\text{वि}$ पेक्षां कमी आहे

तर **३ लेम्मा** वरून $(१+\text{वि})^{२}(१+\text{वि})$ ही, $(१+३\text{वि})(१+\text{वि})$ हिजपेक्षां कमी आहे

अथवा $(१+\text{वि})^{३}$ ही, $१+४\text{वि}+३\text{वि}^{२}$ हिजपेक्षां कमी आहे

आणि पूर्वीप्रमाणें **४ आणि ५ लेम्मा** वरून $(१+\text{वि})^{३}$ ही $१+४\text{वि}+३\text{वि}$ अथवा $१+७\text{वि}$ हिजपेक्षां फार कमी असावी

पुनः $(१+\text{वि})^{३}$ ही, $१+७\text{वि}$ पेक्षां कमी आहे

यामुळें $\left.\begin{array}{r}(१+\text{वि})^{४} \text{ ही}, (१+७\text{वि})(१+\text{वि})\\ \text{अथवा } १+८\text{वि}+७\text{वि}^{२}\end{array}\right\}$ यांजपेक्षां कमी आहे

$\left.\begin{array}{r}(१+\text{वि})^{४} \text{ ही}, १+८\text{वि}+७\text{वि}\\ \text{अथवा } १+१५\text{वि}\end{array}\right\}$ यांजपेक्षां फार कमी असावी

याप्रमाणें हवे तितके क्रमक्रमानें पुढें चालतां येईल, परंतु खालीं लिहिलेली सिद्धता अशी तऱ्हेची आहे, कीं तिजमध्यें सर्व विषय येतात. वरचा पद्धतींतून एक खरी आहे असें मनांत आणून जी मध्यें न घात आहे ती खरी असेंस्रण; ह्मणजे याप्रमाणें असावें.

$(१+\text{वि})^{न}$ ही, $१+(२^{न}-१)\,\text{वि}$ हिजपेक्षां कमी आहे

तर **३ लेम्मा**वरून $(१+\text{वि})^{न}(१+\text{वि})$ ही $\{१+(२^{न}-१)\text{ वि}\}(१+\text{वि})$ हिजपेक्षां कमी आहे

वरचा गुणाकार याप्रमाणें होईल :

$$\begin{array}{rl} & १+(२^{न}-१)\,\text{वि}\\ & १+\phantom{(२^{न}-१)}\,\text{वि}\\ \hline & १+(२^{न}-१)\,\text{वि}\\ & \phantom{१+}\quad\text{वि}+(२^{न}-१)\,\text{वि}^{२}\\ \hline \text{बेरीज} & १+२^{न}\text{वि}\quad+(२^{न}-१)\,\text{वि}^{२}\\ \hline \end{array}$$

अथवा $(१+\text{वि})^{न+१}$ ही, $१+२^{न}\text{वि}+(२^{न}-१)\,\text{वि}^{२}$ यापेक्षां कमी आहे

तर ४ आणि ५ लेम्मावरून $१+वि^{न+१}$ ही $१+२^{न}वि+(२^{न}-१)$ वि } यांजपेक्षां ही फार
अथवा $१+(२^{न}+२^{न}-१)$ वि } कमी असावी.
अथवा १ लेम्मावरून $१+(२^{न+१}-१)$ वि }

यावरून सिद्ध झालें कीं

जर $(१+वि)^{न}$ ही $१+(२^{न}-१)$ वि हिजपेक्षां कमी आहे

तर असा निश्चय होतो, कीं $(१+वि)^{न+१}$ ही $१+(२^{न+१}-१)$ वि हिजपेक्षां कमी आहे

अथवा या लेम्मांतल्ये वेगवेगळे सांगीतलेले प्रतिज्ञेचे क्रमांतून प्रत्येक प्रतिज्ञा खरी असावी, जर तिचे वरची खरी आहे. परंतु पहिली सिद्ध झाली या मुळें बाकीच्या सर्व सिद्ध झाल्या.

**७ लेम्मा. जर अ पेक्षां क्ष अधिक असेल**, तर

$(क्ष+अ)^{२}$ ही $क्ष^{२}+३$ अक्ष अथवा $क्ष^{२}+(४-१)$ अक्ष हिजपेक्षां कमी आहे

$(क्ष+अ)^{३}$ ही $क्ष^{३}+७$ $अक्ष^{२}$ अथवा $क्ष^{३}+(८-१)$ $अक्ष^{२}$ हिजपेक्षां कमी आहे

$(क्ष+अ)^{४}$ ही $क्ष^{४}+१५$ $अक्ष^{३}$ अथवा $क्ष^{४}+(१६-१)$ $अक्ष^{३}$ हिजपेक्षां कमी आहे

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

अथवा $(क्ष+अ)^{न}$ ही $क्ष^{न}+(२^{न}-१)$ $अक्ष^{न-१}$ . . . . . . . . हिजपेक्षां कमी आहे

अपेक्षां क्ष मोठा आहे; यामुळें $\frac{अ}{क्ष}$ हा १ पेक्षां कमी आहे; यामुळें, **६ लेम्मा** वरून

$\left(१+\frac{अ}{क्ष}\right)^{न}$ ही $१+(२^{न}-१)\frac{अ}{क्ष}$ हिजपेक्षां कमी आहे

परंतु $१+\frac{अ}{क्ष}=\frac{क्ष+अ}{क्ष}$ ∴ **२ लेम्मा** वरून $\left(१+\frac{अ}{क्ष}\right)^{न}=\frac{(क्ष+अ)^{न}}{क्ष^{न}}$

यामुळें $\frac{(क्ष+अ)^{न}}{क्ष^{न}}$ ही $१+(२^{न}-१)\frac{अ}{क्ष}$ हिजपेक्षां कमी आहे

दोन्ही बाजू $क्ष^{न}$ याणें गुण, तर **३ लेम्मा** वरून या प्रमाणें होईल

$(क्ष+अ)^{न}$ ही $क्ष^{न}+(२^{न}-१)\frac{अक्ष^{न}}{क्ष}$ } यांजपेक्षां कमी आहे
अथवा $(क्ष+अ)^{न}$ ही $क्ष^{न}+(२^{न}-१)$ $अक्ष^{न-१}$ }

**१७७ पृष्ठावरची** प्रतिज्ञा एका विशेष पक्षाला लावून सांगतों. १० हा अंक घेतला असें ह्मण, आणि घन हा सांगीतला घात आहे असें मानून आण. तर असा कांहीं अपूर्णांक काढितां येईल कीं ज्याचा घन १० यांचे

आंत ·०००१ इतके अंतरानें होईल? $(२)^३ = ८$, आणि $(३)^३ = २७$, तर २ कमी आहेत आणि ३ अधिक आहेत असें दिसतें. तर २ आणि ३ यांचेमधील २·१, २·२, २·३, इत्यादि या अपूर्णांकांचे घन तपासून पहा. $(२·१)^३ = ९·२६१$, आणि $(२·२)^३ = १०·६४८$; यांत २·१ हे कमी आहेत, आणि २·२ हे अधिक आहेत. आतां २·१ आणि २·२ यांचे मधले २·११, २·१२, २·१३, इत्यादि या अपूर्णांकांचे घन तपासून पहा. तर हें कळलें जातें

$$(२·१५)^३ = ९·९३८३७५ \qquad (२·१६)^३ = १०·०७७६९६$$

यामुळें २·१५ कमी आहेत, आणि २·१६ अधिक आहेत.

या प्रमाणें पुढें चालले असतां, हें कळलें जाईल, कीं

| | |
|---|---|
| $(२·१५४)^३$ हे १० पेक्षां कमी आहेत, | $(२·१५५)^३$ हे १० पेक्षां अधिक आहेत |
| $(२·१५४४)^३$ हे १० पेक्षां ········ | $(२·१५४५)^३$ हे १० पेक्षां ·········· |
| $(२·१५४४३)^३$ हे १० पेक्षां ········ | $(२·१५४४४)^३$ हे १० पेक्षां ·········· |
| इत्यादि. | इत्यादि. |

अशी रीतीनें दोन अपूर्णांक काढितां येतील, कीं ज्यांतून एकाचा घन १० पेक्षां कमी आणि दुसऱ्याचा घन १० पेक्षां अधिक होईल, परंतु ते दोनही घन १० चा इतके जवळ असावे, कीं त्या घनांचें आणि १० चें अंतर ·०००१ इतकें होईल, हा मात्र प्रश्न करावयाचा राहिला आहे. वरचे क्रमांतून हें पहा कीं

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २·२ | हे | २·१ | यांपेक्षां केवळ | ·१ इतक्यानें अधिक आहेत. |
| २·१६ | हे | २·१५ | यांपेक्षां० | ·०१ इतक्यानें अ० |
| २·१५५ | हे | २·१५४ | यांपेक्षां० | ·००१ इतक्यानें अ० |
| २·१५४५ | हे | २·१५४४ | यांपेक्षां० | ·०००१ इतक्यानें अ० |
| इत्यादि. | | इत्यादि. | | इत्यादि. |

आणि ७ वे लेम्मा वरून जर क्ष पेक्षां अ कमी असेल, तर

$(क्ष+अ)^३$ ही $क्ष^३ + ७अक्ष^२$ यांपेक्षां कमी आहे

अथवा $(क्ष+अ)^३ - क्ष^३$ ही $७अक्ष^२$ यांपेक्षां कमी आहे

वरचे क्रमांतील अपूर्णांकांतून एक कमी अपूर्णांक दाखविण्यासाठीं क्ष घे; तर १० पेक्षां $क्ष^3$ कमी आहे ह्मणून क्ष हा ३ पेक्षां कमी असावा, आणि त्याचा वर्ग ही ९ पेक्षां कमी असावा. यामुळें $७ अ क्ष^2$ हे ७ अ×९, अथवा ६३ अ यांपेक्षां कमी असावे. आणि $(क्ष+अ)^3 - क्ष^3$ ही $७ अ क्ष^2$ पेक्षां कमी आहे यावरून ६३ अ पेक्षां फारच कमी असावी. वरचे अधिक अपूर्णांक दाखविण्यासाठीं क्ष+अ घे; तर यांचें अंतर अ, कृतीचा क्रम पुढें चालविला असतां, ·०००००० १ इतकें होईल, यामुळें, ६३ अ हे ·०००००६३ हे ·००००१ यापेक्षां कमी आहेत. यामुळें क्ष ची किंमत अशी निघेल, कीं

$क्ष^3$ हा १० पेक्षां कमी आहे $(क्ष+·००००००१)^3$ ही १० पेक्षां अधिक आहे

आणि $(क्ष+·००००००१)^3 - क्ष^3$ ही ·००००१ हिजपेक्षां कमी आहे.

परंतु १० हे या दोन घनाचेमध्यें आहेत, ह्मणून १० यांशीं जीं दोन निरनिराळ्ये घनांचीं अंतरें आहेत, तीं त्या दोन घनांचे अंतरापेक्षां कमी होतील; यामुळें त्यांतून कोणताही अपूर्णांक घेतला, तर त्याचा घन इच्छित्याप्रमाणें १० चे जवळ होईल. इच्छिलेले अपूर्णांक काढिले असतां या प्रमाणें होतील, २·१५४४३४६ आणि २·१५४४३४७. तशाच रीतीने दुसरे ही पक्ष उलगडले जातील

यावरून, या पुढील प्रमाणें बोलण्याची तऱ्हा कामांत आणावी लागत्ये. १० यांस पूर्ण घनमूळ नाहीं, असें ह्मणण्याबद्दल या प्रमाणें ह्मटलें पाहिजे, कीं ज्या अपूर्णांकांचे घन इच्छे प्रमाणें १० चे जवळजवळ येतील असे अपूर्णांक काढितां येतील, आणि $\sqrt[3]{१०}$ हें पूर्ण घनमूळ असें जाणून त्या अपूर्णांकास १० चे घनमूळाचा जवळचे आहेत असें ह्मणतात. ह्मणजे, $(२·१५४४३४६)^3$ हे १० चा बरोबरीस जितके जवळ आहेत तितके $(२·१५४)^3$ हे नाहींत, असें ह्मणण्याबद्दल, २·१५४४३४६ हे जितके १० चा घनमूळाजवळचे आहेत तितके २·१५४ हे नाहींत असें ह्मणतात.

हे पुढील शब्द ज्या अर्थानें कामांत घेतात त्यांचा तो अर्थ आतां शिकणारास समजेल:

**प्रत्येक पूर्णांकास आणि अपूर्णांकास अगदी बरोबरीचें किंवा जवळचें या दोहोंतून एकतरी मूळ असतें.**

$\sqrt[6]{\text{अ}^5}$ यांत अ=१० घे, तर $\text{अ}^5$=१०००००. आतां, $\sqrt{\text{अ}}\times\sqrt[3]{\text{अ}} = \sqrt[6]{\text{अ}^5}$ हें सर्वपक्षीं सिद्ध केल्यावर आणि अ ची किंमत वरप्रमाणें असली, तर या समीकरणावरून काय अर्थ समजावा? हाच अर्थ समजावा कीं दोन अपूर्णांक निघतील ज्यांचा वर्ग आणि घन इच्छेप्रमाणें १० चे जवळजवळ होईल, ह्मणजे ·०००१ इतके जवळ आहेत असें ह्मण, तर अशी अपूर्णांकास $\sqrt{१०}$ आणि $\sqrt[3]{१०}$ यांचा जवळच्या किंमती असें ह्मटलें जाईल, आणि हे दोन अपूर्णांक परस्पर गुणिले असतां, जो गुणाकार होईल, त्याचा षड्घात केला असतां, तो $१०^5$ यांचे तितकाच जवळ जवळ येईल, अथवा $\sqrt[6]{१०^5}$ यांचे जवळचे किंमतीचा होईल. या दोन प्रतिज्ञेचा ताळा अगोदरच अनुमानांत घेतों, कारण कीं शुद्ध प्रतिज्ञेपासून जवळजवळचे प्रतिज्ञेंत जावयाचे रीतीचें एक उदाहरण सांगितल्यानें तें सर्वांस लागू पडेल.

मनांत आण कीं अ असा कांहीं अंक आहे कीं ज्याला निःशेष वर्गमूळ आणि घनमूळ हीं दोन्हीं आहेत, जसें ६४, अथवा $\frac{१}{७२९}$. त्याचें वर्गमूळ दाखवायासाठीं क्ष घे, आणि घनमूळ दाखवायासाठीं य घे. तर

$$\text{क्ष}^2=\text{अ यामुळें } (\text{क्ष}^2)^3 = \text{अ}^3 \text{ अथवा } \text{क्ष}^2\cdot\text{क्ष}^2\cdot\text{क्ष}^2 = \text{अ}^3 \text{ अथवा } \text{क्ष}^6 = \text{अ}^3,$$

$$\text{य}^3=\text{अ यामुळें } (\text{य}^3)^2 = \text{अ}^2 \text{ अथवा } \text{य}^3\cdot\text{य}^3 = \text{अ}^2 \text{ अथवा } \text{य}^6 = \text{अ}^2$$

$$\therefore \text{क्ष}^6\text{य}^6 = \text{अ}^3\text{अ}^2 \text{ अथवा } (\text{क्षय})^6 = \text{अ}^5$$

कांकीं $\text{क्ष}^6\text{य}^6$ हें क्षक्षक्षक्षक्षक्ष यययययय, ह्या सारिखेच आहेत, आणि त्यांचा गुणाकार या क्रमानें केला जाईल

$$\text{क्षय}\cdot\text{क्षय}\cdot\text{क्षय}\cdot\text{क्षय}\cdot\text{क्षय}\cdot\text{क्षय} = (\text{क्षय})^6$$

यामुळें, क्षय हें $\text{अ}^5$ याचें षड्घात मूळ आहे, परंतु क्ष हा अचें वर्गमूळ आहे, आणि य त्याचें घनमूळ आहे, ह्मणजे,

$$\text{क्षय} = \sqrt[6]{\text{अ}^5} \text{ किंवा } \sqrt{\text{अ}}\times\sqrt[3]{\text{अ}} = \sqrt[6]{\text{अ}^5}$$

आतां, मनांत आण कीं अ असा कांहीं अंक आहे कीं ज्याला निःशेष वर्गमूळ आणि घनमूळ नाहीं, असें १०. क्ष आणि य असे अपूर्णांक काढितां येतील, कीं क्ष$^{२}$ आणि य$^{३}$ हे अ चे जवळ जवळ इच्छे प्रमाणें होतील. मनांत आण, कीं क्ष$^{२}$=अ+प आणि य$^{३}$=अ+क ह्मणजे प आणि क इच्छेस येईल तितके लहान* होतील. अ पेक्षां प आणि क हे कमी आहेत असें आरंभीं कल्पितों. तर ७ व्ये लेम्मा वरून,

(अ+प)$^{३}$ ही अ$^{३}$+७ पअ$^{२}$ यापेक्षां कमी आहे

(अ+क)$^{२}$ ही अ$^{२}$+३ कअ यापेक्षां कमी आहे

परंतु (क्ष$^{२}$)$^{३}$ अथवा क्ष$^{६}$=(अ+प)$^{३}$ आणि (य$^{३}$)$^{२}$ अथवा य$^{६}$=(अ+क)$^{२}$ यामुळें

क्ष$^{६}$ हा अ$^{३}$+७ पअ$^{२}$ यापेक्षां कमी आहे

य$^{६}$ हा अ$^{२}$+३ कअ यापेक्षां कमी आहे

तर ३ लेम्मावरून क्ष$^{६}$य$^{६}$ हा (अ$^{३}$+७ पअ$^{२}$) (अ$^{२}$+३ कअ) यापेक्षां कमी आहे

अथवा (क्षय)$^{६}$ हा अ$^{५}$+अ$^{४}$ (७प+३क) +२१ पकअ$^{३}$ यापेक्षां कमी आहे

परंतु क्ष$^{२}$ अथवा अ+प हा अ पेक्षां अधिक आहे, यामुळें क्ष$^{६}$ हा अ$^{३}$ पेक्षां अधिक आहे; आणि य$^{३}$ अथवा अ+क हा अ पेक्षां अधिक आहे, यामुळें य$^{६}$ हा अ$^{२}$ पेक्षां अधिक आहे; तर क्ष$^{६}$य$^{६}$ अथवा (क्षय)$^{६}$ हा अ$^{३}$·अ$^{२}$ अथवा अ$^{५}$ यापेक्षां अधिक आहे. यावरून,

(क्षय)$^{६}$ हा अ$^{५}$ याचे आणि अ$^{५}$+अ$^{४}$ (७प+३क) +२१ पकअ$^{३}$ यांचे कोठेतरी मध्यें आहे यामुळें त्याची किंमत अ$^{५}$हून, अ$^{४}$ (७प+३क) +२१ पकअ$^{३}$ इतक्यानें भिन्न नाहीं.

वरचे पद्धतीमध्यें अ$^{४}$ आणि अ$^{३}$ हे कितीही मोठे** असतील, तरी प आणि क

* इच्छेस येईल तितके लहान होतील, ह्मणजे त्यांचा लहानपणा कांहीं विशेष किंमतीचा आहे, असा अर्थ नाहीं. परंतु अर्थ हाच कीं कसाही लहान अपूर्णांक घेतला तरी त्यापेक्षां ही कमी घेतां येईल.

** न आणि म यांतून जर न कांहीं ठिकाणें परिमाण असेल, आणि जर इच्छेस येईल इतका लहान म घेतला जाईल, तर म न हा गुणाकार इच्छेस येईल तितका लहान केला जाईल; परंतु हें मात्र मनांत ठेविलें पाहिजे, कीं गुणाकाराला इच्छिलेला लहानपणा देण्याकरितां, जितका न मोठा असेल, तितका लहान म घ्यावा.

इच्छेस येईल तितके लहान होतील, तर ७ प+३ क आणि २१ पक हेही इच्छेस येईल तितके लहान होतील, यामुळें ती वरची पद्धती इच्छेस येईल तितकी लहान केली जाईल. ह्मणजे, (क्षय)$^{६}$ हा अॅ याचे इच्छेस येईल तितका जवळ केला जाईल, अथवा क्षय हा अॅचे षड्घात मूळाचा जवळचा आहे.

बीजगणिताचे पुस्तकामध्यें वरची सिद्धता बहुत करून लिहून दाखवीत नाहीं, परंतु जास **क्रमनियम** ह्मणतात, त्यांत वरचें उत्तर खरें मानून घेतात. क्रमनियम या शब्दाचा अर्थ सांगतों, कांकीं त्यांत शिकणाराचे उपयोगी असे बहुत विषय आहेत; परंतु तो शिकणारानें सोडून दिला, तरी या प्रकरणाचें अनुसंधान सुटत नाहीं, यामुळें या विषयींचा गोष्टी बारीक अक्षरांनीं पुढें लिहितों, आणि या विषयाचें सूचक नाम पृष्ठाचे वर तसेंच मांडितों.

क्रमशः आणि आकस्मिक क्रमभेदावाचून हे दोनही शब्द सारिख्ये अर्थाचे आहेत. उदाहरण, असें मनांत आण, कीं एक चौरस आहे, ज्याचा दोन समांतर बाजू उत्तर आणि दक्षिण दिशेंत आहेत. जो कोणी पुरुष अशा चौरसाची प्रदक्षिणा करील त्यास प्रत्येक कोनावरून पुढें चालत्ये समयीं एक वर्तुळ पाद फिरावें लागतें, ह्मणजे जेव्हां तो उत्तर किंवा दक्षिण दिशेस चालतो, तेव्हां कांहीं मधल्ये दिशेंत न चालतां एकदांच पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे फिरतो, आणि पूर्व किंवा पश्चिमेकडे चालतो तेव्हां त्याचे उलटें. यापक्षीं त्याची दिशा क्रमभेदानें बदलत्ये. जरी त्या आकृतीला आठ बाजू असल्या, तरी त्याची दिशा क्रमभेदानें पालटेल. परंतु तो पालट पूर्वीपेक्षां कमी होईल; त्या आकृतीला सोळा बाजू असल्यास कोनावरचे पालट त्यापेक्षांही कमी होतील, आणि याप्रमाणें पुढेंही.



परंतु वर्तुळाचे किंवा दीर्घवर्तुळाचे भोंवती प्रदक्षिणा केली, तर दिशाभेदक्रम सुटत नाहीं. जर भूमितीचा वर्तुळाभोंवती भूमितीचा बिंदू प्रदक्षिणा करितो, तर तो बिंदू चालत असतां त्याचें गमन अमुक दिशेंत झालें नाहीं अशी दिशा कल्पवत नाहीं; आणि कोणत्येही भलत्ये दोन बिंदूंचे मध्येंच जर चालत आहे तर त्या दोन बिंदूंचा दिशेमधल्या सर्व दिशांत त्याचें गमन होईल.

भूमितीपासून वरचें उदाहरण दृष्टांतार्थ घेतलें आहे, आणि त्यांत क्रमशः भेद होतो असें कल्पिलें आहे; आणि या कल्पनेस कांहीं विरोध येत नाहीं, परंतु जेव्हां अशी कल्पना करितों, कीं बिंदूचे गतीपासून रेघा उत्पन्न होतात, तेव्हां वरची भूमितीची कल्पनाही नीट दिसत्ये. परंतु अंकगणित, आणि नंतर बीजगणित हीं दोन्हीं भूमितीला लागू केलीं असतां, हेंच विचारायाचें राहिलें, कीं भूमितीचीं सर्व परिमाणें अंकगणितरीतीनें दाखविलीं जातील कीं काय? उदाहरण, अ पासून निघून ब सरळ रेघेंत दोनहात फुटीपर्यंत चालतो अशी कल्पना कर, तर ज्या अनंत बिंदूवरून ब चालतो त्यांतील ज्या प्रत्येक बिंदूवरून अ पासून ब चालला त्या प्रत्येक बिंदूचें अंतर फुटी आणि फुटीचे अपूर्णांक यांचे सहाय्यानें दाखविलें जाईल कीं काय?

स्पष्ट आहे कीं एक आणि दोन फुटींचेमध्यें हे पुढील अपूर्णांक येतील. म्हणजे, १·१, १·२, १·३, इत्यादि फूट; १·१ आणि १·२ फुटीमध्यें हे अपूर्णांक येतील, म्हणजे, १·११, १·१२, १·१३, इत्यादि फूट; १·११ आणि १·१२ फुटीमध्यें हे अपूर्णांक येतील, म्हणजे १·१११, १·११२, १·११३, इत्यादि फूट; आणि याप्रमाणें अनंत* पावेतों होईल. परंतु अ पासून १ आणि २ फुटींमध्यें ब ची कांहीं भूमितिरूप स्थिति नेमिली असतां, ती स्थिति केवळ बरोबर दाखविण्यासाठीं १ फूट आणि एक फुटीचा अपूर्णांक अशानें ती स्थिति बरोबर दाखविली जाणार नाहीं. आतां जी भूमितिनें नेमिली जाईल, परंतु अंकगणितानें नेमिली जाणार नाहीं अशी एक स्थिति दाखवितों.

---

* विकृष्टपणें मनांत आणावें, कीं अनंत पावेतों असें म्हटलें असतां अर्थ हा, कीं दूरच्या पावेतों.




वरच्या आकृती प्रमाणें अब रेघेवरचें चौरस १ फुटीच्या चौरसाचें दुप्पट होण्यासाठीं ब ची स्थिति कोठे असावी, याचा नेम भूमितिमध्यें भूमितिरूपानें दाखविला आहे, परंतु अंकगणितानें दाखविला नाहीं. एक फूट दाखविण्यासाठीं १ घे; आतां वरसांगितल्याप्रमाणें अब रेघेला कांहीं अंकगणितरूपाचें परिमाण नेमिलें जाईल कीं नाहीं, याचा विचार करितों. फुटीच्या प्रत्येक अपूर्णांकास असें अपूर्णांक रूप दिलें जाईल, कीं त्याचे अंश आणि छेद पूर्णांक होतील, यावरून जर अब रेघेला अंकगणित परिमाण नेमिलें जाईल, तर अब $\frac{म}{न}$ फूट आहे, आणि म आणि न पूर्णांक आहेत असें मनांत आण. ह्मणजे एक किंवा अधिक फुटी न सम भागांत भागून, त्या भागांतून म भाग घेतले अशानें अब रेघ झाली असें मनांत आण. या फुटीचा एक न भागास, सोईसाठीं, भागाचा भाग ह्मण; तेव्हां एक फुटीमध्यें न भागाचे भाग आहेत, आणि अब मध्यें म भागाचे भाग आहेत. तेव्हां फुटीच्या रेघेवरच्या चौरसामध्यें भागाचे भागाचीं चौरसें न×न इतकीं आहेत, आणि अब रेघेच्या चौरसामध्यें म×म इतकीं त्याच जातीचीं चौरसें आहेत. यावरून, अब रेघेवरचें चौरस एक फूट रेघेवरच्या चौरसाचें दुप्पट आहे, तर या प्रमाणें असावें

ममम=२नन

आतां म आणि न हे पूर्णांक असावे या संकेतानें हें समीकरण शक्य नाहीं असें दाखवितों. न पूर्णांक आहे, ह्मणून नन पूर्णांक आहे, आणि २नन पूर्णांकाची दुप्पट आहे, आणि यामुळें तो सम अंक आहे; परंतु नन च्या दुपटी बराबर मम आहे, यामुळें ममही सम आहे. ह्मणून तुसला मही सम आहे, कांकीं विषम अंक त्याणें तोच गुणिला असतां विषम अंक होतो. परंतु जर म सम आहे, तर त्याचें अर्धपूर्णांक होईल; तर

तें अर्ध दाखविण्यासाठीं म' घे, तेव्हां म = २म'. मची ही किंमत वरचे समीकरणांत म-चे स्थळीं मांड, तर या प्रमाणें होईल

$२म' \times २म' = २नन$ $\qquad$ $४म'म' = २नन$ अथवा $२म'म' = नन$

न सम अंक असावा हें दाखविण्याकरितां, वरचें समीकरण $नन = २म'म'$ तशाच रीतीनें कामांत घेतां येईल. नचें अर्ध न' पूर्णांक आहे असें मनांत आण, तर $न = २न'$ आणि ही किंमत समीकरणांत नचेंस्थळीं मांडिल्यानें या प्रमाणें होतें

$२न' \times २न' = २म'म'$ $\qquad$ $४न'न' = २म'म'$ अथवा $२न'न' = म'म'$

यावरून पूर्वीं प्रमाणें म' सम अंक आहे असें सिद्ध होतें. म आणि न हे पूर्णांक असून $मम = २नन$ हें समीकरण खरें आहे असें दाखविण्याविषयीं हे पुढील अंक निरंतर पूर्णांक असले पाहिजेत

म $\quad$ (म' ह्मणजे मचें अर्ध) $\qquad$ (म'' ह्मणजे म'चें अर्ध) इत्यादि

न $\quad$ (न' ह्मणजे नचें अर्ध) $\qquad$ (न'' ह्मणजे न'चें अर्ध) इत्यादि

परंतु असें होण्यास अशक्य आहे; कांकीं भलत्ये कांहीं अंकाचें अर्ध केलें आणि त्या अर्धाचें अर्ध याप्रमाणें पुढें करीत गेले असतां शेवटीं १ हून कमी असा कांहीं अपूर्णांक येईल. यामुळें, कोणत्येही पूर्णांकाविषयीं $मम = २नन$ हें समीकरण खरें नाहीं, आणि त्यावरून अब हा $\frac{म}{न}$ या अपूर्णांकानें दाखवितां येत नाहीं.

जर वरचें समीकरण खरें असें मानिलें, तर त्या पासून या प्रमाणें होईल,
$\frac{मम}{नन} = २$ अथवा $\frac{म}{न} \times \frac{म}{न} = २$ अथवा $क्षक्ष = २$ यांत $क्ष = \frac{म}{न}$ आहे.

१८९ एतद्वाप्रमाणें $क्षक्ष = २$ हें समीकरण या अर्थानें मात्र स्वीकारितां येतें; कीं, कांहीं एक लहान अपूर्णांक घेऊन क्षची कांहीं किंमत काढितां येईल, जिचा योगानें क्षक्ष हे २पेक्षां त्या अपूर्णांकानें कमी होतील. ह्मणजे

$क्षक्ष - २ = ०$ $\qquad$ हें समीकरण स्थापण्याबद्दल

$क्षक्ष - २ =$ कांहीं गणित परिमाण ( ) याहून कमी

असें मात्र स्थापितां येईल. कुंडलीमध्यें इच्छे प्रमाणें कसाही लहान अपूर्णांक मांडितां येईल.

सर्व व्यवहार कामां करितां वर सांगीतलें इतकें पुरें; कांकीं व्यवहार कामांत जे-व्हां बीजगणित लावावें लागतें त्यांचा सूक्ष्मपणा, मापण्याचे सुयंत्राचें सहाय्य पावलेल्या दृष्टीच्या मर्यादेबाहेर, असण्याचें प्रयोजन नाहीं. जी अतिसूक्ष्मरेघ दृष्टीनें पहाण्यास शक्य होत्ये, ती जर एक इंचाचा दशसहस्रांश असेल, तर ती पुढील समीकरण उलगडण्या-साठीं खचित सत्यतेचा जवळजवळ पुरतेपणीं होईल, ह्मणजे

जर क्षक्ष−२=० हें समीकरण निश्चित खरें होण्यासाठीं

क्षक्ष−२= अंकगणितानें एक इंचाचा दशसहस्रांशांपेक्षां कमी इतका पुरे.

क्षक्ष−२=० असें समीकरण जवळजवळ जें उत्तर स्थापितें, तें उत्तर कदा-चित फार लहान किंवा मोठें असेल; ह्मणजे, क्षक्ष हा २ पेक्षां किंचित कमी असेल किंवा किंचि-त अधिक असेल. १८१, १८२ वें पृष्ठ पहा, त्यांत क्षक्षक्ष−१०=० या समीकरणा चा उ-लगडण्याचा दोन्ही तऱ्हा दाखविल्या आहेत. यावरून, जरी क्ष अथवा ∛१० यांस खरी स्थि-ती नाहीं, तथापि, इच्छेप्रमाणें परस्पर जवळजवळ होत असे दोन अपूर्णांक काढले जातील, ते अ आणि ब हे दोन अपूर्णांक आहेत असें मनांत आण, त्यांतून पहिला अ कमी आहे, अथवा अअअ हा १० पेक्षां कमी, आणि दुसरा ब अधिक आहे, अथवा बबब १० पेक्षां अधिक; आणि अशा कृतीनें शुद्ध बरोबरी जवळ जाण्यास किंचित अंतर रहा-तें, तर पुढील प्रमाणें बोलण्याची रीति कामांत घेण्याचा शिरस्ता आहे: ह्मणजे १० यां-स घनमूळ आहे, परंतु तें घनमूळ असंममान* परिमाण आहे, ह्मणजे समीपतेवांचू-न कांहीं पूर्ण किंवा अपूर्णांकानें बरोबर दाखविलें जात नाहीं; ह्मणजे, ∛१० याचे हवा तेवढा जवळ असा अपूर्णांक काढितां येईल.

तथापि हें पुढील विचारायाचें राहिलें: जरी, क्षक्ष−२=० हें समीकरण इच्छे-प्रमाणें जवळजवळ उलगडलें जातें तरी त्या जवळजवळ आलेल्ये उत्तरावर अधिक कांहीं कृती लावायाची गरज पडले, अशा कांहीं कृती असतील की नाहीं, आणि त्या परि-माणास त्या कृती लाविल्या, त्यांत कितीही लहान चूक असली ती चूक, आरंभीं कशीही

---

* ह्मणजे १ याची कांहीं समभाग नाहीं; ह्मणजे १ याचे कोणत्येही भागाचे भागांचे मिळवणीनें तो दाखविला जात नाहीं.

लहान असली तरी तीपासून अशी चूक होत्ये कीं ती कांहीं मर्यादेबाहेर कमी केली जाणार नाहीं असा गुण त्या कृतींत असेल कीं नाहीं ? उदाहरण, जेव्हां शिकणारास अंकांचें लागरतंम ह्मणजे काय हें समजूं लागल्यावर, असें एकादें कृत्य येईल कीं ज्याचें उत्तर क्षचें लाग्रतंम असेल, आणि त्या क्षची किंमत क्षक्ष − २ = ० या समीकरणांतून काढायाची असेल. तर या पुढील दोन प्रतिज्ञेंतून शिकणारानें कोणती घ्यावी? त्यांतून एक तरी खरी असावी.

१. क्षची किंमत काढतानां जी कांहीं चूक केली असेल ती चूक क्षचे लाग्रतंम घेतानां इतकी कमी केली जाईल, कीं लाग्रतंमांतील चूक कोणत्याही सांगीतल्या अपूर्णांकापेक्षां कमी होईल.

२. अंक काढण्यांत कितीही लहान चूक केली असली, तर लाग्रतंमांतली चूक कोणत्येही दिलेल्ये अपूर्णांकापेक्षां अधिक असावी, सांगीतलेला अपूर्णांक ·००१ हाच आहे असें मनांत आण.

या पुढील सूचनेवाचून वरचा दोन गोष्टीविषयीं कांही उत्तर देववत नाहीं:

जेव्हां एकादी नवी कृती, किंवा नवी पद्धती कामांत आणितात, तेव्हां ज्या कृत्यांत ती कृती येत्ये, त्या कृत्याचें उलगडणें जरी केवळ बरोबर होत नाहीं, तरी बरोबरीचे जवळजवळ येईल असें मानून घेऊं नये, परंतु प्रत्यक्ष सिद्ध करून दाखविलें पाहिजे.

पूर्वीं ज्या कृती सांगीतल्या आहेत, त्यांविषयीं ही वरची गोष्ट शिकणारानें सिद्ध करण्याकडे लक्ष द्यावें. एक उदाहरण विस्तारपूर्वक करून दाखवितों.

$\frac{अ+ब}{क+ड}$ हें कांहीं कृत्याचें उत्तर आहे असें मनांत आण. ब आणि ड यांची किंमत काढितेसमयीं, कांहीं चूक केली आणि ती चूक इच्छेप्रमाणें हवी तितकी लहान आहे असें मनांत आण. अथवा वरचे बोलण्याचे रीतीप्रमाणें बब − २ = ०, आणि डडड − ३ = ० याचें उत्तर इच्छेप्रमाणें केवळ जवळ येतें अशा दोन समीकरणांत ब आणि ड आहेत असें घे. बचा जवळजवळचा किंमती दाखविण्यासाठीं ब' आणि ब'' घे, त्यांतून ब' कमी, आणि ब'' अधिक; डचा जवळजवळचा किंमती दाखवायासाठीं

$इ'$ आणि $इ''$ घे, तर वरचे पद्धतीमध्यें या जवळच्या किंमती मांडिल्याने या प्रमाणें होईल,

$$\frac{अ+ब'}{क+इ'} \text{ आणि } \frac{अ+ब''}{क+इ''}$$

या दोन पद्धतींस ताडून पहायासाठीं, पहिलींतून दुसरी वजा कर, ह्मणजे याप्रमाणें होईल

$$\frac{अ+ब'}{क+इ'}-\frac{अ+ब''}{क+इ''}=\frac{(अक+अइ''+कब'+ब'इ'')-(अक+अइ'+कब''+इ'ब'')}{कक+कइ'+कइ''+इ'इ''}$$

$$=\frac{अ(इ''-इ')-क(ब''-ब')+(ब'इ''-इ'ब'')}{कक+(इ'+इ'')क+इ'इ''}$$

आणि १८१,१८२ पृष्ठांप्रमाणें $इ'$ याचे जवळजवळ $इ''$ आणि $ब'$ याचे जवळजवळ $ब''$ इच्छेप्रमाणें केले जातील, यामुळें $इ''-इ'$ आणि $ब''-ब'$ इच्छेप्रमाणें फार लहान करितां येतील; यावरून $अ(इ''-इ')$ आणि $क(ब''-ब')$ १८४ पृष्ठावरचे टीपेवरून हवे तितके लहान करितां येतील. आणि त्याचसारिखें $ब'इ''-इ'ब''$ हेही. कांकी ती आणि खालीं लिहिलेली पद्धती सारिखीच आहे असें दिसेल

$$ब'(इ''-इ')-इ'(ब''-ब').$$

यावरून वरचे अपूर्णांकाचीं वेगळालीं पदें इच्छेप्रमाणें लहान करितां येतात त्यावरून त्या अपूर्णांकाचा अंश इच्छेप्रमाणें लहान केला जाईल. परंतु $इ'$ यापेक्षां $इ''$ नेहेमी अधिक आहे, ह्मणून १७८ पृष्ठावरचे ५ व्ये लेम्मा प्रमाणें त्या अपूर्णांकाचा छेद या पुढील पेक्षां नेहेमी मोठा होईल

$$कक+(इ'+इ')क+इ'इ'.$$

या उदाहरणावरून दिसलें, कीं एक अपूर्णांक आहे ज्याचा अंश इच्छेप्रमाणें लहान लहान केला जाईल, परंतु त्याचा छेद तसा लहान केला जात नाहीं; यामुळें तो अपूर्णांक हवा तितका लहान केला जाईल. ह्मणजे, $\frac{अ+ब}{क+इ}$ याच्या निरनिराळ्या किंमती $\frac{अ+ब'}{क+इ'}$ आणि $\frac{अ+ब''}{क+इ''}$ हे अपूर्णांक आहेत जे इच्छेप्रमाणें जवळजवळ आणितां येतील, अथवा ज्यांचें अंतर इच्छेप्रमाणें लहान करितां येईल. पूर्वींसारिखें किंमती-

र्णअर्थाचे भाषणानें, $\frac{अ+ब}{क+इ}$ या अपूर्णांकास वास्तवीक किंमत आहे, ब आणि इयांचा जवळजवळ किंमती मांडिल्या असतां, त्या वास्तवीक किंमतीचे जवळजवळ होत जातात.

बीजगणितरूप पद्धती मध्यें जो क्रमनियम आहे असें मानिलें, तो या पुढील सिद्धांतांत आहे, आणि तो नियम विशेष पक्षांनीं शिकणारानें सिद्ध करावा:

| सामान्य सिद्धांत | विशेषपक्ष |
|---|---|
| प एक बीजरूप पद्धती आहे, जीमध्यें क्ष येतो, त्या पद्धतींत क्ष-चेजागीं अ मांडिला असतां त्या पद्धतीची किंमत प बरोबर होईल. | प = क्ष+क्ष$^2$<br>प = अ+अ$^2$ |
| क्ष-चेजागीं अ+म मांडला असतां प पद्धती क्र चे बरोबर होईल असें मनांत आण. | क्र = (अ+म) + (अ+म)$^2$<br>= अ+अ$^2$ + (१+२अ) म+म$^2$<br>= प + (१+२अ) म+म$^2$ |
| तेव्हां जर इच्छे प्रमाणें अ आणि अ+म हे हवे तितके जवळजवळ केले जातील; म्हणजे, हवा तितका म लहान केला जाईल; तेव्हां प आणि क्र यांचें अंतर जितकें पाहिजे तितकें लहान केलें जाईल. | या वरचे समीकरणापासून<br>क्र − प = (१ + २अ) म+म$^2$<br>जर हवा तितका म लहान केला तर यांतील प्रत्येक पद हवें तितकें लहान केलें जाईल. |

या पूर्वीं जा पद्धती काढिल्या आहेत, त्यांविषयीं एक गोष्टीवर मात्र संशय येतो, म्हणजे, √क्ष, ३√क्ष, इत्यादि, जसा जसा पक्ष असेल, तसा तसा तो संशय यांचे खऱ्या किंवा जवळजवळच्या किंमतीविषयीं असतो. जर इच्छे प्रमाणें हवा तितका म लहान केला जातो, तर ३√अ आणि ३√अ+म यांचा जवळजवळचा किंमती इच्छे प्रमाणें हव्या तितक्या जवळजवळ केल्या जातील कीं काय? या प्रश्नास उत्तर देण्यासाठीं, एक सिद्धांत अगोदर सांगीतला पाहिजे, जो सिद्धांत दुसऱ्ये पुष्कळजागीं उपयोगी पडेल.

तो सिद्धांत या पुढील प्रमाणें आहे

$$क्ष^{२}-य^{२} = (क्ष-य)\,(क्ष+य)$$

$$क्ष^{३}-य^{३} = (क्ष-य)\,(क्ष^{२}+क्षय+य^{२})$$

$$क्ष^{४}-य^{४} = (क्ष-य)\,(क्ष^{३}+क्ष^{२}य+क्षय^{२}+य^{३})$$

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

$$क्ष^{न}-य^{न} = (क्ष-य)\,(क्ष^{न-१}+क्ष^{न-२}य+\cdots+क्षय^{न-२}+य^{न-१})$$

वरचीं समीकरणें गुणाकारापासून समजतील; उदाहरण,

$$\begin{array}{l} क्ष^{३}+क्ष^{२}य+क्षय^{२}+य^{३} \\ क्ष-य \\ \hline क्ष^{४}+क्ष^{३}य+क्ष^{२}य^{२}+क्षय^{३} \\ \quad -क्ष^{३}य-क्ष^{२}य^{२}-क्षय^{३}-य^{४} \\ \hline क्ष^{४}+० \quad +० \quad +० \quad -य^{४} \end{array}$$

वरचा गुणाकार, प्रवेशकांतील गुणाकाराचे दुसरे रीती प्रमाणें केला आहे, असें पहाण्यांत येईल, आणि पुढें ही या रीतिप्रमाणें गुणाकार नेहेमी केले जातील.

$क्ष+य$, $\quad क्ष^{२}+क्षय+य^{२}$, $\quad क्ष^{३}+क्ष^{२}य+क्षय^{२}+य^{३}$, इत्यादि.

ह्या पद्धतींचा क्रम शोधिला असतां पहाण्यांत येईल, कीं प्रत्येक पद्धती तिचे पूर्वींचे पद्धतीस यने गुणून, त्या गुणाकाराला क्षचा एक घात अधिक मिळवून झाली आहे. जसें,

$$क्ष^{२}+क्षय+य^{२} = क्ष^{२}+य\,(क्ष+य)$$

$$क्ष^{३}+क्ष^{२}य+क्षय^{२}+य^{३} = क्ष^{३}+य\,(क्ष^{२}+क्षय+य^{२}) \qquad इत्यादि.$$

वरच्या तीन पद्धतींच्या जागीं $प_{१}$, $प_{२}$, $प_{३}$, इत्यादि अशीं चिन्हें घेतलीं*,

---

* या मोठ्ये प च्या पायांखालीं जे अंक आहेत त्यांशीं आणि मूळ प्रकाशक चिन्हांशीं घालमेल होऊं देऊं नये. १०६ पृष्ठावरच्या घाताच्या चिन्हाप्रमाणें हे कामांत घेतले आहेत, आणि त्यांस प एक, प दोन, प तीन, इत्यादि याप्रमाणें वाचितात.

नर याप्रमाणें होईल $प_2 = क्ष^2 + य\, प_1,\ प_3 = क्ष^3 + य\, प_2,\ प_4 = क्ष^4 + य\, प_3$, इत्यादि

अथवा सामान्यतः $प_न = क्ष^न + य\, प_{न-1}$

हेंही पहाण्यांत येईल, कीं क्षनें गुणून आणि यचा एक घात मिळवून त्याच प-दनी निघतील. जसें:

$$क्ष^2 + क्षय + य^2 = य^2 + क्ष(क्ष + य)$$

$$क्ष^3 + क्ष^2य + क्षय^2 + य^3 = य^3 + क्ष(क्ष^2 + क्षय + य^2) \text{ इत्यादि.}$$

अथवा $प_2 = य^2 + क्ष\, प_1,\quad प_3 = य^3 + क्ष\, प_2,\quad प_4 = य^4 + क्ष\, प_3$, इत्यादि

अथवा सामान्यतः, $प_न = य^न + क्ष\, प_{न-1}$

हा सिद्धांत याप्रमाणें मांडितां येतो:

$$क्ष^न - य^न = (क्ष - य)\, प_{न-1}$$

आणि याप्रमाणें सिद्ध केला जातो:

| सामान्य सिद्धांत | विशेष पक्ष |
|---|---|
| $प_न = क्ष^न + य\, प_{न-1}$ | $प_4 = क्ष^4 + य\, प_3$ |
| $प_न = य^न + क्ष\, प_{न-1}$ | $प_4 = य^4 + क्ष\, प_3$ |
| $(-)\ 0 = क्ष^न - य^न - (क्ष - य)\, प_{न-1}$ | $(-)\ 0 = क्ष^4 - य^4 - (क्ष - य)\, प_3$ |
| $क्ष^न - य^न = (क्ष - य)\, प_{न-1}$ | $क्ष^4 - य^4 = (क्ष - य)\, प_3$ |

आतां $\sqrt[3]{१०}$ आणि $\sqrt[3]{१० + म}$ यांस शोधितों, जांत म इच्छेप्रमाणें लहान करितां येतो. यांचा जवळ जवळ किंमती दाखविण्यासाठीं य आणि क्ष घे, अशानें १८१ आणि १८२ व्ये पृष्ठांवरून

$$\left.\begin{aligned} क्ष^3 &= (१० + म) + वि \\ य^3 &= १० + व \end{aligned}\right\} \text{ यांत वि आणि व इच्छेप्रमाणें लहान केले जातील.}$$

$$(-)\quad क्ष^3 - य^3 = म + वि - व$$

अथवा $(क्ष - य)(क्ष^2 + क्षय + य^2) = म + वि - व$

$$क्ष - य = \frac{म + वि - व}{क्ष^2 + क्षय + य^2}$$

आतां क्ष आणि य हे दोन्हीं २ पेक्षां मोठे आहेत, कांकीं $२^३ = ८$ ह्मणून १० पेक्षां लहान आहेत: यामुळें वरचे अपूर्ण पद्धतीचा छेद १२ पेक्षां अगत्य मोठा होईल, आणि तिचे अंश इच्छे प्रमाणें लहान लहान केले जातील. यावरून वरची अपूर्ण पद्धतीजी $= क्ष - य$, ती इच्छे प्रमाणें हवी तितकी लहान करितां येत्ये, यामुळें इच्छे प्रमाणें क्ष आणि य हवे तितके जवळ जवळ केले जातील. परंतु क्ष आणि य हे $\sqrt[३]{१०+म}$ आणि $\sqrt[३]{१०}$ यांचा जवळ जवळचा किंमती आहेत.

शिकणारानें हा पुढील सिद्धांत उलगडून सिद्ध करावा:

$$क्ष^२ - य^२ = (क्ष+य)(क्ष-य)$$

$$क्ष^४ - य^४ = (क्ष+य)(क्ष^३ - क्ष^२य + क्षय^२ - य^३)$$

$$क्ष^६ - य^६ = (क्ष+य)(क्ष^५ - क्ष^४य + क्ष^३य^२ - क्ष^२य^३ + क्षय^४ - य^५)$$

इत्यादि इत्यादि

$$क्ष^३ + य^३ = (क्ष+य)(क्ष^२ - क्षय + य^२)$$

$$क्ष^५ + य^५ = (क्ष+य)(क्ष^४ - क्ष^३य + क्ष^२य^२ - क्षय^३ + य^४)$$

इत्यादि इत्यादि

आतां घात आणि मूळ प्रकाशक चिन्हांची सामान्य सिद्धता दाखवितों.

**क्षचे घाताचा कोणताही घात करायाचा असेल, तर दोन्ही घातांचीं घातप्रकाशक चिन्हें परस्पर गुणून तो गुणाकार घाताचें प्रकाशक चिन्ह होईल;**

उदाहरण,

$$(क्ष^३)^४ = क्ष^{३×४} = क्ष^{१२}, \text{ कांकीं } (क्ष^३)^४ = क्ष^३.क्ष^३.क्ष^३.क्ष^३ = क्ष^{३+३+३+३}$$

यासारिखें,

$$(क्ष^२)^{१२} = क्ष^{२४} \quad (क्ष^३)^६ = क्ष^{१८} \quad (क्ष^अ)^ब = क्ष^{अब}$$

$$(क्ष^{अ+ब})^{अ-ब} = क्ष^{अ^२-ब^२} \quad (क्ष^{अ-ब})^{अ+ब} = क्ष^{अ^२-ब^२}$$

$$(क्ष^म)^न = (क्ष^न)^म = क्ष^{मन}$$

**गुणाकाराचा घात हा गुण्य आणि गुणकाचे घातांचे गुणाकाराबरोबर आहे.**

जसें, $(अबक)^३ = अबक.अबक.अबक = अअअबबबककक = अ^३ब^३क^३$

$$(अ^३ब^३क^३)^४ = (अ^३)^४ (ब^३)^४ (क^३)^४ = अ^{१२}ब^{१२}क^{१२}$$

$$(अ^मब^नक^प)^र = (अ^म)^र (ब^न)^र (क^प)^र = अ^{मर} ब^{नर} क^{पर}$$

हीच रीति भागाकारास लाविली जात्ये. जसें, $\left(\frac{अ}{ब}\right)^३ = \frac{अ^३}{ब^३}$; कांकीं पहिलें पद याजबरोबर आहे $\frac{अ}{ब} \times \frac{अ}{ब} \times \frac{अ}{ब}$, अथवा १७७ पृष्ठावरचे २ लेम्मा प्रमाणें $= \frac{अअअ}{बबब}$.

**मूळाचें मूळ तेंच आहे ज्याचें प्रकाशक चिन्ह दोन पहिल्ये सांगीतल्ये मूळांचे प्रकाशक चिन्हाचे गुणाकाराबरोबर आहे.** जसें घनमूळ अथवा त्रिघात मूळाचें चतुर्घात मूळ, बारा घातमूळ आहे. हें सिद्ध करायासाठीं, क्ष याचे त्रिघात मूळाचें चतुर्घात मूळ दाखवायासाठीं य घे, तेव्हां

$$\sqrt[४]{\sqrt[३]{क्ष}} = य \therefore \sqrt[३]{क्ष} = य^४ \qquad क्ष = (य^४)^३ = य^{१२}$$

$$\text{अथवा } य = \sqrt[१२]{क्ष}, \text{ परंतु } य = \sqrt[४]{\sqrt[३]{क्ष}}$$

**१७५ व्ये पृष्ठावरचे** ६ व्ये सिद्धांतांत असें दाखविलें गेलें कीं क्ष ला अंकगणित रूपानें केवळ एक घनमूळ, किंवा १२ घातमूळ होऊं शकतें; आणि घनमूळाला अंकगणित रूपानें केवळ एक चतुर्घात मूळ होऊं शकतें. यावरून वरची कृती सिद्ध झाली; म्हणजे क्षचे **एक** घनमूळाचें **एक** चतुर्घात मूळ हें क्षचें **एक** १२ घातमूळ आहे; आणि प्रत्येक तऱ्हेचे मूळाचें अंकगणितरूपानें केवळ एक मूळ आहे, असें वरचे गोष्टीवरून दाखविलें जातें. परंतु जीं बीजरूप चिन्हें क्ष चीं मूळें आहेत, त्यांस अंकगणित रूपाचा अर्थ असेल किंवा नसेल, अशा या सर्व चिन्हांविषयीं मनन करित्ये समयीं, शिकणारानें स्मरण ठेवावें, कीं वरचे कृतीपासून हें सिद्ध होत नाहीं कीं क्ष चे **हरएक** तृतीय घात मूळाचे **हरएक** चतुर्घात मूळ क्ष चें १२ घातमूळ आहे. अशी

गोष्ट घडेल, परंतु अद्यापि सिद्ध झाली नाहीं.

त्याच रीतीनें सिद्ध केलें जातें, कीं

$$\sqrt{\sqrt{क्ष}} = \sqrt[४]{क्ष};\ \sqrt{\sqrt[३]{क्ष}} = \sqrt[६]{क्ष} = \sqrt[३]{\sqrt{क्ष}}$$

$$\sqrt[अ]{\sqrt[ब]{क्ष}} = \sqrt[अब]{क्ष} = \sqrt[ब]{\sqrt[अ]{क्ष}};\ \sqrt[५]{\sqrt[५]{क्ष}} = \sqrt[२५]{क्ष}$$

**गुणाकाराचें मूळ गुण्य गुणकाचे मूळांचा गुणाकार केल्यानें निघतें.** जसें.

$$\sqrt[४]{अबक} = \sqrt[४]{अ} \times \sqrt[४]{ब} \times \sqrt[४]{क} \cdots\cdots\cdots (\text{ऊ})$$

वरचे दोन पद्धतींचा चतुर्घात एकच आहे, ह्मणजे, अबक. कांकीं **१७१ व्या पृष्ठावरचे** व्याख्याना प्रमाणें

$$\left(\sqrt[४]{अबक}\right)^४ = अबक$$

आणि **१९६ पृष्ठावरून,**

$$\left(\sqrt[४]{अ} \times \sqrt[४]{ब} \times \sqrt[४]{क}\right)^४ = \left(\sqrt[४]{अ}\right)^४ \times \left(\sqrt[४]{ब}\right)^४ \times \left(\sqrt[४]{क}\right)^४ = अ \times ब \times क$$

ह्मणजे, (**ऊ**) समीकरणाची प्रत्येक बाजू अबक चें चतुर्घात मूळ आहे. परंतु अबक यास अंकगणित रूपाचें केवळ एक चतुर्घात मूळ आहे; यामुळें (**ऊ**) समीकरणाची प्रत्येक बाजू तें मूळ आहे; आणि त्यामुळें त्या दोन बाजू बरोबर आहेत. तशीच रीतीनें सिद्ध केलें जातें, कीं

$$\sqrt{अबक} = \sqrt{अ} \times \sqrt{ब} \times \sqrt{क} \qquad \sqrt{अब^२} = \sqrt{अ} \times \sqrt{ब^२} = ब\sqrt{अ}$$

$$\sqrt[३]{अ^३ब^३क^३} = \sqrt[३]{अ^३} \times \sqrt[३]{ब^३} \times \sqrt[३]{क^३} \qquad \sqrt[४]{३२} = \sqrt{१६} \times \sqrt[४]{२} = २\sqrt[४]{२}$$

ह्याच रीति भागाकारास लाविली जाईल, जसें. $\sqrt[३]{\frac{अ}{ब}} = \frac{\sqrt[३]{अ}}{\sqrt[३]{ब}}$; कांकीं या दोहोंचा घन एकच आहे असें काढिलां येईल, ह्मणजे, $\frac{अ}{ब}$.

**जर क्षचा भलता घात वाढविला, आणि त्या घाताचें मूळ काढिलें, तर कृतीचा क्रम बदल केल्यानें उत्तरामध्यें कांहीं फेर पडत नाहीं.**

ह्मणजे, $\sqrt[३]{क्ष^४}$ आणि $\left\{\sqrt[३]{क्ष}\right\}^४$ हीं दोन्ही बरोबर आहेत

हें सिद्ध करायासाठीं, १९६ वें पृष्ठ पहा,

$$\sqrt[२]{क्ष^४} = \sqrt[२]{क्षक्षक्षक्ष} = \sqrt[२]{क्ष} \times \sqrt[२]{क्ष} \times \sqrt[२]{क्ष} \times \sqrt[२]{क्ष} = \{\sqrt[२]{क्ष}\}^४$$

त्याच सारिखें. $\sqrt[अ]{क्ष^ब} = (\sqrt[अ]{क्ष})^ब$ ; $\sqrt{क्ष^३} = (\sqrt{क्ष})^३$.

$\sqrt[अ]{क्ष^ब}$ या पद्धतींतळें, जर अ आणि ब हे दोन्ही एकच अंकानें गुणिले किंवा भागिले, तर त्या पद्धतीचे किंमतींत फेर पडत नाहीं. ह्मणजे,

$$\sqrt[मअ]{क्ष^{मब}} = \sqrt[अ]{क्ष^ब}$$

कारण, पूर्वीं दाखविलें गेलें, कीं

$\sqrt[मअ]{क्ष^{मब}} = \sqrt[अ]{\sqrt[म]{क्ष^{मब}}}$ हीं याप्रमाणें आहेत $\sqrt[अ]{\sqrt[म]{(क्ष^ब)^म}} = \sqrt[अ]{क्ष^ब}$

$$\text{कांकीं} \quad \sqrt[म]{(क्ष^ब)^म} = क्ष^ब$$

त्याच सारिखें, $\sqrt[६]{अ^४} = \sqrt[३]{अ^२} = \sqrt[९]{अ^६} = \sqrt[१२]{अ^८}$

**घाताचें मूळ काढायाचें असेल, तेव्हां जर घात प्रकाशक आणि मूळप्रकाशक यांचा भागाकार निःशेष होत असल्यास, घात प्रकाशकास मूळ प्रकाशकानें भाग.**

जसें. $\sqrt[४]{क्ष^{१२}} = क्ष^{\frac{१२}{४}} = क्ष^३$. कांकीं $क्ष^{१२} = (क्ष^३)^४$; यामुळें $\sqrt[४]{क्ष^{१२}} = क्ष^३$.

त्याच सारिखें, $\sqrt[८]{क्ष^{१६}} = क्ष^२$, $\sqrt{क्ष^{२०}} = क्ष^{१०}$ ; आणि याप्रमाणें पुढेंही.

जेव्हां घाताचें प्रकाशक चिन्ह मूळाचे प्रकाशकानें निःशेष भागिलें जात नाहीं. जसें. $\sqrt[३]{क्ष^७}$, या पक्षींही, अद्यापि बीजगणिताचे तऱ्हेनें करण्याची रीति कांहीं सांपडलीनाहीं. जिणेंकरून $\sqrt[३]{क्ष^७}$ यास याचें $\sqrt[३]{\ }$ चिन्ह नाहींसें होई* असें रूप देववत नाहीं. यामुळें, क्ष हा कोणत्ये पूर्ण किंवा अपूर्णांकाचे स्थळीं

---

* याप्रमाणें कृती करावी. $क्ष^७ = क्ष^६ . क्ष$, तर $\sqrt[३]{क्ष^७} = \sqrt[३]{क्ष^६ \times क्ष} = \sqrt[३]{क्ष^६} \times \sqrt[३]{क्ष} = क्ष^२ \sqrt[३]{क्ष}$; यांत तरी $\sqrt[३]{\ }$ हें चिन्ह राहिलें.

आहे हें काढावें, आणि नंतर+ त्या किंमतीनें $\sqrt[3]{\text{क्ष}^{७}}$ अथवा $\text{क्ष}^{२}\sqrt[3]{\text{क्ष}}$ याची किंमत अंकगणित रीतीनें काढायाची मात्र राहिली.

$\sqrt[3]{\text{क्ष}^{७}}$ यास दर्शविण्याचे रीतीविषयींचा मात्र प्रश्न राहिला, आणि तो प्रश्न **१७१ आणि १७२ व्ये पृष्ठावर** हा प्रश्न मनांत आला, आणि तेथे कळलें, कीं $\sqrt{\text{क्ष}}$, $\sqrt[3]{\text{क्ष}}$, इत्यादिकांचेजागीं $\text{क्ष}^{\frac{१}{२}}$, $\text{क्ष}^{\frac{१}{३}}$, इत्यादि अशेरूपानें मांडणें एक पक्षीं मोठ्ये सोयीस पडलें असतें. परंतु त्या ठिकाणीं इतकेंच सांगून पुढें कांहीं लिहिलें नाहीं. कांकीं, **व्यवहारी अपूर्णांकांस जा रीती लाविल्या जातात, त्याहून निराळ्या रीती अपूर्ण घातप्रकाशकांस लावण्याचे अगत्यावांचून, अथवा पूर्णांक प्रकाशक चिन्हास जा रीती लागतात त्याहून निराळ्या रीति अपूर्ण घातप्रकाशकांस लावण्याचे अगत्यावांचून**, या प्रकाशक चिन्हें लिहिण्याचे तऱ्हेपासून

+ बीजगणित आणि अंकगणित यांचे कृती मध्यें कांहीं फेर आहे असें समजलें पाहिजे. बीजगणितामध्यें उत्तरें काढितात असें वास्तवीक ह्मणवत नाहीं, परंतु उत्तरांस केवळ असें रूप देववतें कीं जा रूपापासून त्यांची किंमत अंकगणित रीतीनें सहज काढितां येईल. उदाहरण, अ आणि ब यांची बेरीज काय आहे? खरें ह्मटलें असतां अ+ब हें या प्रश्नाचें उत्तर नाहीं, परंतु त्याचें दर्शक मात्र आहे, ह्मणून अ आणि ब हे कोणत्ये अंकस्थळीं आहेत, हें कळे पावेतों प्रश्नाचें योग्य उत्तर काढण्यास थांबलें पाहिजे. परंतु, ८अ+५अ यांची बेरीज काय आहे? असा प्रश्न केल्यावर पूर्वीपेक्षां एक पायरी पुढें जाऊं शकतों; कांकीं, ८अ+५अ ही पद्धती जरी बीजगणित रूपदर्शक आहे, तथापि या विद्येचे भाषणानें जें अति सरळ रूप होऊं शकतें तें रूप नाहीं. परंतु तें अति सरळ रूप १३अ हें आहे; तथापि अ कोणत्या अंकस्थळीं आहे हें कळे पावतों उत्तर सांपडत नाहीं. उलगडण्याचे अशा क्रमास पोंचल्यावर पुढें उत्तराचे जवळ जाण्यासाठीं बीज सोडून अंकगणित घ्यावें लागतें, तेव्हां असें ह्मणतात कीं बीजगणिताचे शेवटील रूपास पोंचला. जसें अ+ब हें शेवटील रूप आहे; परंतु ८अ+५अ हें तसें नाहीं. पुनः $\sqrt[3]{\text{क्ष}^{७}}$, अथवा $\text{क्ष}^{२}\sqrt[3]{\text{क्ष}}$, हें शेवटील रूप आहे; $\sqrt[3]{\text{क्ष}^{१२}}$ हें तसे नाहीं.

यामुळें असें दिसतें, कीं चढती श्रेणी ऋण परिमाणाची बीजगणितानुरूप दर्शक होईल : परंतु

$$\frac{१}{(१-क्ष)^{२}} = १+२क्ष+३क्ष^{२}+४क्ष^{३}+ \text{इत्यादि}$$

यांत १ पेक्षां क्ष मोठा असेल, तेव्हां ही श्रेणी चढती आहे, आणि सर्वपक्षांत त्यापासून त्याचें उत्तर धन येईल. यापासून असें दिसतें, कीं जर अनंत **श्रेणीविषयीं विचार आहे, आणि सांगीतली बरोबरी शुद्ध बीजगणितरूपाची आहे, तेव्हां कोयात्येही अंकगणितरूपाचे ताडण्याचे रीतीनें परिमाणाचें ताडणें होणार नाहीं.** म्हणजे, जर अ पेक्षां अ मोठा असेल, ब पेक्षां ब मोठा असेल, इत्यादि तर असें म्हणवतें, कीं अ+ब+ इत्यादि यापेक्षां अ+ब+ इत्यादि मोठे आहेत : परंतु पहिल्यानें दोहोंचीं पदें जोपर्यंत नियमित आहेत; आणि दुसऱ्यानें अ, ब, इत्यादि यांचा संबंध असा असावा कीं अ+ब+ इत्यादि सांगीतल्ये नियततेचे वर जाणार नाहीं, तर वरची गोष्ट घडेल परंतु जेव्हां अ+ब+ इत्यादि अनियत वाढतात तेव्हां वरचे सारिखा सारांश काढवत नाहीं; आणि याकारणास्तव १+२+४+८ इत्यादि याची बीजगणितानुरूप पद्धती $१+\frac{१}{२}+\frac{१}{४}+$ इत्यादि या पद्धतीपेक्षां अधिक आहे असेंही म्हणवत नाहीं.

ही वरची रीति कधीं सोडिली जात नाहीं कां कीं परिमाणावर जो तर्क चालवावा तो तर्क लागू न होई असें झाल्याचे पूर्वीं जें परिमाण घेतलेलें असतें तें अंकगणिताचे विषयाचे बाहेर जातें. **तर लक्ष्यांत ठेवावें कीं चढत्ये श्रेणीविषयीं, जीं उत्तरें बरोबरीचा अशा नियत बीजानुरूप पद्धतीचे ताडण्यापासून निघतात तीं घेतात, त्यांशिवाय दुसरीं कोणतींही ताडण्यापासून निघालेलीं उत्तरें मान्य केलीं जात नाहीं.**

# दहावा अध्याय.

## फङ्क्शन गणिताविषयीं.

क्षचें **फङ्क्शन** ह्मणजे काय तें पूर्वीच सातवे अध्यायाचे **१ प्रष्टांत** सांगीतलें: एकाद्या अव्यक्त फङ्क्शनास नियमित चिन्ह देण्याचें असतें, अथवा फङ्क्शनास संक्षेप रूपानें मांडण्याचें असतें, ह्मणून या अध्यायांत फङ्क्शनास मांडण्याची रीति दाखविली आहे.

$\text{क्ष}^{२}$+अक्ष इत्यादि पद्धतींत जा रीतीनें क्ष येतो, त्या रीतीविषयीं आणि क्षचे किंमतीविषयीं मात्र विचार करणें असतो, परंतु जा रीतीनें अ अथवा त्याची किंमत त्या पद्धतींत येत्ये, याअविषयीं विचार करायाचा नसतो, तेव्हां त्या पद्धतीस क्षचें फङ्क्शन असें ह्मणतों, आणि जसा गुणक मांडितात त्या प्रमाणें क्षचा मागें कांहीं अक्षर मांडून तें फङ्क्शन दाखवितों. परंतु हें फङ्क्शन चिन्ह आणि दुसरें कोणतेंही गुणक चिन्ह या दोहोंचा गोंधळ चुकविण्याकरितां, फङ्क्शन चिन्हें दाखविण्यास कांहीं अक्षरें निराळीं घेतलेलीं असतात, आणि तीं गुणक दाखवायास घेत नाहीं. यो ग्रंथांत **फ**, **प्म**, $\phi$, $\psi$ अशीं चिन्हें घेतलीं आहेत. ह्मणजे वेगळाले पक्ष दाखविण्याविषयीं **फ** क्ष, **प्म** क्ष, $\phi$ क्ष, $\psi$ क्ष, हीं चिन्हें केवळ क्षचें फङ्क्शन आहेत असें जाणावें, तें फङ्क्शन दिलेलें असो अथवा नसो. **फ** $\phi$ क्ष याचा अर्थ हाच, कीं जसा **फ** क्ष हा क्षचें फङ्क्शन आहे, तसा **फ** $\phi$ क्ष हें $\phi$ क्षचें फङ्क्शन आहे: ह्मणजे जर $\text{फ क्ष} = \text{क्ष} + \text{क्ष}^{२}$, तर **फ** $\phi$ क्ष हा $\phi\,\text{क्ष} + (\phi\,\text{क्ष})^{२}$ आहे.

**उदाहरण** $\phi\,\text{क्ष} = १ + \text{क्ष}^{२}$ $\quad$ $\text{फ क्ष} = १ - \text{क्ष}^{२}$ असें घे, तर

$$\text{फ}\,\phi\,\text{क्ष} = १ - (१ + \text{क्ष}^{२})^{२} = -२\text{क्ष}^{२} - \text{क्ष}^{४}$$

$$\phi\,\text{फ क्ष} = १ + (१ - \text{क्ष}^{२})^{२} = २ - २\text{क्ष}^{२} + \text{क्ष}^{४}$$

$\phi$ क्ष = $क्ष^{अ}$ असें घे, तर $\phi$ (१+क्ष) = $(१+क्ष)^{अ}$ $\phi$(२क्ष) = $(२क्ष)^{अ}$

$\phi$(अ) = $अ^{अ}$ ब = $ब^{अ}$ इत्यादि

समीकरणांतील क्ष चा प्रत्येक किंमतीविषयीं एक किंवा अनेक फङ्क्शनें जीं अवश्य खरीं आहेत, त्या समीकरणास **फङ्क्शनानुरूप समीकरण** ह्मणतात. जसें जर $\phi$ क्ष = अक्ष, तर $\phi$(बक्ष) = अबक्ष = ब×$\phi$ क्ष, अथवा

$\phi$ (बक्ष) = ब$\phi$ क्ष

जेव्हां $\phi$ क्ष याचा अर्थ अक्ष आहे, तेव्हां वरचें समीकरण नेहमी खरें आहे.

या वरून हीं पुढील समीकरणें काढितां येतील :

जर $\phi$ क्ष = $क्ष^{अ}$ तर $\phi$ क्ष × $\phi$ य = $\phi$(क्षय)

$\phi$ क्ष = $अ^{क्ष}$ तर $\phi$ क्ष × $\phi$ य = $\phi$(क्ष+य)

$\phi$ क्ष = अक्ष+ब तर $\frac{\phi क्ष - \phi य}{\phi क्ष - \phi ज्ञ} = \frac{क्ष - य}{क्ष - ज्ञ}$

$\phi$ क्ष = अक्ष तर $\phi$ क्ष + $\phi$ य = $\phi$(क्ष+य)

जा बीजगणितरूपानें एकादें फङ्क्शनानुरूप समीकरण स्थापिलें जातें तें रूप त्या समीकरणापासून नेहमी काढितां येतें : उदाहरण, जर $\phi$ (क्षय) = क्ष×$\phi$ य असें आहे, आणि हें सर्वदा खरें आहे असें कल्पिलें तर जेव्हां य=१ असेल तेव्हां ही खरें होईल, आणि त्यापासून $\phi$ (क्ष) = क्ष×$\phi$(१) असें होईल. परंतु $\phi$ क्ष यांत क्षचे ठिकाणीं १ मांडिल्यानें $\phi$(१) हें अन्यसंबंधरहित परिमाण होतें. त्यास क ह्मण : तर कची कोणती एकादि किंमत त्या समीकरणास स्थापील किंवा नाहीं, इतकें मात्र पहाण्याचें राहिलें आहे. $\phi$ क्ष = कक्ष घे; तर $\phi$(क्षय) = कक्षय आणि क्ष×$\phi$ य = क्ष×कय = कक्षय; यावरून कचा सर्व किंमतीविषयीं $\phi$ (क्षय) = क्ष $\phi$ य, आणि $\phi$ क्ष हा कक्ष आहे, $\phi$(१) हा क×१ अथवा क, पूर्वींचे कल्पनेप्रमाणेंच आहे. त्याच प्रमाणें,

जर $\phi$क्षय = $(\phi क्ष)^{य}$, तर क्ष=१ केल्यानें या पुढील प्रमाणें होतें

$\phi$ य = $\{\phi(१)\}^{य}$ = $क^{य}$ $\phi$क्ष = $क^{क्ष}$

$\phi$ (क्षय) = $क^{क्षय}$ = $(क^{क्ष})^{य}$ = $(\phi क्ष)^{य}$

आणि $\phi(१) = क^{१} = क$, हें पूर्वींचे कल्पनेप्रमाणें आहे. फङ्शनसंबंधी जें यांत लिहिण्याचें पडेल त्याची माहितगारी होण्यास हा आणि पुढला सिद्धांत पुरेसा आहे.

पूर्वीं पाहिलें कीं जर $\phi क्ष = क^{क्ष}$, तर $\phi क्ष \times \phi य = \phi(क्ष+य)$ असें होतें; परंतु ज्यांचा योगानें असे गुण होतील अशीं क्षचीं दुसरीं कांहीं फङ्शनें आहेत कीं नाहीं, हें अद्यापि समजत नाहीं. तथापि याचे उलटें आतां सिद्ध करून दाखवितों, म्हणजे, $\phi क्ष \times \phi य = \phi(क्ष+य)$ हें समीकरण $क^{क्ष}$ अशा रूपाचें फङ्शन असल्याशिवाय क्षचा कोणत्याही फङ्शनानें स्थापिलें जाणार नाहीं.

$$\phi क्ष \times \phi य = \phi(क्ष+य) \cdots\cdots (ऊ)$$

मनांत आण, कीं यांत $\phi क्ष$ हें अशा जातीचें फङ्शन आहे, कीं **क्ष आणि य यांचा कशाही किमती असोत** तरी वरचें समीकरण खरें होईल. यचे ठिकाणीं अ+ब मांड, त्यापासून हें होईल

$$\phi क्ष \times \phi(अ+ब) = \phi(क्ष+अ+ब)$$

परंतु वर लिहिल्याप्रमाणें (ऊ) समीकरणापासून $\phi(अ+ब) = \phi अ \times \phi ब$, यावरून

$$\phi क्ष \times \phi अ \times \phi ब = \phi(क्ष+अ+ब)$$

यांत कोणत्येही अक्षराचे जागीं म्हणजे एथे अचे जागीं क+इ मांड. यापासून हें होईल

$$\phi क्ष \times \phi(क+इ) \times \phi ब = \phi(क्ष+क+इ+ब)$$

परंतु $\quad \phi(क+इ) = \phi क \times \phi इ$

यावरून $\quad \phi क्ष \times \phi क \times \phi इ \times \phi ब = \phi(क्ष+क+इ+ब)$

आणि याप्रमाणें पुढेंही: म्हणजे जर हव्ये त्या किमतीचीं न पदें असतील, म्हणजे, $अ_१, अ_२, अ_३, \cdots; अ_{न-१}, अ_न$, असें असेल, तर पुढील प्रमाणें होईल

$$\varphi\, अ_1 \times \varphi\, अ_2 \cdots \times \varphi\, अ_{न-1} \times \varphi\, अ_न = \varphi\,(अ_1 + अ_2 + अ_3 + \cdots + अ_{न-1} + अ_न)$$

आतां हीं न परिमाणें परस्परांचा बरोबर असून प्रत्येक अ-चे बरोबर आहेत अशी कल्पना कर. यापासून हें होईल

$$\left\{\begin{matrix}\varphi\, अ \times \varphi\, अ \times \cdots \times \varphi\, अ \times \varphi\, अ \\ \text{न पदापर्यंत}\end{matrix}\right\} = \varphi\left(\begin{matrix}अ + अ + अ \cdots\cdots + अ + अ \\ \text{न पदापर्यंत}\end{matrix}\right)$$

अथवा $$(\varphi\, अ)^न = \varphi\,(नअ)$$

यांत न कांहीं पूर्णांक आहे.※

यासारिखेंच, जर म परिमाणें प्रत्येक ब-चे बरोबर आहेत अशी कल्पना केली, तर या प्रमाणें होईल

$$(\varphi\, ब)^म = \varphi\,(मब)$$

म आणि न हे दोन्हीं पूर्णांक आहेत, ह्मणून आतां मब = नअ आहे अशी कल्पना घे, तर याप्रमाणें होईल

$$\varphi\,(मब) = \varphi\,(नअ) \text{ अथवा } (\varphi\, ब)^म = (\varphi\, अ)^न$$

अथवा $$\varphi\, ब = (\varphi\, अ)^{\frac{न}{म}} \text{ परंतु } ब = \frac{न}{म}\, अ$$

तर $$\varphi\left(\frac{न}{म}\, अ\right) = (\varphi\, अ)^{\frac{न}{म}}$$

अथवा जेव्हां प पूर्णांक आहे, अथवा **१८७ पृष्ठाप्रमाणें** तो सममान अपूर्णांक आहे, तेव्हां $\varphi\,(पअ) = (\varphi\, अ)^प$. हें ही समीकरण खरें आहे.

वरचे **(अ)** समीकरणांत, क्ष = ० आणि य = ० असें घे, यावरून क्ष + य = ०. $\varphi\,(०)$ यास क ह्मण, तेव्हां याप्रमाणें होईल; क × क = क, अथवा क = १. नंतर य = − क्ष, अथवा क्ष + य = ० असें घे, तर याप्रमाणें होईल

$$\varphi\, क्ष \times \varphi\,(-क्ष) = \varphi\,(०) = १ \text{ अथवा } \varphi\,(-क्ष) = \frac{१}{\varphi\, क्ष};$$

हें समीकरण क्ष-चे प्रत्येक किंमतीविषयीं खरें आहे, ह्मणजे प पूर्णांक किंवा सममान अपूर्णांक असेल, आणि क्ष-चे जागीं पअ मांडिला, तर त्याविषयीं

※ वरची कृती अपूर्णांकास लागू होईल असें कल्पवत नाहीं. १०४ आणि १०५ पृष्ठपहा.

हें समीकरण खरें आहे. असें केल्यानें याप्रमाणें होईल

$$\varphi(-\text{प}\text{अ}) = \frac{1}{\varphi\,\text{प}\text{अ}} = \frac{1}{\varphi(\text{अ})^{\text{प}}} = \varphi\,\text{अ}^{-\text{प}}$$

अथवा जर प ऋण पूर्णांक किंवा सममान अपूर्णांक असेल तेव्हां हें पुढील समीकरण खरें आहे,

$$\varphi(\text{प}\text{अ}) = (\varphi\,\text{अ})^{\text{प}}$$

यावरून, **२३३ एष्ठाप्रमाणें**, अ=१ असें करून, जर प सममान जाती असेल, तर ही पुढील गोष्ट सिद्ध होत्ये,

$$\varphi(\text{प}) = \text{क}^{\text{प}}$$

यांत क कोणतेंही परिमाण असो.

जेव्हां प असंममान परिमाण असेल, असें $\sqrt{2}$, $\sqrt[3]{2}$, इत्यादि, तरी वरनें समीकरण खरें आहे; परंतु या समीकरणाचा सारांशाशीं अशी रीतीनें कृती केली जाईल, कीं त्याचा ताळा दाखविण्याचें प्रयोजन पडणार नाहीं.

## अभ्यासासाठीं उदाहरणें

$$\varphi(\text{क्ष}+\text{य}) + \varphi(\text{क्ष}-\text{य}) = 2\varphi\,\text{क्ष}\times\varphi\,\text{य}$$

हें समीकरण अचे प्रत्येक किमतीविषयीं या पुढील समीकरणानें स्थापलें जाईल, हें दाखीव:

$$\varphi\,\text{क्ष} = \frac{1}{2}\left(\text{अ}^{\text{क्ष}} + \text{अ}^{-\text{क्ष}}\right)$$

आणि

$$\varphi(\text{क्ष}+\text{य}) = \varphi\,\text{क्ष} + \varphi\,\text{य}$$

यास या पुढील समीकरणावाचून दुसरें कांहीं उत्तर नाहीं हें दाखीव म्हणजे

$$\varphi\,\text{क्ष} = \text{अ}\text{क्ष}$$

# अकरावा अध्याय.

## *द्वियुक्पदसिद्धांताविषयीं.

$(अ+ब)^{न}$ यांस अ आणि ब यांचे घातां प्रमाणें श्रेणींत विस्तार करण्याचे रीतीला द्वियुक्पदसिद्धांत असें नाव दिलेलें आहे, ती श्रेणी नियत किंवा अनियत जसा पक्ष असेल त्याप्रमाणें असो, आणि न घातप्रकाशक हा पूर्ण किंवा अपूर्ण, धन किंवा ऋण, सममान किंवा असममान असो.

$(१+क्ष)^{न}$ यास क्षचे घातांचे श्रेणींत विस्तार करण्याप्रमाणें वरचे पक्षाचा विस्तार केला जाईल : कांकीं

$$अ+ब=अ\left(१+\frac{ब}{अ}\right) \qquad (अ+ब)^{न}=अ^{न}\left(१+\frac{ब}{अ}\right)^{न}$$

$क्ष=\frac{ब}{अ}$ असें घे, तर $(१+क्ष)^{न}$ हें विस्तार करण्याचें फङ्शन आहे,

हा सिद्धांत फार उपयोगाचा आहे, यासाठीं त्याचे सिद्धतेचा दोन रीती दाखवितों : पहिली, पृथक्करण्याची रीति, ह्मणजे वींत असा शोध केला जाईल, कीं $(१+क्ष)^{न}$ याचे बरोबर श्रेणी ती कोणती आहे : दुसरी एकीकरण रीति, ह्मणजे वींत असें दाखविलें जाईल, कीं जी श्रेणी पहिल्या रीतीनें सांपडली ती इच्छिली श्रेणी आहे.

शक्य असेल, तर $(१+क्ष)^{न}$ ही क्षची पूर्ण घातांची श्रेणी या पुढील रूपाची असावी

$$(१+क्ष)^{न}=अ_{०}+अ_{१}क्ष+अ_{२}क्ष^{२}+अ_{३}क्ष^{३}+इत्यादि$$

यांत $अ_{०}$, $अ_{१}$, इत्यादि हीं नचीं फङ्शनें आहेत, आणि क्षचीं नाहींत.

**लेम्मा.** जसा ब अधिक अधिक अचे बरोबर होण्यास जवळजवळ येतो, तसाच $\frac{अ^{न}-ब^{न}}{अ-ब}$, हा अपूर्णांक जा नियततेजवळजवळ जातो ती नियतता

न $अ^{न-१}$ आहे, यांत नची किंमत कशी हीअसो.

**पहा कीं जेव्हां अ=ब आहे, तेव्हां वरचा अपूर्णांकाचें $\frac{0}{0}$ असें रूप होतें** **२७३ पृष्ठ पहा.**

पहिल्यानें. न पूर्णांक आहे अशी कल्पना कर. तर **१९३ पृष्ठा-प्रमाणें,**

$$\frac{अ^{न}-ब^{न}}{अ-ब}=अ^{न-१}+अ^{न-२}ब+अ^{न-३}ब^{२}+\cdots\cdots+अब^{न-२}+ब^{न-१}$$

जेव्हां अ आणि ब हे परस्पर बरोबर होण्यास जवळ येतात, तेव्हां वरचे समीकरणाचे दुसऱ्ये बाजूची नियतता या पुढील प्रमाणें होईल,

$$अ^{न-१}+अ^{न-२}अ+अ^{न-३}अ^{२}+\cdots\cdots+अअ^{न-२}+अ^{न-१}$$

अथवा $अ^{न-१}+अ^{न-१}+अ^{न-१}+\cdots\cdots\cdots\cdots+अ^{न-१}+अ^{न-१}$

अथवा न $अ^{न-१}$

**बचे १ घातापासून न−१ घात पर्यंत प्रत्येक घाताविषयीं एक एक पद आहे, आणि एक पद बशीं निराधार आहे, यावरून वरचे श्रेणीमध्यें न पदें आहेत हें स्पष्ट आहे.**

दुसऱ्यानें, न अपूर्णांक आहे अशी कल्पना कर, म्हणजे $\frac{प}{क}$ असा आहे आणि त्यांत प, क, हे पूर्णांक आहेत असें मनांत आण. तर या प्रमाणें होईल

$$\frac{अ^{न}-ब^{न}}{अ-ब}=\frac{अ^{\frac{प}{क}}-ब^{\frac{प}{क}}}{अ-ब}=\frac{\left(अ^{\frac{१}{क}}\right)^{प}-\left(ब^{\frac{१}{क}}\right)^{प}}{\left(अ^{\frac{१}{क}}\right)^{क}-\left(ब^{\frac{१}{क}}\right)^{क}}$$

$\left(अ^{\frac{१}{क}}=अ_{१}\text{ आणि }ब^{\frac{१}{क}}=ब_{१}\text{ असें घे}\right)$, तर वरची पद्धती $=\frac{अ_{१}^{प}-ब_{१}^{प}}{अ_{१}^{क}-ब_{१}^{क}}$

$$=\frac{\dfrac{अ_{१}^{प}-ब_{१}^{प}}{अ_{१}-ब_{१}}}{\dfrac{अ_{१}^{क}-ब_{१}^{क}}{अ_{१}-ब_{१}}}$$

आतां, जसा बचे जवळ अ होत जातो, तसा ब₁चे जवळ अ₁ होत जातो, आणि

प आणि क हे पूर्णांक आहेत, ह्मणून वरचे अपूर्णांकाचे अंश आणि छेद यांच्या नियतता $प अ_{1}^{प-1}$ आणि $क अ_{1}^{क-1}$ आहेत; यावरून वरचे अपूर्णांकाचीनियतता ही आहे

$$\frac{प अ_{1}^{प-1}}{क अ_{1}^{क-1}} \text{ अथवा } \frac{प}{क} अ_{1}^{प-क} \text{ अथवा } \frac{प}{क}\left(अ^{\frac{1}{क}}\right)^{प-क} \text{ अथवा } \frac{प}{क} अ^{\frac{प}{क}-1} \text{ अथवा, } न अ^{न-1}$$

तिसऱ्यानें, न ऋण आहे अशी कल्पना कर, आणि त्याचे जोडीचें धन परिमाण प असावें, असें कीं न = −प होईल. तर

$$\frac{अ^{न}-ब^{न}}{अ-ब} = \frac{अ^{-प}-ब^{-प}}{अ-ब} = \frac{अ^{\frac{1}{प}}-ब^{\frac{1}{प}}}{अ-ब} = \frac{1}{अ^{प}ब^{प}} \cdot \frac{ब^{प}-अ^{प}}{अ-ब}$$

$$= -\frac{1}{अ^{प}ब^{प}} \times \frac{अ^{प}-ब^{प}}{अ-ब}$$

जसा ब कडे अ येत जातो, तशी वरची प्रथम गुणक पदाची नियतता $-\frac{1}{अ^{प}अ^{प}}$ अथवा $-अ^{-2प}$ ही होईल, आणि प धन आहे, तर पूर्वीं सिद्ध केल्याप्रमाणें वरचे दुसऱ्या गुण्य पदाची नियतता $प अ^{प-1}$ आहे. यावरून वरचे गुणाकाराची नियतता $-अ^{-2प} \times प अ^{प-1}$ अथवा $-प अ^{-प-1}$, आणि न = −प आहे तर या नियततेचें रूप $न अ^{न-1}$ होईल.

आतां पूर्वीं कल्पिलेली श्रेणी पुनः घेतों,

$$(1+क्ष)^{न} = अ_{0} + अ_{1} क्ष + अ_{2} क्ष^{2} + अ_{3} क्ष^{3} + \text{ इत्यादि}$$

इच्छेप्रमाणें क्ष चे हवें तेवढें अवळ करितां येईल असें एक य परिमाण घे; क्ष चे सर्व किमती विषयीं वरची श्रेणी खरी आहे अशी कल्पना केल्यावरून, क्ष चे जागीं य मांडिला जाईल, तर या प्रमाणें होईल

$$(1+य)^{न} = अ_{0} + अ_{1} य + अ_{2} य^{2} + \text{ इत्यादि}$$

$$(1+क्ष)^{न} - (1+य)^{न} = अ_{1}(क्ष-य) + अ_{2}(क्ष^{2}-य^{2}) + \text{ इत्यादि}$$

याचे दोन बाजूंस, क्ष−य, अथवा (1+क्ष) − (1+य) यांणीं भाग.

तर $\frac{(१+क्ष)^{न} - (१+य)^{न}}{(१+क्ष) - (१+य)} = अ_{१} + अ_{२}\frac{क्ष^{२}-य^{२}}{क्ष-य} + अ_{३}\frac{क्ष^{३}-य^{३}}{क्ष-य} +$ इत्यादि

याच्या दोन्ही बाजू नेहेमी बरोबर आहेत, आणि जसे क्ष आणि य हे बरोबर होण्यास जवळ येत जातात, तसा १+क्ष आणि १+य हे बरोबर होण्यास जवळ होत जातात, यावरून त्या दोन बाजूंच्या नियतता बरोबर आहेत; अथवा

$$न (१+क्ष)^{न-१} = अ_{१} + २अ_{२}क्ष + ३अ_{३}क्ष^{२} + \text{इत्यादि}$$

याच्या दोन्ही बाजू १+क्ष यांणीं गुण. तर

$$न (१+क्ष)^{न} = अ_{१} + २अ_{२}क्ष + ३अ_{३}क्ष^{२} + ४अ_{४}क्ष^{३} + \text{इत्यादि}$$
$$+ \; अ_{१}क्ष + २अ_{२}क्ष^{२} + ३अ_{३}क्ष^{३} + \text{इत्यादि}$$

परंतु

$$न (१+क्ष)^{न} = नअ_{०} + नअ_{१}क्ष + नअ_{२}क्ष^{२} + नअ_{३}क्ष^{३} + \text{इत्यादि}$$

यामुळें, **३११ पृष्ठाप्रमाणें**

$अ_{१} = नअ_{०}$, $२अ_{२} + अ_{१} = नअ_{१}$, अथवा $अ_{२} = \frac{न-१}{२}अ_{१} = न\frac{न-१}{२}अ_{०}$

$३अ_{३} + २अ_{२} = नअ_{२}$ अथवा $अ_{३} = \frac{न-२}{३}अ_{२} = न.\frac{न-१}{२}.\frac{न-२}{३}अ_{०}$

$४अ_{४} + ३अ_{३} = नअ_{३}$ अथवा $अ_{४} = \frac{न-३}{४}अ_{३} = न\frac{न-१}{२}\;\frac{न-२}{३}\;\frac{न-३}{४}अ_{०}$

या सर्व पदांत $अ_{०}$ साधारण गुणक आहे, हें पाहून त्यास ही क्षची किंमत कल्पिल्ये श्रेणींत मांडून या प्रमाणें होईल

$$(१+क्ष)^{न} = अ_{०}\left(१ + नक्ष + न\frac{न-१}{२}क्ष^{२} + न\frac{न-१}{२}\;\frac{न-२}{३}क्ष^{३} + \text{इत्यादि}\right)$$

यांत $अ_{०}$ याचा अद्यापि निश्चय झाला नाहीं. तो निश्चय करायाकरितां पहिल्यानें पाहिलें पाहिजे, कीं वरची श्रेणी कधीं उतरती होत आते कीं नाहीं.

परंतु अगोधर लक्षांत आणिलें पाहिजे, कीं जी गोष्ट सिद्ध झाली ती योग्य ह्मणण्या प्रमाणें, वरच्या समीकरणाची सिद्धता नाहीं, परंतु हें मात्र आहे, कीं जर $(१+क्ष)^{न}$ हीचा क्षचे पूर्ण घाताचे कोणत्येही श्रेणींत सर्वदा विस्तार केला जाईल, तर ती श्रेणी वरची आहे. कारण अशी क-

ल्पना घेतली, कीं $(१+क्ष)^{न} = अ_{०}+अ_{१}क्ष+अ_{२}क्ष^{२}+$ इत्यादि आहे, परंतु असें कदाचित घडेल, कीं जी श्रेणी कल्पायास योग्य ती अपूर्णांकाची, किंवा ऋण, किंवा मिश्र घातांची असावी.

पूर्वीचा शोधामध्यें, जेव्हां अशक्यरूपाची कल्पना घेतली, तेव्हां कृतीचे शेवटास जीचा अर्थ सांगीतला नाहीं असा कांहीं नवा उघडा विषय दृष्टीस पडल्यावर, त्या अशक्यरूपाचे कल्पनेची सूचना झाली. जा श्रेणीस खरी असें सिद्ध करण्यास कल्पना अथवा अनुभव होता, त्या शिवाय दुसऱ्ये श्रेणीची कल्पना यापूर्वी घेतली नाहीं, आणि जी श्रेणी तयार झाली आहे तिचा खऱ्येपणा विषयीं अनुभव अथवा कारण ही नाहीं, यावरून आपण खरें चालतों हें कळत नाहीं अथवा आपल्ये खोट्येपणाची सूचना कोणती तीही कळत नाहीं. जर कांहीं चूक झाली असेल, तर त्या चुकीनंतर श्रेणीचा निरंतर चढतेपणा दृष्टीस पडेल. याजकरितां वरची श्रेणी शोधून पहातों.

वेगळाली पदें जीं त्यांचे पूर्वीचे पदाशीं प्रमाणें ठेवितात तीं या प्रमाणें आहेत,

$$न क्ष, \quad \frac{न-१}{२} क्ष, \quad \frac{न-२}{३} क्ष, \quad \frac{न-३}{४} क्ष \text{ इत्यादि}$$

यांचें साधारण रूप हें होतें

$$\frac{(प+२) \text{ पद}}{(प+१) \text{ पद}} = \frac{न-प}{प+१} क्ष$$

पहिल्यानें, पहाण्यांत येतें, कीं जर न धन पूर्णांक असेल, तर श्रेणी नियत आहे: कांकीं (न+२) या आणि त्याचे पुढचे सगळ्ये पदांत न–न अथवा ०, गुणक स्थळीं येईल. यामुळें जा पक्षांत न अपूर्ण किंवा ऋण आहे असा पक्ष घेतों, जेव्हां प, नचे पार गेला आहे तेव्हां श्रेणीचें मागलें प्रमाण्य नेहेमी ऋण होईल, आणि त्यावरून असें दिसेल, कीं श्रेणीचीं एका आड एक पदें धन आणि ऋण होत जातील; कांकीं जेव्हां दोन परिमाणाचें प्रमाण ऋण आहे, त्यावरून त्या परिमाणांचीं चिन्हें भिन्न आहेत असें कळतें. मागील पदाचें चिन्ह सो-

डून दे आणि त्यास धन कर. वरचे श्रेणीचीं पदें एका आड एक धन आणि ऋण आहेत तिचा जोडीची धनपदांची श्रेणी जर उतरती केली जाईल तर ती श्रेणीही उतरती केली जाईल, हें पद्मण्याचा अभिप्राय आहे ह्मणून वरची गोष्ट करितां येईल. यावरून यापुढील प्रमाणें होईल

$$\frac{प-न}{प+१}क्ष \text{ अथवा } \frac{पक्ष}{१+प}-\frac{नक्ष}{१+प} \text{ अथवा } \frac{क्ष}{१+\frac{१}{प}}-\frac{नक्ष}{१+प}$$

जशीं जशीं मोठालीं पदें घेतों, तसें तसें वरचें दुसरें पद अनियत घटत जातें, आणि पहिल्याची नियतता क्ष होते. यामुळें जर १ पेक्षां क्ष कमी आहे, तर वर लिहिलें प्रमाण कांहीं पदानंतर, १ पेक्षां कमी होतें, आणि नंतर तेंच प्रमाण क्ष नियततेच्या अवळ क्रमानें येईल. ह्मणजे जेव्हां १ पेक्षां क्ष कमी आहे तेव्हां ती मिळालेली श्रेणी नेहमी उतरती आहे.

असा पक्ष खरा आहे तर **३१२ पृष्ठाप्रमाणें** क्ष=० असें केल्यानें त्यापासून जें उत्तर निघतें तें कामांत आणिलें जाईल, आणि त्यापासून $(१)^{न}$ = अ० असें होतें. जर न पूर्णांक असेल, तर अ० = १; परंतु जर न अपूर्णांक असेल, जसा $\frac{प}{क}$, तर $(१)^{\frac{प}{क}}$ = अ० = $(१^{प})^{\frac{१}{क}}$ = $(१)^{\frac{१}{क}}$, ह्मणजे अ० हा १ चें कोणतेंही क मूळ होईल; **२०७ पृष्ठ पहा.** जर त्याचें अंकगणितरूप मूळ घेतलें, तर अ० = १ असें निघतें; आणि जर संशयाची पहिल्यानें कल्पिलेली श्रेणी खरी असेल, तर जेव्हां १ पेक्षां क्ष कमी आहे तेव्हां ही श्रेणी १+क्ष याच्या अंकगणितरूपाच्या न घात आहे, अथवा सर्व पक्षांत $(अ+क्ष)^{न}$ याचे बीजगणितरूपाचे बरोबरीचा आहे.

जेव्हां न पूर्णांक आहे तेव्हां वरची श्रेणी खरी आहे असें दाखवितों. भलत्या कोणत्याही पूर्णांकाविषयीं ती खरी आहे अशी कल्पना कर, आणि तो पूर्णांक दाखवायासाठीं म घे. तर अ० हा १ असून याप्रमाणें होईल.

$$(१+क्ष)^{म} = १+मक्ष+म\frac{म-१}{२}क्ष^{२}+म\frac{म-१}{२}\;\frac{म-२}{३}क्ष^{३}+ \text{इत्यादि}$$

दोन्ही बाजू १+क्ष यांणी गुण.

$$(१+क्ष)^{म+१} = १+मक्ष+म\frac{म-१}{२}क्ष^२+म\frac{म-१}{२}\,\frac{म-२}{३}क्ष^३+ इत्यादि$$
$$+ क्ष + म \quad क्ष^२+म\frac{म-१}{२} \quad क्ष^३+ इत्यादि$$
$$=१+(म+१)क्ष+\left(म\frac{म-१}{२}+म\right)क्ष^२+\left(म\frac{म-१}{२}\,\frac{म-२}{३}+म\frac{म-१}{२}\right)क्ष^३+ इत्यादि$$

परंतु $म\frac{म-१}{२}+म=म\left(\frac{म-१}{२}+१\right)=म\frac{म+१}{२}=(म+१)\frac{म}{२}$

$$म\frac{म-१}{२}\,\frac{म-२}{३}+म\frac{म-१}{२}=म\frac{म-१}{२}\left(\frac{म-२}{३}+१\right)=(म+१)\frac{म}{२}\,\frac{म-१}{३}$$

यावरून

$$(१+क्ष)^{म+१}=१+(म+१)क्ष+(म+१)\frac{म}{२}क्ष^२+(म+१)\frac{म}{२}\,\frac{म-१}{३}क्ष^३+ इत्यादि$$

आतां जर म+१ याचेआगीं न, अथवा मचेआगीं न−१ मांडिला असतां, हीश्रेणी या पुढील श्रेणी सारिखीच, अथवा तिचाच नियमाप्रमाणें चालत्ये,

$$(१+क्ष)^न=१+नक्ष+न\cdot\frac{न-१}{२}क्ष^२+न\cdot\frac{न-१}{२}\,\frac{न-२}{२}क्ष^३+ इत्यादि$$

यावरून जरही पद्धती नचे कोणत्येही पूर्ण किमतीविषयीं खरी आहे; तरत्याचेजवळचे पुढल्ये किमतीविषयीं खरी आहे. परंतु जेव्हां न=१ असेल तेव्हां ही खरी आहे; कांकीं

$$(१+क्ष)^१=१+१क्ष+१\cdot\frac{१-१}{२}क्ष^२+१\cdot\frac{१-१}{२}\cdot\frac{१-२}{३}क्ष^३+ इत्यादि$$

यामुळें, जेव्हां न=२ तेव्हां खरी आहे; परंतु यामुळें जेव्हां न=३, तेव्हां खरी आहे, आणि याप्रमाणें पुढें **अनंतपावेतों.**

$(१+क्ष)^न$ ही नचें फङ्ग्शन आहे असें कल्पिलें, आणि तीस $\varphi न$ म्हटलें, तर दिसण्यांत येतें, कीं

$$(१+क्ष)^न\times(१+क्ष)^म=(१+क्ष)^{न+म}$$

अथवा $$\varphi न\times\varphi म=\varphi(न+म)$$

परंतु जेव्हां न पूर्णांक आहे तेव्हां $(१+क्ष)^न$ ही इच्छिलेली श्रेणी आहे, यामुळें, **जेव्हां न पूर्णांक आहे**, आणि वरची श्रेणी $\varphi न$ आहे, असें म्हटलें, तेव्हां

$$\varphi न\times\varphi म=\varphi(न+म)$$

अथवा

$$\left(१+\text{न}\text{क्ष}+\text{न}\cdot\frac{\text{न}-१}{२}\text{क्ष}^{२}+\text{न}\cdot\frac{\text{म}-१}{२}\cdot\frac{\text{न}-२}{३}\text{क्ष}^{३}+\text{इत्यादि}\right)$$

$$\times\left(१+\text{म}\text{क्ष}+\text{म}\cdot\frac{\text{म}-१}{२}\text{क्ष}^{२}+\text{म}\cdot\frac{\text{म}-१}{२}\cdot\frac{\text{म}-२}{३}\text{क्ष}^{३}+\text{इत्यादि}\right)$$

$$=१+(\text{म}+\text{न})\text{क्ष}+(\text{म}+\text{न})\frac{\text{म}+\text{न}-१}{२}\text{क्ष}^{२}+(\text{म}+\text{न})\frac{\text{म}+\text{न}-१}{२}\cdot\frac{\text{म}+\text{न}-२}{३}\text{क्ष}^{३}+\text{इत्यादि}$$

नुसत्ये गुणाकार करीतीनें, हें हवें तेवढें पुढें पावेतों सिद्ध केलें जाईल; कांकीं पहिल्या दोन श्रेण्या परस्पर गुणिल्या असतां या प्रमाणें होईल

$$१+(\text{म}+\text{न})\text{क्ष}+\left(\text{न}\cdot\frac{\text{न}-१}{२}+\text{नम}+\text{म}\cdot\frac{\text{म}-१}{२}\right)\text{क्ष}^{२}$$

$$+\left(\text{न}\cdot\frac{\text{न}-१}{२}\cdot\frac{\text{न}-२}{३}+\text{न}\cdot\frac{\text{न}-१}{२}\text{म}+\text{नम}\cdot\frac{\text{म}-१}{२}+\text{म}\cdot\frac{\text{म}-१}{२}\cdot\frac{\text{म}-२}{३}\right)\text{क्ष}^{३}$$

$$\text{परंतु}\ \text{न}\cdot\frac{\text{न}-१}{२}+\text{नम}+\text{म}\cdot\frac{\text{म}-१}{२}=\frac{\text{न}^{२}-\text{न}+२\text{नम}+\text{म}^{२}-\text{म}}{२}$$

$$=\frac{(\text{न}+\text{म})^{२}-(\text{न}+\text{म})}{२}=(\text{न}+\text{म})\frac{\text{न}+\text{म}-१}{२}$$

$$\text{न}\cdot\frac{\text{न}-१}{२}\cdot\frac{\text{न}-२}{३}+\text{न}\cdot\frac{\text{न}-१}{२}\text{म}+\text{नम}\frac{\text{म}-१}{२}+\text{म}\frac{\text{म}-१}{२}\cdot\frac{\text{म}-२}{३}$$

$$=\frac{\text{न}^{३}-३\text{न}^{२}+२\text{न}+३\text{न}^{२}\text{म}-३\text{नम}+३\text{नम}^{२}-३\text{नम}+\text{म}^{३}-३\text{म}^{२}+२\text{म}}{२\times३}$$

$$=\frac{(\text{न}+\text{म})^{३}-३(\text{न}+\text{म})^{२}+२(\text{न}+\text{म})}{२\times३}=(\text{न}+\text{म})\frac{\text{न}+\text{म}-१}{२}\cdot\frac{\text{न}+\text{म}-२}{३}$$

आणि या प्रमाणें पुढेंही. आतां हें पुढील मूळ प्रकर्ण सांगतों: **जा पक्षांत पूर्णांकाचेजागीं अक्षरें असतां वर दाखविल्या प्रमाणें बीजगणितरूप गुणाकारावरून किंवा दुसरे कांहीं बीजगणितरूप कृतीवरून, एकादें खरें उत्तर निघतें, असें जेव्हां सिद्ध केलें जातें, तेव्हां अपूर्णांकांविषयीं, किंवा असममान अंकांविषयीं आणि अंक ऋण आहेत त्यांविषयीं ही जीं अक्षरें घेतलीं त्यापासून जें उत्तर निघतें तें त्या प्रमाणेंच खरें आहे.** कांकीं पूर्णांकांविषयीं जीं उत्तरें खरी आहेत, आणि जीं खरीं नाहींत यांचें तारतम्य पहाण्याची अद्यापि गरज पडली नाहीं; परंतु प्रवेशकांत सांगीतल्या प्रमाणें पूर्णांक किंवा अपूर्णांकाचे जागीं अक्षरें घेतलीं तरी सगळ्या कृती खऱ्या आहेत. पूर्णांकाचेजागीं अक्षर घेतलें असतां, समीकरणांत एकादें पद होतें, परंतु जेव्हां अपूर्णांकाचेजागीं अक्षर घ्यावें तेव्हां तें पद नाहींसें होतें असा पक्ष कोणत्या

ही कृतींत आला नाहीं. यामुळें म आणि न हे पूर्णांक असून गुणाकाराचे सरळ रीतीनें, जरी $\varphi$ न $\times\, \varphi$ म $= \varphi$ (म+न) असें होईल, तरजेव्हां म आणि न अपूर्णांक असतील किंवा त्यांतून एक किंवा दोन्ही ही ऋण असतील, तेव्हां त्याच कृतीवरून हीं $\varphi$ (म+न) निघेल: यामुळें,

$$१ + \text{न}\text{क्ष} + \text{न}\,\frac{\text{न}-१}{२}\,\text{क्ष}^{२} + \text{ इत्यादि}$$

या श्रेणींत हाच गुण आहे, कीं जरती, नचें फङ्कशन आहे असें मानिलें, आणि त्यास $\varphi$ न असें ह्मटलें असतां, तिचा योगानें **सर्वपक्षांत** हें पुढील समीकरण स्थापिलें जातें,

$$\varphi\,\text{न} \times \varphi\,\text{म} = \varphi\,(\text{म}+\text{न})$$

परंतु **३३४ पृष्ठावरून** सिद्ध झालें, कीं वरचे समीकरणाचें उत्तर $\varphi$ न $=$ क$^{\text{न}}$ असावें, यांत क $= \varphi(१)$, आणि $\varphi(१)$ याची किंमत या पुढील प्रमाणें आहे असें दिसतें

$$१ + १\,\text{क्ष} + १\,\frac{१-१}{२}\,\text{क्ष}^{२} + \text{ इत्यादि अथवा } १+\text{क्ष}$$

यामुळें सर्व पक्षांत $\varphi$ न $= (१+\text{क्ष})^{\text{न}}$ वर ज्या सिद्धांताविषयीं विचार झाला तो हा आहे.

वरची श्रेणी कामांत आणण्याची, तर पुढें चालायाचे पूर्वीं, न, $\frac{\text{न}-१}{२}$, $\frac{\text{न}-२}{३}$, इत्यादि वेगवेगळे गुणक काढावे ह्मणजे ही रीति सहज आणि सोपी होत्ये: जसें, न $= \frac{१}{२}$ असें घे, अथवा $\sqrt{१+\text{क्ष}}$ या द्वियुक्पदास श्रेणीचें विस्तार रूप देण्याचें आहे असें मनांत आण.

$$\text{न} = \frac{१}{२},\ \frac{\text{न}-१}{२} = -\frac{१}{४},\ \frac{\text{न}-२}{३} = -\frac{१}{२},\ \frac{\text{न}-३}{४} = -\frac{५}{८} \text{ इत्यादि}$$

$$\sqrt{१+\text{क्ष}} = १ + \frac{१}{२}\text{क्ष} + \left(\frac{१}{२}\right)\left(-\frac{१}{४}\right)\text{क्ष}^{२} + \left(\frac{१}{२}\right)\left(-\frac{१}{४}\right)\left(-\frac{१}{२}\right)\text{क्ष}^{३} + \left(\frac{१}{२}\right)\left(-\frac{१}{४}\right)\left(-\frac{१}{२}\right)\left(-\frac{५}{८}\right)\text{क्ष}^{४} + \text{ इ०}$$

$$= १ + \frac{१}{२}\text{क्ष} - \frac{१}{८}\text{क्ष}^{२} + \frac{१}{१६}\text{क्ष}^{३} - \frac{५}{१२८}\text{क्ष}^{४} + \text{ इत्यादि}$$

जर न $= -१$ तर

$$\text{न} = -१,\ \frac{\text{न}-१}{२} = -१,\ \frac{\text{न}-२}{३} = -१,\ \frac{\text{न}-३}{४} = -१ \text{ इत्यादि}$$

$$(१+\text{क्ष})^{-१} \text{ अथवा } \frac{१}{१+\text{क्ष}} = १ + (-१)\text{क्ष} + (-१)(-१)\text{क्ष}^{२} + (-१)(-१)(-१)\text{क्ष}^{३} + \text{ इत्यादि}$$

$$= १ - \text{क्ष} + \text{क्ष}^{२} - \text{क्ष}^{३} + \text{ इत्यादि}$$

ही श्रेणी पूर्वी सिद्ध झाली त्या प्रमाणेंच आहे

जर $\text{न}=५$, तर

$$\text{न}=५,\quad \frac{\text{न}-१}{२}=२,\quad \frac{\text{न}-२}{३}=१,\quad \frac{\text{न}-३}{४}=\frac{१}{२},\quad \frac{\text{न}-४}{५}=\frac{१}{५},\quad \frac{\text{न}-५}{६}=०$$

$$(१+\text{क्ष})^{५}=१+५\text{क्ष}+\begin{pmatrix}५\\ \times २\end{pmatrix}\text{क्ष}^{२}+\begin{pmatrix}५\\ \times २\\ \times १\end{pmatrix}\text{क्ष}^{३}+\begin{pmatrix}५\\ \times २\\ \times १\\ \times \frac{१}{२}\end{pmatrix}\text{क्ष}^{४}+\begin{pmatrix}५\\ \times २\\ \times १\\ \times \frac{१}{२}\\ \times \frac{१}{५}\end{pmatrix}\text{क्ष}^{५}+\begin{pmatrix}५\\ \times २\\ \times १\\ \times \frac{१}{२}\\ \times \frac{१}{५}\\ \times ०\end{pmatrix}\text{क्ष}^{६}$$

$$=१+५\text{क्ष}+१०\text{क्ष}^{२}+१०\text{क्ष}^{३}+५\text{क्ष}^{४}+\text{क्ष}^{५}+०+०+\text{ इत्यादि}$$

जा पक्षांत घातप्रकाशक पूर्णांक आहे, तेव्हां द्वियुक्पदाचा सिद्धांत या पुढील प्रमाणें सिद्ध करण्याची चाल आहे: $\text{क्ष}+\text{अ}$ यास $\text{क्ष}+\text{ब}$ याणीं गुण, $\text{क्ष}^{२}+(\text{अ}+\text{ब})\text{क्ष}+\text{अब}$ असें होतें, आणि पुनः या गुणाकारास $\text{क्ष}+\text{क}$ याणीं गुणून, या प्रमाणें होईल

$$\text{क्ष}^{३}+(\text{अ}+\text{ब}+\text{क})\text{क्ष}^{२}+(\text{अब}+\text{बक}+\text{कअ})\text{क्ष}+\text{अबक}$$

यावरून दिसतें, कीं जर $\text{अ}_{१}, \text{अ}_{२}, \cdots \text{अ}_{\text{न}}$ अशीं न परिमाणें असतील, आणि जर सर्वांची बेरीज दाखविण्यासाठीं $\text{प}_{१}$ घेतला, आणि प्रत्येक दोन पदांचे गुणाकारांची बेरीज दाखविण्यासाठीं $\text{प}_{२}$ इत्यादि घेतले. म्हणजे, जर,

$$\text{प}_{१}=\text{अ}_{१}+\text{अ}_{२}+\text{अ}_{३}+\cdots\cdots$$

$$\text{प}_{२}=\text{अ}_{१}\,\text{अ}_{२}+\text{अ}_{२}\,\text{अ}_{३}+\text{अ}_{१}\,\text{अ}_{३}+\cdots\cdots$$

$$\text{प}_{३}=\text{अ}_{१}\,\text{अ}_{२}\,\text{अ}_{३}+\text{अ}_{१}\,\text{अ}_{३}\,\text{अ}_{४}+\cdots\cdots$$

$$\cdots\cdots\cdots\cdots\cdots\cdots$$

$$\cdots\cdots\cdots\cdots\cdots\cdots$$

$$\text{प}_{\text{न}-१}=\{\text{अ}_{१}\text{ यावांचून सर्वांचा गुणाकार}\}+\{\text{अ}_{२}\text{ यावांचून सर्वांचा गुणाकार}\}+\cdots$$

$$\text{प}_{\text{न}}=\text{सर्वांचा गुणाकार};$$

या प्रमाणें घेतलें, तर या पुढील प्रमाणें निघतें

$$(क्ष+अ_{१})(क्ष+अ_{२})\cdots(क्ष+अ_{न}) = क्ष^{न}+प_{१}क्ष^{न-१}+प_{२}क्ष^{न-२}+\cdots+प_{न-१}क्ष+प_{न}$$

$प_{१}$ यांत पदांची संख्या न आहे; आणि $प_{२}$ यामध्यें न परिमाणांतून २ परिमाणाचीं जितक्ये तऱ्हेचीं एकीकरणें होतील तितकी पदांची संख्या आहे, अथवा **अंकगणित मूळपीठिकेचा २१० व्ये कलमाप्रमाणें** $न\cdot\frac{न-१}{२}$, $प_{३}$ यामध्यें न परिमाणांतून ३ परिमाणाचीं जितक्ये तऱ्हेचीं एकीकरणें होतील तितकी पदांची संख्या आहे, अथवा $न\cdot\frac{न-१}{२}\cdot\frac{न-२}{३}$; आणि याप्रमाणें पुढेंही. यावरून जर अशी कल्पना केली कीं $अ_{१}$, $अ_{२}$, इत्यादि हीं सर्व परस्पर बरोबर असून प्रत्येक अचे बरोबर आहेत, तर या प्रमाणें होतें.

$$प_{१} = अ+अ+अ+\cdots = न अ$$

$$प_{२} = अ^{२}+अ^{२}+अ^{२}+\cdots = न\cdot\frac{न-१}{२}अ^{२}$$

$$प_{३} = अ^{३}+अ^{३}+अ^{३}+\cdots = न\cdot\frac{न-१}{२}\cdot\frac{न-२}{३}अ^{३}$$

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

$$\text{अथवा}\left\{\begin{matrix}(क्ष+अ)(क्ष+अ)\cdots(क्ष+अ)\\ \text{ज्यांत न गुणक आहेत}\end{matrix}\right\} = क्ष^{न}+नअक्ष^{न-१}+न\cdot\frac{न-१}{२}अ^{२}क्ष^{न-२}+\text{इत्यादि.}$$

यांत, जर क्ष=१ असें कल्पिलें, तर या प्रमाणें होईल

$$(१+अ)^{न} = १+नअ+न\cdot\frac{न-१}{२}अ^{२}+\text{इत्यादि.}$$

श्रेणीचे कोणत्येही शेवटापासून आरंभिलें तर गुणक सारिखेच आहेत, याचें कारण अंकगणित मूळपीठिकेंतील २११ व्ये कलमावरून लक्षांत येईल. जसें या पुढील उदाहरणांत ही दिसेल.

$$(१+क्ष)^{२} = १+२क्ष+क्ष^{२}$$

$$(१+क्ष)^{३} = १+३क्ष+३क्ष^{२}+क्ष^{३}$$

$$(१+क्ष)^{४} = १+४क्ष+६क्ष^{२}+४क्ष^{३}+क्ष^{४}$$

$$(१+क्ष)^{५} = १+५क्ष+१०क्ष^{२}+१०क्ष^{३}+५क्ष^{४}+क्ष^{५}$$

$$(१+क्ष)^{६} = १+६क्ष+१५क्ष^{२}+२०क्ष^{३}+१५क्ष^{४}+६क्ष^{५}+क्ष^{६}$$

$(\text{१}-\text{क्ष})^{\text{न}}$ याची किंमत काढायासाठीं, श्रेणींत क्षचें चिन्ह बदल कर; ह्मणजे, क्षचेआगीं −क्ष मांड; $\text{क्ष}^{\text{२}}$ याचें चिन्ह तसेंच राहूं दे; $\text{क्ष}^{\text{३}}$ याचेआगीं $-\text{क्ष}^{\text{३}}$ मांड; आणि याप्रमाणें पुढेंही; ह्मणजे याप्रमाणें होईल

$$(\text{१}-\text{क्ष})^{\text{न}}=\text{१}-\text{न}\text{क्ष}+\text{न}\cdot\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}\,\text{क्ष}^{\text{२}}-\text{इत्यादि}.$$

**जेव्हां न पूर्णांक आहे,** तेव्हां साधारण रूपानें श्रेणी यापुढीलरीतीनें मांडिली जाईल, जांत १ आणि न यांचेमधील आणि त्यासुद्धां सर्व गुणक जे पूर्णांक आहेत ते $\text{प}_{\text{न}}$ याणें दाखविले आलात.

$$(\text{१}+\text{क्ष})^{\text{न}}=\text{प}_{\text{न}}\left\{\frac{\text{१}}{\text{प}_{\text{न}}}+\frac{\text{क्ष}}{\text{प}_{\text{१}}\text{प}_{\text{न}-\text{१}}}+\frac{\text{क्ष}^{\text{२}}}{\text{प}_{\text{२}}\text{प}_{\text{न}-\text{२}}}+\cdots\cdots+\frac{\text{क्ष}^{\text{न}-\text{१}}}{\text{प}_{\text{न}-\text{१}}\text{प}_{\text{१}}}+\frac{\text{क्ष}^{\text{न}}}{\text{प}_{\text{न}}}\right\}$$

ह्मणजे वर सांगीतल्याप्रमाणें गुणकांचा सारिखेपणा यापासून दाखविला गेला.

अभ्यासासाठीं हीं पुढील उदाहरणें सांगतों :

१. जेव्हां न पूर्णांक आहे.

$$\text{२}^{\text{न}}=\text{१}+\text{न}+\text{न}\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}+\text{न}\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}\cdot\frac{\text{न}-\text{२}}{\text{३}}+\text{इत्यादि}$$

$$\text{०}^{\text{न}}=\text{१}-\text{न}+\text{न}\cdot\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}-\text{न}\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}\cdot\frac{\text{न}-\text{२}}{\text{३}}+\text{इत्यादि}$$

$$\text{२}^{\text{न}-\text{१}}=\text{१}+\text{न}\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}+\text{न}\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}\cdot\frac{\text{न}-\text{२}}{\text{३}}\cdot\frac{\text{न}-\text{३}}{\text{४}}+\text{इत्यादि}$$

२. $(\text{अ}+\text{ब})^{\text{न}}=\text{अ}^{\text{न}}+\text{न}\text{अ}^{\text{न}-\text{१}}\text{ब}+\text{न}\frac{\text{न}-\text{१}}{\text{२}}\text{अ}^{\text{न}-\text{२}}\text{ब}^{\text{२}}+\text{इत्यादि}$

३. जर न पूर्णांक असेल, तर

$$\left(\text{क्ष}+\frac{\text{१}}{\text{क्ष}}\right)^{\text{२}}=\text{क्ष}^{\text{२}}+\frac{\text{१}}{\text{क्ष}^{\text{२}}}+\text{२}$$

$$\left(\text{क्ष}+\frac{\text{१}}{\text{क्ष}}\right)^{\text{३}}=\text{क्ष}^{\text{३}}+\frac{\text{१}}{\text{क्ष}^{\text{३}}}+\text{३}\left(\text{क्ष}+\frac{\text{१}}{\text{क्ष}}\right)$$

$$\left(\text{क्ष}+\frac{\text{१}}{\text{क्ष}}\right)^{\text{४}}=\text{क्ष}^{\text{४}}+\frac{\text{१}}{\text{क्ष}^{\text{४}}}+\text{४}\left(\text{क्ष}^{\text{२}}+\frac{\text{१}}{\text{क्ष}^{\text{२}}}\right)+\text{६}$$

$$\left(\text{क्ष}+\frac{\text{१}}{\text{क्ष}}\right)^{\text{२न}}=\text{क्ष}^{\text{२न}}+\frac{\text{१}}{\text{क्ष}^{\text{२न}}}+\text{२न}\left(\text{क्ष}^{\text{२न}-\text{२}}+\frac{\text{१}}{\text{क्ष}^{\text{२न}-\text{२}}}\right)$$
$$+\text{२न}\frac{\text{२न}-\text{१}}{\text{२}}\left(\text{क्ष}^{\text{२न}-\text{४}}+\frac{\text{१}}{\text{क्ष}^{\text{२न}-\text{४}}}\right)+\cdots\cdots$$

याचे शेवटीं $\frac{२न(२न-१)\cdot(२न-२)\cdots\cdots(न+१)}{१\cdot\ २\ \cdot\ ३\ \cdots\cdots\ न}$

$$\left(क्ष+\frac{१}{क्ष}\right)^{२न+१} = क्ष^{२न+१} + \frac{१}{क्ष^{२न+१}} + (२न+१)\left(क्ष^{२न-१}+\frac{१}{क्ष^{२न-१}}\right)+\cdots$$

याचे शेवटीं $\frac{(२न+१)(२न)\cdots(न+२)}{१\cdot२\cdot३\cdots\cdots(न+१)}\left(क्ष+\frac{१}{क्ष}\right)$

४. $\frac{(१+क्ष)^न+(१-क्ष)^न}{२} = १+न\frac{न-१}{२}क्ष^२+न\frac{न-१}{२}\ \frac{न-२}{३}\ \frac{न-३}{४}क्ष^४+$ इत्यादि

$\frac{(१+क्ष)^न-(१-क्ष)^न}{२} = नक्ष+न\frac{न-१}{२}\ \frac{न-२}{३}\ क्ष^३+$ इत्यादि.

५. शिकणारानें आपल्या कामासाठीं या पुढील तऱ्हेनें उदाहरणें आणि त्यांचे ताळे सिद्ध करून बाळगून ठेवावे: कोणताही न घातप्रकाशक, पूर्ण किंवा अपूर्ण, धन किंवा ऋण असो, असा घेऊन सिद्धांताचे सहाय्यानें, $(१+क्ष)^न$ आणि $(१+क्ष)^{न-१}$ यांचा श्रेणीचे रूपांत विस्तार करावा; नंतर निघालेल्ये पहिल्ये श्रेणीस १+क्ष याणीं गुणून वरचे दुसऱ्ये द्वियुक्पदाची श्रेणी होईल.

६. $अ^न = ब^न+न(अ-ब)ब^{न-१}+न\frac{न-१}{२}(अ-ब)^२ब^{न-२}+$ इत्यादि.

यानंतर या पुढील पक्षांवर विशेषेंकरून अधिक दृष्टी ठेवावी लागेल:

$$\left(१+\frac{१}{न}\right)^{नक्ष} = १+नक्ष\frac{१}{न}+नक्ष\frac{नक्ष-१}{२}\cdot\frac{१}{न^२}+नक्ष\frac{नक्ष-१}{२}\ \frac{नक्ष-२}{३}\ \frac{१}{न^३}+\text{इत्यादि}$$

परंतु $नक्ष\frac{१}{न}=क्ष$, $\quad नक्ष\frac{नक्ष-१}{२}\times\frac{१}{न^२}=क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}$

$नक्ष\frac{नक्ष-१}{२}\times\frac{नक्ष-२}{३}\times\frac{१}{न^३}=क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}\ \frac{क्ष-\frac{२}{न}}{३}$ इत्यादि, यावरून

$$\left(१+\frac{१}{न}\right)^{नक्ष} = १+क्ष+क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}+क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}\cdot\frac{क्ष-\frac{२}{न}}{३}+\text{इत्यादि}$$

वरचे श्रेणींत क्ष=१ असें घे, तर याप्रमाणें होईल

$$\left(१+\frac{१}{न}\right)^{न} = १+१+\frac{१-\frac{१}{न}}{२}+\frac{१-\frac{१}{न}}{२}\cdot\frac{१-\frac{२}{न}}{३}+\text{इत्यादि}$$

परंतु १९६ पृष्ठाप्रमाणें $\left(१+\frac{१}{न}\right)^{नक्ष} = \left\{\left(१+\frac{१}{न}\right)^{न}\right\}^{क्ष}$

ह्मणजे वरची पहिली श्रेणी दुसऱ्ये श्रेणीचा क्ष घात आहे, आणि

$\left(१+१+\frac{१-\frac{१}{न}}{२}+ इत्यादि\right)^{क्ष} = १+क्ष+क्ष\,\frac{क्ष-\frac{१}{न}}{२} + इत्यादि$

जर न=०, तर $(१+क्ष)^{न}=१$, १६९ पृष्ठ पहा अथवा $(१+क्ष)^{न}-१=०$, अथवा $\frac{(१+क्ष)^{न}-१}{न}$ हा अपूर्णांक $\frac{०}{०}$ हें रूप धरितो. आतां विचारितों कीं जेव्हां न अनियत घटत जातो, तेव्हां या अपूर्णांकास नियतता आहे कीं नाहीं २७३ पृष्ठ पहा.

साधारण रूपाचे सिद्धांता पासून.

$$\frac{(१+क्ष)^{न}-१}{न} = क्ष+\frac{न-१}{२}क्ष^{२}+\frac{न-१}{२}\cdot\frac{न-२}{३}क्ष^{३}+ इत्यादि .$$

आणि जेव्हां न अनियत घटत जातो, तेव्हां दुसऱ्ये बाजूची नियतता या प्रमाणें होस्ये,

$$क्ष+\left(\frac{-१}{२}\right)क्ष^{२}+\left(\frac{-१}{२}\right)\left(\frac{-२}{३}\right)क्ष^{३}+\left(\frac{-१}{२}\right)\left(\frac{-२}{३}\right)\left(\frac{-३}{४}\right)क्ष^{४}+ इत्यादि$$

अथवा $क्ष-\frac{क्ष^{२}}{२}+\frac{क्ष^{३}}{३}-\frac{क्ष^{४}}{४}+ इत्यादि$

ह्मणजे,

जसा न अनियत घटत जातो, तसी $\frac{१+क्ष^{न}-१}{न}$ ही पद्धती या समोरचे श्रेणीचे अनियत जवळ जवळ होत जास्ये. } $क्ष-\frac{क्ष^{२}}{२}+\frac{क्ष^{३}}{३}-\frac{क्ष^{४}}{४}+ इत्यादि.$

जर क्ष=ज्ञ-१, आणि जेव्हां न अनियत घटत जातो, तेव्हां $\frac{ज्ञ^{न}-१}{न}$ याची नियतता या प्रमाणें आहे,

$$(ज्ञ-१)-\frac{१}{२}(ज्ञ-१)^{२}+\frac{१}{३}(ज्ञ-१)^{३}-\frac{१}{४}(ज्ञ-१)^{४}+ इत्यादि$$

जेव्हां क्ष अथवा ज्ञ-१, १ पेक्षां कमी, अथवा ज्ञ, २ पेक्षां कमी आहे, तेव्हां ही श्रेणी उतरती आहे या खेरीज या श्रेणीचे गुणाविषयीं दुसरें कांहीं

माहित नाहीं. जा पद्धतीपासून ही श्रेणी उत्पन्न होत्ये तीस आतां शोधून प-हातों. त्या पद्धतीमध्यें जर ज्ञचे जागीं $ज्ञ^{म}$ घेतला, तर या प्रमाणें होईल.

$$\frac{ज्ञ^{मन}-१}{न} \text{ अथवा } म\frac{ज्ञ^{मन}-१}{मन}$$

यांत म नियत परिमाण आहे, आणि न अनियत घटत जातो अशी कल्पना कर: तर मन ही अनियत घटत जातो. आतां, जेव्हां न अनियत घटत जातो तेव्हां जर φ नची नियतता न आहे, तर φ (मन) याची नियतता तीच असावी. परंतु यांत इतका मात्र भेद आहे, की जर (म=६ असें घेतलें), तर नचे कोणत्येही अतिलहान किमतीविषयीं, जितका φन त्या नियततेचे जवळ होत जातो, तितके φ(६न) त्याचे जवळ जात नाहींत, कांकीं या नियततेचा गुण या प्रमाणें आहे, कीं, न पुरतेपणीं लहान घेतल्यानें, इच्छे प्रमाणें लहान अशा न चा कोणत्याही सांगीतल्याक अपूर्णांकापेक्षां φन कमी केला जातो, तर नचे इच्छिल्ये किमतीचा ६ वा भाग घेतल्याने φ(६न) हे तसेच नचे तितके जवळ केले जातील. यावरून वरचा दोन पद्धती ह्मणजे

$$\frac{ज्ञ^{न}-१}{न} \text{ आणि } म\frac{ज्ञ^{मन}-१}{मन}$$

यांची नियतता सारिखीच आहे. परंतु जर पहिल्ये पद्धतीला ψ ज्ञ ह्मटलें, तर दुसरी पद्धती $\frac{१}{म}ψ(ज्ञ^{म})$ आहे; तर या प्रमाणें होतें

$$ψ \text{ ज्ञची नियतता} = \frac{१}{म}ψ\, ज्ञ^{म} \text{ ची नियतता}$$
$$= \frac{१}{म}\times ψ\, ज्ञ^{म} \text{ ची नियतता}$$

अथवा

$$ज्ञ-१-\frac{१}{२}(ज्ञ-१)^{२}+\text{ इत्यादि } = \frac{१}{म}\left(ज्ञ^{म}-१-\frac{१}{२}(ज्ञ^{म}-१)^{२}+\text{ इत्यादि}\right)$$

या श्रेणीचा हा गुण पुढील शोधाचा ताळा पहाण्याकरितां कामांत आणिला जाईल.

$$(१+क्ष)^{\sqrt{२}}$$

वरचा पद्धतींत मूळप्रकाशक चिन्ह असममान आहे, असा पक्ष वरचे कृतीमध्यें अद्यापि आला नाहीं, परंतु $\sqrt{२}$ याची नियतता अंकगणितरूपानें काढली असतां उत्तरोत्तर याप्रमाणें पदें होतात,

$$१,\ १\cdot४,\ १\cdot४१,\ १\cdot४१४,\ १\cdot४१४२, \text{ इत्यादि}$$

यावरून $१+क्ष \quad (१+क्ष)^{\frac{१४}{१०}} \quad (१+क्ष)^{\frac{१४१}{१००}} \quad (१+क्ष)^{\frac{१४१४}{१०००}}$ इत्यादि

हीं उत्तरोत्तरचीं पदें घेतल्यानें $(१+क्ष)^{\sqrt{२}}$ याचे नियततेचे जवळ जवळ होनजातात असें जाणलें पाहिजे, ह्मणजे $\sqrt{२}$ याचे जागीं, अथवा कोणत्येही नियततेचे जागीं तें चिन्ह घेतलें आहे त्याचे जागीं कोणतेंही जवळचें पद क घेतलें असतां $(१+क्ष)^{\sqrt{२}}$ याचे जोडीची जवळची श्रेणी याप्रमाणें आहे,

$$१+क\,क्ष+क\,\frac{क-१}{२}\,क्ष^{२}+ \text{ इत्यादि}$$

जेव्हां ही श्रेणी उतरती आहे, आणि जर प्रत्येक पद सहस्त्रांशाचे आंत खरें होई असें निघेल, तर स्पष्ट आहे, कीं श्रेणीचें सर्व धन सहस्त्रांशाचे आंत खरें होईल. **१९० एथा प्रमाणें** $\sqrt{२}$ याचे जवळचा क आणि क+म ह्या दोन किमती आहेत अशी कल्पना कर, ह्मणजे पहिली कमी आणि दुसरी अधिक, आणि अशी कल्पना कर कीं त्यांचें **प** पद आणि $(१+क्ष)^{\sqrt{२}}$ हीं ताडितों, अथवा,

$$क\cdot\frac{क-१}{२}\cdots\frac{क-प+२}{प-१}\,क्ष^{प-१} \text{ आणि } (क+म)\cdot\frac{क+म-१}{२}\cdots\frac{क+म-प+२}{प-१}\,क्ष^{प-१}$$

यांचें प्रमाण याप्रमाणें आहे,

$$\frac{क+म}{क}\cdot\frac{क+म-१}{क-१}\cdots\frac{क+म-प+२}{क-प+२}$$

यांत म इच्छेप्रमाणें लहान घेतला जाईल, तर स्पष्ट आहे, कीं वरचे प्रत्येक गुण्यगुणक इच्छेप्रमाणें एकमाचे हवे तेवढे जवळ केले जातील, आणि, यामुळें, त्यांचा गुणाकार इच्छेप्रमाणें एकमाचे हवा तेवढा जवळ केला जाईल. ह्मणजे कांहीं **दिलेल्या** पदांचे संख्येविषयीं, दोन अवळजवळ-

चे पदांची किंमत इच्छेप्रमाणें जवळजवळ करितां येईल. आतां क्ष हा १ पेक्षां कमी आहे अशी कल्पना कर, ह्मणून अशानें ३४१ पृष्ठाप्रमाणें दोन जवळच्या श्रेण्या उतरल्या आहेत. यावरून, क पदें घेतलीं जातील, कीं त्यांचे पुढील राहिल्ये पदांचे बेरीजेची नियतता इच्छेप्रमाणें हवी तेवढी लहान होईल: आणि म इतका लहान घेतां येतो, कीं एक जवळचे श्रेणीचीं सर्व क पदें दुसऱ्ये जवळचे श्रेणीचें क पदांचे दशलक्षांशाचे आंत इतक्या अंतरानें जवळ होतील; यावरून ह्या जवळजवळच्या श्रेण्या या पुढील रूपानें मांडिल्या जातील:

अ+ब+क+..............+ज......+ $\left\{\right.$ पूर्वींचे पदांचे बेरिजेचे दशलक्षांशाहून कमी अशीं पुढील राहिलेलीं पदें.

अ(१+श)+ब(१+घ)+....+ज(१+ष)+ $\left\{\right.$ पूर्वींचे पदांचे बेरिजेचे दशलक्षांशाहून कमी अशीं पुढील राहिलेलीं पदें.

यांत श, घ, ..., ष, हे प्रत्येक निरनिराळे दशलक्षांशापेक्षां कमी आहेत. अ+ब+क....+ज हीस, पहिल्ये जवळचे श्रेणीचे जवळची आहे असें ह्मण, आणि ती दाखवायासाठीं प घे; तर अश+बघ+....जष ही प-चे दशलक्षांशापेक्षां कमी आहे, आणि पहिली जवळची श्रेणी पूर्णरूपानें मांडिली असतां याप्रमाणें होईल

प+क्षप यांत क्ष दशलक्षांशापेक्षां कमी आहे,

दुसरी जवळची श्रेणी पूर्णरूपानें मांडिली असतां याप्रमाणें होईल

प(१+वि)+यप(१+वि) यांत वि आणि य प्रत्येक दशलक्षांशापेक्षां कमी आहेत.

यांची वजाबाकी याप्रमाणें आहे,

$$\text{पवि}+\text{प}(\text{य}-\text{क्ष})+\text{पयवि}.$$

ही वजाबाकी प चे **तीन** दशलक्षांशांपेक्षां कमी आहे; कांकीं **वि, य—क्ष, यवि,** हीं निरनिराळीं **प** चे दशलक्षांशापेक्षां कमी आहेत. परंतु $(१+क्ष)^{\sqrt{२}}$ याची नियतता वरचे दोन श्रेण्यांचे मध्यें असावी, आणि यामुळें त्या दोन जवळचे श्रेण्याचें अंतर **प** चे तीन दशलक्षांश आहे, इतकें पचें आणि त्या नियततेचें अंतर नाहीं.

जेव्हां १ पेक्षां क्ष अधिक किंवा श्रेणी चढती आहे, तेव्हां या पक्षीं वरचेरीती प्रमाणें तसेंच उत्तर दाखवायास अशक्य आहे: परंतु लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं या पक्षांत केवळ **बीजगणितरूप** बरोबरीची प्रतिज्ञा सांगितली, परंतु **अंकगणितरूपाची नाहीं**: आणि जें वर लिहिलें तें हेंच आहे, कीं

$$१+\sqrt{२}क्ष+\sqrt{२}\,\frac{\sqrt{२}-१}{२}\,क्ष^{२}+ इत्यादि$$

ही पद्धती, चुकीवांचून $(१+क्ष)^{\sqrt{२}}$ याचेआगीं मांडिली जाईल; म्हणून **३४३ ३४४ पृष्ठांवरील** मूळकारणापासून जी सामान्य सिद्धता काढिली तींत या पक्षाची सिद्धता आहे. जेव्हां श्रेणी उतरती आहे, तेव्हां वरची कृती **अंकगणितरूपाचे** बरोबरीचा जवळपणा दाखविल्ये.

इच्छे प्रमाणें जवळ जवळ होण्याविषयीं, कोणत्येही दुसऱ्ये पक्षास वरची गोष्ट लागू होईल. आतां द्वियुक्पदसिद्धांताचे कांहीं अधिक परिणाम सांगतों.

# बारावा अध्याय.

## घातप्रकाशकांची आणि लाग्रतमाची श्रेणी यांविषयीं.

जसजसें, बीजगणितरूपाचें चिन्ह दुसऱ्ये निरनिराळ्ये चिन्हाशीं किंवा चिन्हांचे एकीकरणाशीं संबंध ठेवितें, तशीं त्यास निरनिराळीं नावें असतात. जसें अब, यांत बचे संबंधानें, अ यास **गुणक** ह्मणतात; अबचे संबंधानें अ यास **फाक्टर*** ह्मणतात. तसेंच, $अ^{ब}$ यांत, अचे संबंधानें, ब यास **घातप्रकाशक** ह्मणतात; $अ^{ब}$ याचे संबंधाने, ब यास **लाग्रतम** ह्मणतात, आणि बचे संबंधानें अ यास लाग्रतमाचा **पाया** ह्मणतात.

जसें $३^{४}$, यांत, ३ या पायास, $३^{४}$ अथवा ८१ यांचें लाग्रतम ४ आहे; $अ^{क्ष}$, यांत, अ या पायास $अ^{क्ष}$ याचें लाग्रतम क्ष आहे. हें याप्रमाणें दर्शविलें जाईल, ह्मणजे $४ = लाग_{३}\ ८१$ आणि $क्ष = लाग_{अ}\ अ^{क्ष}$ : यांत लाग ह्मणजे **लाग्रतम** शब्दाचा संक्षेप, आणि खालीं लिहिलेला अंक त्याचा पाया आहे.

**उदाहरणें.** $१०^{३} = १०००$ $\qquad ३ = लाग_{१०}१०००$

जर $अ^{क्ष} = य$ तर $क्ष = लाग_{अ}\ य$

जर $प^{क} = १-ज्ञ$ तर $क = लाग_{प}\ (१-ज्ञ)$

कांहीं दिलेल्या ह्मणजे १० या पायास लाग्रतमाचा एकादा पर्याय करण्यासाठीं, हीं पुढील समीकरणें एकापुढें एक उलगडून, प्रत्येकांतून क्षची किंमत काढिली पाहिजे.

---

* फाक्टर हा इंग्लीश शब्द आहे, ह्मणजे जा दोन पदापासून कांहीं गुणाकार होतो त्या प्रत्येक पदास फाक्टर ह्मणतात, तो गुण्य किंवा गुणक असेल त्याचें समान्य नाम फाक्टर आहे.

$१०^{क्ष} = १$ $१०^{क्ष} = २$ $१०^{क्ष} = ३$ $१०^{क्ष} = ४$ इत्यादि

ही किंमत बहुतकरून, केवळ जवळ जवळ काढितां येईल: ह्मणजे, बहुतकरून एकं मात्रीं लाग्रतम असममान आहे. तेव्हां जर असें ह्मटलें, कीं लाग$_{१०}$ २ = ·३०१०३ आहे, तर अर्थ हान्च, कीं

$१०^{·३०१०३} = २$ अतिजवळ, अथवा $\sqrt[१०००००]{१०^{३०१०३}} = २$ जवळ

जवळ, आणि असा एकादा अपूर्णांक क काढितां येईल, कीं $१०^{क}$ इच्छेप्रमाणें २ यांचे हवा तेवढा जवळ होईल, आणि ·३०१०३ हे त्या अपूर्णांकाचे जवळचे आहेत.

या पुढील सिद्धांतामध्यें एकच पाया कल्पिला आहे, ह्मणजे, तो अ आहे.

१ सिद्धांत. पाया कोणताही असला तरी, १ याचें लाग्रतम० आहे. स्पष्ट आहे, कीं ही गोष्ट $अ^{०} = १$ याची मांडण्याची दुसरी रीति आहे, आणि ती याप्रमाणें मांडिली जाईल, लाग$_{अ}$ १ = ०.

२ सिद्धांत. पायाचें लाग्रतम १ आहे. ही गोष्ट $अ^{१} = अ$, यांत आहे, आणि ती याप्रमाणें दर्शविली आहे: ह्मणजे लाग$_{अ}$ अ = १.

३ सिद्धांत. य आणि $\frac{१}{य}$ यांचीं लाग्रतमे भिन्नचिन्हाचीं असतात, परंतु त्यांची अंकगणितरूपाची किंमत बरोबर असते. कांकीं जर $य = अ^{क्ष}$ अथवा क्ष = लाग$_{अ}$ य, तर याप्रमाणें होतें, $\frac{१}{य} = अ^{-क्ष}$ अथवा −क्ष = लाग$_{अ}$ $\frac{१}{य}$; ह्मणजे, लाग$_{अ}$ $\frac{१}{य}$ = − लाग$_{अ}$ य.

४ सिद्धांत. जर पाया अ आहे, आणि $अ^{म}$ आणि $अ^{न}$ यांमध्यें कोणताही पूर्ण किंवा अपूर्णांक येतो, तर त्या पूर्ण किंवा अपूर्णांकाचें लाग्रतम म आणि न यांमध्यें येतें.

कांकीं जर $अ^{म}$ आणि $अ^{न}$ यांचेमध्यें $अ^{क्ष}$ हा अंक आहे, तर म आणि न यांचेमध्यें क्ष हें लाग्रतम येतें, १७४, १७५ पृष्ठ पहा.

| पाया १० | | पाया $\frac{१}{२}$ | |
|---|---|---|---|
| यांमधील अंकाचें लायतम | यांमध्यें असतें | यांमधील अंकाचें लायतम | यामध्यें असतें |
| १ आणि १० | ० आणि १ | १ आणि $\frac{१}{२}$ | ० आणि १ |
| १० आणि १०० | १ आणि २ | $\frac{१}{२}$ आणि $\frac{१}{४}$ | १ आणि २ |
| १०० आणि १००० | २ आणि ३ | $\frac{१}{४}$ आणि $\frac{१}{८}$ | २ आणि ३ |
| इत्यादि | इत्यादि | इत्यादि | इत्यादि |
| १ आणि $\frac{१}{१०}$ | ० आणि −१ | १ आणि २ | ० आणि −१ |
| $\frac{१}{१०}$ आणि $\frac{१}{१००}$ | −१ आणि −२ | २ आणि ४ | −१ आणि −२ |
| $\frac{१}{१००}$ आणि $\frac{१}{१०००}$ | −२ आणि −३ | ४ आणि ८ | −२ आणि −३ |
| इत्यादि | इत्यादि | इत्यादि | इत्यादि |

५ **सिद्धांत. गुणाकाराचें लायतम त्याचे फाकूटराचे लायतमाचे बेरिजे बरोबर आहे.** अ पाया असेल, आणि **प, क, आणि र,** यांचीं लायतमें प, क, आणि र असतील, तर

$$प = अ^{प} \qquad क = अ^{क} \qquad र = अ^{र}$$

$पकर = अ^{प+क+र}$ अथवा $लाग(पकर) = प+क+र = लाग\ प + लाग\ क + लाग\ र$.

६ **सिद्धांत. प्रमाणाचें, भागाकाराचें, किंवा अपूर्णांकाचें लायतम, अग्रसर आणि उपाग्रसराचें, भाज्य आणि भाजकाचें, किंवा अंश आणि छेद यांचे लायतमाचे वजाबाकी बरोबर आहे.**

कांकीं $\frac{प}{क} = अ^{प-क}$ अथवा $लाग\ \frac{प}{क} = प - क = लाग\ प - लाग\ क$.

७ **सिद्धांत. $प^{म}$ याचें लायतम प चे लायतमास म ने गुणून निघतें;** ह्मणजे, जर $प = अ^{प}$ आहे, तर $प^{म} = अ^{मप}$, अथवा $लाग\ प^{म} = मप = म\ लाग\ प$.

८ सिद्धांत. ऋणअंकास गणितरूपाचें लायतम नाहीं: आणि जो बीजगणिताविषयीं यापूर्वीं विचार झाला त्यांत, ऋणपायाचे लायतमाच्या कांहीं पर्यायही नाहीं. हा सिद्धांत नाहीं, परंतु व्याख्यान आहे, आणि त्याचा सारांश हाच: कीं कांहीं उलटे विषय आहेत, ज्यांचा अर्थ अद्यापि शिकणाराचे समजांत येणार नाहीं, यामुळें ऋणपरिमाणाचे लायतमाचा विचार, आणि ज्या धनपरिमाणाचे लायतमास अंकगणितरूपाचा अर्थ आहे, याशिवाय धनपरिमाणाचे सर्व लायतमाचाही विचार एकीकडे ठेवावा लागतो. कांकीं $अ^{क्ष} = ब$ या समीकरणाचें जरी केवळ एक अंकगणितरूप उत्तर आहे, तरी केवळ एकच उत्तर आहे असें सिद्ध झालें नाहीं.

९ सिद्धांत. ० याचें लायतम अनंत आहे; याचा अर्थ हाच, कीं यचें लायतम नेहेमी १ याचे एक बाजूस किंवा दुसऱ्ये बाजूस ऋण आहे, तर जसजसा य अनियत घटत जातो, तसतसें त्याचें लायतम अंकगणितरूपानें अनियत वाढत जातें. $\left(\frac{१}{२}\right)^{क्ष}$ हें अनियत घटण्यासाठीं, क्ष अंकगणितरूपानें अनियत वाढत जावा आणि तो धनही असावा: आणि $२^{क्ष}$ ऋण आहे, तर त्यास अनियत घटण्यासाठीं क्षलाही अंकगणितरूपाची वाढ अनियत असावी. यावरून २६५ पृष्ठावरचे प्रतिज्ञेचा अर्थ कळून येतो; आणि लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं बीजगणितामध्यें ∞ हें चिन्ह धन किंवा ऋण असते, म्हणून ही गोष्ट या पुढील प्रमाणें दाखविली जाईल. जर $य = \frac{१}{क्ष}$, तर य आणि क्ष यांस सारिखें चिन्ह असावें: जर क्ष अनियत घटत जातो, तर तो ० या रूपाचे जवळ येतो, आणि अशा रूपास कांहीं चिन्ह नाहीं, कांकीं धन आणि ऋण परिमाणाचे मध्यांतील मर्यादा आहे. यामुळें य, हा अनियत वाढत असतां, तशेच मर्यादेचे जवळ होत जातो; कांकीं य आणि $\frac{१}{क्ष}$ याचें चिन्ह सारिखेंच आहे, तर क्षचें कोणतेंही रूप असेल, ज्यास धन किंवा ऋणचिन्ह कल्पिलें जाईल, तर यलाही त्यासारिखेंच चिन्ह कल्पिलें जाईल. परंतु वेगवेगळे उदाहरणापासून जो या गोष्टीचा समज व्हावयाचा तो भूमिती-

हीं बीजगणित लागू करण्याचीं कांहीं अधिक उदाहरणें पाहिल्यावांचून शि-कणारास प्राप्त होणार नाहीं.

वरचे सिद्धांताचे दृष्टांताविषयीं हीं पुढील उदाहरणें सांगतों.

$$क्ष \times १ = क्ष \qquad लाग\ क्ष + लाग\ १ = लाग\ क्ष \qquad (लाग\ १ = ०)$$

$$क्ष^{१} = क्ष \qquad १ \times लाग\ क्ष = लाग\ क्ष$$

$$लाग_{अ}\ अक्ष = लाग_{अ}\ क्ष + लाग_{अ}\ अ = लाग_{अ}\ क्ष + १$$

$$लाग\ क्ष\sqrt{य} = लाग\ क्ष + लाग\ य^{\frac{१}{२}} = लाग\ क्ष + \frac{१}{२}\ लाग\ य$$

$$लाग\ \frac{क्षय^{\frac{१}{२}}}{पक^{२}} = लाग\ क्ष + \frac{१}{२}\ लाग\ य - लाग\ प - २\ लाग\ क$$

$$लाग\left(\frac{क्षय^{३}}{पक^{-१}}\right)^{-१} = -१\ \{लाग\ क्ष + ३\ लाग\ य - लाग\ प - (-१)\ लाग\ क\}$$

$$= -१\ लाग\ क्ष - ३\ लाग\ य + लाग\ प - लाग\ क$$

आतां लाग्रतमाचे संबंधाचे श्रेण्यांचा विचार करितों.

**३४९व्ये पृष्ठावर**, न आणि क्ष यांचे सर्व किंमतीविषयीं हा पुढील सिद्धांत सिद्ध केला आहे,

$$\left\{१+१+\frac{१-\frac{१}{न}}{२}+\frac{१-\frac{१}{न}}{२}\cdot\frac{१-\frac{२}{न}}{३}+इत्यादि\right\}^{क्ष} = १+क्ष+क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}+क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}\cdot\frac{क्ष-\frac{२}{न}}{३}+इ०$$

या दोन श्रेण्या या साधारणरूपाच्या आहेत, ह्मणजे $\left(१+\frac{१}{न}\right)^{क}$, ह्मणून **३४१ व्ये पृष्ठाप्रमाणें** जेव्हां १ पेक्षां $\frac{१}{न}$ कमी आहे, किंवा जेव्हां १ पेक्षां न अधिक आहे, तेव्हां वरच्या दोन श्रेण्या उतरत्या आहेत. आतां मनांत आण, कीं न अनियत वाढत जातो तर या पक्षांत वरच्या श्रेण्यांची नियतता या प्रमाणें होईल, ह्मणजे

$१+१+\frac{१-\frac{२}{न}}{२}+\frac{१-\frac{१}{न}}{२}\cdot\frac{१-\frac{२}{न}}{३}+$ इत्यादि याची नियतता $=१+१+\frac{१}{२}+\frac{१}{२\cdot३}+$ इत्यादि

आणि $१+क्ष+क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}+क्ष\frac{क्ष-\frac{१}{न}}{२}\cdot\frac{क्ष-\frac{२}{न}}{३}+$ इत्यादि याची नियतता $=१+क्ष+\frac{क्ष^{२}}{२}+\frac{क्ष^{३}}{२\cdot३}+$ इ०.

परंतु $१+१+\frac{१}{२}+$ इत्यादि याची जवळची किंमत **३०४ पृष्ठाप्रमाणें** काढिली असतां हीच आहे,

२·७१८२८१८२····, आणि यास e ह्मटलें. यामुळें ३०४ पृष्ठाप्रमाणें,

$$e = १ + क्ष + \frac{क्ष^{२}}{२} + \frac{क्ष^{३}}{२·३} + \text{इत्यादि.}$$

**यामुळें, जर e पाया असेल, तर ज्या अंकाचें लायतम क्ष आहे, तो अंक $१ + क्ष + \frac{क्ष^{२}}{२} +$ इत्यादि हाच आहे.** यावरून, शोधण्याचे क्रमानें, ज्याचा पाया e आहे, असा जो लायतमाचा पर्याय निघाला, त्यास लायतमाचा **स्वाभाविक** पर्याय ह्मणतात; इंग्लिश भाषेंत त्याचीं दुसरीं ही नामें आहेत तीं एथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं.

एथें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे, कीं **बीजगणिताचे पृथक्करणामध्यें, नुसता लाग असा शब्द आला, तर असें समजावें कीं त्या लायतमाचा पाया e आहे, जेव्हां असें नसेल, तेव्हां विशेषें करून सांगीतलें जाईल.**

वरचें समीकरण नेहेमी खरें असतांना, या प्रमाणें होतें

$$e^{कक्ष} = १ + कक्ष + \frac{क^{२}क्ष^{२}}{२} + \frac{क^{३}क्ष^{३}}{२·३} + \text{इत्यादि.}$$

परंतु $e^{कक्ष} = (e^{क})^{क्ष}$; आणि जर e पाया असून अचें लायतम क आहे असें कल्पिलें, तर $e^{क} = अ$, आणि

$$(e^{क})^{क्ष} \text{ अथवा } अ^{क्ष} = १ + (\text{लाग } अ)क्ष + \frac{(\text{लाग}अ)^{२}क्ष^{२}}{२} + \frac{(\text{लाग}अ)^{३}क्ष^{३}}{२·३} + \text{इत्यादि}$$

यापासून हें निघतें, कीं जर क्ष अनियत घटत जातो तर $\frac{अ^{क्ष} - १}{क्ष}$ याची नियतता लागअ होईल.

परंतु अशी नियततेची श्रेणी पूर्वी **३४९ पृष्ठावर** मिळाली; यावरून

$$\text{लाग } अ = (अ - १) - \frac{१}{२}(अ - १)^{२} + \frac{१}{३}(अ - १)^{३} - \text{इत्यादि}$$

अथवा, जर अ = १ + ब, तर या प्रमाणें होईल

$$\text{लाग}(१ + ब) = ब - \frac{ब^{२}}{२} + \frac{ब^{३}}{३} - \text{इत्यादि} \cdots\cdots\cdots\cdots (१)$$

बचे जागीं −ब मांड, तर या प्रमाणें होईल

$$\text{लाग}(१ - ब) = -ब - \frac{ब^{२}}{२} - \frac{ब^{३}}{३} - \text{इत्यादि} \cdots\cdots\cdots\cdots (२)$$

वरचे पहिल्या श्रेणींतून दुसरी वजा कर, तर

$$\text{लाग}(१+\text{ब}) - \text{लाग}(१-\text{ब}) = \text{लाग}\left(\frac{१+\text{ब}}{१-\text{ब}}\right)$$

$$\text{लाग}\left(\frac{१+\text{ब}}{१-\text{ब}}\right) = २\left\{\text{ब} + \frac{\text{ब}^{३}}{३} + \frac{\text{ब}^{५}}{५} + \text{इत्यादि}\right\} \cdots\cdots\cdots (३)$$

$\frac{१+\text{ब}}{१-\text{ब}} = \frac{१+\text{क्ष}}{\text{क्ष}}$ असें घे, तर $\text{ब} = \frac{१}{२\text{क्ष}+१}$

$$\text{लाग}\,\frac{१+\text{ब}}{१-\text{ब}} = \text{लाग}\,\frac{१+\text{क्ष}}{\text{क्ष}} = \text{लाग}(१+\text{क्ष}) - \text{लाग}\,\text{क्ष}$$

$$\text{लाग}(\text{क्ष}+१) - \text{लाग}\,\text{क्ष} = २\left\{\frac{१}{२\text{क्ष}+१} + \frac{१}{३}\cdot\frac{१}{(२\text{क्ष}+१)^{३}} + \frac{१}{५}\cdot\frac{१}{(२\text{क्ष}+१)^{५}} + \text{इत्यादि}\right\} \cdots (४)$$

या शेवटील श्रेणीपासून याप्रमाणें होतें

$$\text{क्ष} = १,\ \text{लाग}\ २ = २\left\{\frac{१}{३} + \frac{१}{३}\cdot\frac{१}{२७} + \frac{१}{५}\cdot\frac{१}{२४३} + \text{इत्यादि}\right\}$$

$$\text{क्ष} = २,\ \text{लाग}\ ३ = \text{लाग}\ २ + २\left\{\frac{१}{५} + \frac{१}{३}\cdot\frac{१}{१२५} + \frac{१}{५}\cdot\frac{१}{३१२५} + \text{इत्यादि}\right\}$$

$$\text{क्ष} = ३,\ \text{लाग}\ ४ = \text{लाग}\ ३ + २\left\{\frac{१}{७} + \frac{१}{३}\cdot\frac{१}{३४३} + \frac{१}{५}\cdot\frac{१}{१६८०७} + \text{इत्यादि}\right\}$$

$$\text{क्ष} = ४,\ \text{लाग}\ ५ = \text{लाग}\ ४ + २\left\{\frac{१}{९} + \frac{१}{३}\cdot\frac{१}{७२९} + \frac{१}{५}\cdot\frac{१}{५९०४९} + \text{इत्यादि}\right\}$$

वरप्रमाणें पूर्णांकांचीं लायतमें क्रमक्रमानें हवीं तेवढीं जवळजवळ काढिलीं जातील, ह्मणजे ही गोष्ट या पुढील उदाहरणावरून दाखविली जाईल, त्यांत खरेपणाचे जवळजवळ होण्यासाठीं दशांशांचीं स्थळें अकरापर्यंत घेतलीं आहेत.

$$\frac{१}{३} = \cdot ३३३३३३३३३३३$$
$$\frac{१}{३}\cdot\frac{१}{३^{३}} = \cdot ०१२३४५६७९०१$$
$$\frac{१}{५}\cdot\frac{१}{३^{५}} = \cdot ०००८२३०४५२७$$
$$\frac{१}{७}\cdot\frac{१}{३^{७}} = \cdot ००००६५३२१०५$$
$$\frac{१}{९}\cdot\frac{१}{३^{९}} = \cdot ०००००५६४५०३$$
$$\frac{१}{११}\cdot\frac{१}{३^{११}} = \cdot ०००००५१३१८$$
$$\frac{१}{१३}\cdot\frac{१}{३^{१३}} = \cdot ००००००४९२५$$
$$\frac{१}{१५}\cdot\frac{१}{३^{१५}} = \cdot ०००००००४६५$$
$$\frac{१}{१७}\cdot\frac{१}{३^{१७}} = \cdot ००००००००४६$$
$$\frac{१}{१९}\cdot\frac{१}{३^{१९}} = \cdot ०००००००००५$$

$$\cdot ३४६५७३५९०२८$$
$$२$$

$$\text{लाग}\ २ = \cdot ६९३१४७१८०५६ = \text{लाग}\ २\ \text{जवळजवळ}$$

यारीतीनें ३ यांचें लाग्रतम २ यांचें लाग्रतमापासून काढितां येईल, ४ यांचें लाग्रतम ३ यांचे लाग्रतमापासून काढितां येईल. आणि याप्रमाणें पुढें कोणत्येही पूर्णांकाचें लाग्रतम काढितां येईल. शिकणारानें अंकगणिताचे अभ्यासाकरितां १० अंकपावेतों लाग्रतमें काढावीं; असें केल्यानें आठ दशांशस्थळांपावेतों यापुढील प्रमाणें निघतें :

लाग १ = ०·०००००००० लाग ६ = १·७९१७५९४७

लाग २ = ०·६९३१४७१८ लाग ७ = १·९४५९१०१५

लाग ३ = १·०९८६१२२९ लाग ८ = २·०७९४४१५४

लाग ४ = १·३८६२९४३६ लाग ९ = २·१९७२२४५८

लाग ५ = १·६०९४३७९१ लाग १० = २·३०२५८५०९

परंतु केवळ प्रैम अंकांविषयीं वरची श्रेणी कामांत आणण्याची गरज पडेल, आणि आरंभीं जें लाग्रतमाचें कोष्टक तयार झालें तें, यापुढीलाप्रमाणें. ५९, अथवा ५८ + १ यांचें लाग्रतम काढायास इच्छिलें आहे असें मनांत आण. आतां ५८ = २ × २९, ह्मणजे हे दोन फाक्टर प्रैम अंक आहेत; जर, २ आणि २९ यांचें लाग्रतम पूर्वीं सांपडलें आहे, तर ५८ याचें लाग्रतम यापुढील समीकरणापासून निघेल,

$$\text{लाग } ५८ = \text{लाग } २ + \text{लाग } २९$$

आणि ५९ यांचें लाग्रतम या पुढील समीकरणापासून निघेल,

$$\text{लाग } ५९ = \text{लाग } ५८ + २\left\{\frac{१}{११७} + \frac{१}{३}\cdot\frac{१}{(११७)^{३}} + \text{इत्यादि}\right\}$$

आतां लाग २ यापासून आरंभ करून या पुढील प्रमाणें निघतें:

लाग २ = एक दिलेली श्रेणी लाग ६ = लाग ३ + लाग २

लाग ३ = लाग २ + एक दिलेली श्रेणी लाग ७ = लाग ६ + एक दिलेली श्रेणी

लाग ४ = २ लाग २ लाग ८ = ३ लाग २

लाग ५ = लाग ४ + एक दिलेली श्रेणी लाग ९ = २ लाग ३

लाग १० = लाग २ + लाग ५; आणि इत्यादि.

३५० पृष्ठावरून ही पुढील श्रेणी सिद्ध केली ह्मणजे,

$$ज्ञ-१-\frac{१}{२}(ज्ञ-१)^२+\text{इत्यादि}=\frac{१}{म}\left(ज्ञ^म-१-\frac{१}{२}(ज्ञ^म-१)^२+\text{इत्यादि}\right)$$

आतां हें दिसतें, कीं वरची श्रेणी या पुढील सारिखीच आहे,

$$\text{लाग } ज्ञ=\frac{१}{म}\text{ लाग } ज्ञ^म$$

आणि त्या श्रेणीवरून हें पुढील समीकरण अधिक उघड होतें असें दिसतें, ह्मणजे

$$\frac{ज्ञ^म-१}{म}\text{ याची नियतता}=ज्ञ-१-\frac{१}{२}(ज्ञ-१)^२+\text{इत्यादि}=\text{लाग } ज्ञ.$$

म अनियत घटता केला, अथवा म उत्तरोत्तर लहान लहान अपूर्णांक केला, अशी कल्पनेवरून समजांत येतें, कीं ज्ञ चें उत्तरोत्तर अधिक अधिक मोठें मूळ काढावें लागतें. ज्ञ चें पुरतेपणीं मोठें मूळ काढिल्यानें, इच्छेप्रमाणें $ज्ञ^म$ हवा तेवढा १ याजवळ आणला जाईल, अथवा इच्छेप्रमाणें $ज्ञ^म-१$ हवा तेवढा लहान केला जाईल; ह्मणजे ३०९ पृष्ठाप्रमाणें $ज्ञ^म-१$ इच्छेप्रमाणें सगळ्ये श्रेणीचे सर्वधना बरोबर हवा तितका जवळ जवळ केला जाईल. या मूळकारणाचे आधारावरून, आणि ज्ञ चें वर्गमूळ वारंवार काढिल्यानें लाग्रतमाचें कोष्टक पूर्वकाळीं या पुढील सारणीचे सहाय्यानें करीत असत,

$$\text{लाग } ज्ञ=\left(ज्ञ^{\frac{१}{१४०७३७४८८३५५३२८}}-१\right)\times १४०७३७४८८३५५३२८$$

फार जवळजवळ, जो अंक घेतला तो $२^{४७}$ होता, ह्मणजे हा ४७ वेळा वर्गमूळ काढिल्याचे बरोबर आहे.

पूर्वीप्रमाणें एकाद्ये पूर्णांकाचें लाग्रतम काढिल्यानंतर, अंशाचे लाग्रतमांतून छेदाचें लाग्रतम वजा केल्यानें, अपूर्णांकाचें लाग्रतम काढितां येईल.

ही पुढील गोष्ट सांगीतली पाहिजे: जेव्हां क्ष मोठा अंक आहे तेव्हां,

$$\text{लाग}(क्ष+१)=\text{लाग } क्ष+\frac{२}{२क्ष+१}$$ जवळ जवळ ३६० पृष्ठ पहा.

याविषयाविषयीं जें सांगण्याचें बाकी राहिलें, तें पुढील अध्याय पर्यंत ठेविलें जाईल. आतां तर वरचे श्रेणीचे कांहीं उपयोग दाखविले जातील.

**उप्मा.** जर फ(क्ष) हा क्षचें असें फङ्‌शन असेल, कीं फ(क्ष+य) याचा या पुढील श्रेणीचे रूपांत विस्तार केला जाईल, ह्मणजे

$$अ_{०} + अ_{१}य + अ_{२}य^{२} + इत्यादि$$

यांत जर **$अ_{०}$, $अ_{१}$**, इत्यादि हीं **केवळ** क्षचीं फङ्‌शनें असतील, तर

$$फ(अ+ब\sqrt{-१})+फ(अ-ब\sqrt{-१})$$

**याशीं नुसतें साधारण रीतीनें काम केलें असतां,** ही पद्धती नेहेमी धन किंवा ऋण परिमाणांची दर्शक होईल, ह्मणजे, जीं परिमाणें केवळ चिन्हरूप अथवा **अशक्य रूपाचीं** आहेत तीं सर्व नाहींशीं होतील; परंतु दुसऱ्या पक्षीं

$$फ(अ+ब\sqrt{-१})-फ(अ-ब\sqrt{-१})$$

ही या रूपाची होईल, ह्मणजे, एक शक्य परिमाण $\times\sqrt{-१}$.

यचें चिन्ह बदल करून पहिल्यानें फ(क्ष+य) याची किंमत मांड, आणि नंतर फ(क्ष−य) याची किंमत मांड;

$$फ(क्ष+य) = अ_{०} + अ_{१}य + अ_{२}य^{२} + अ_{३}य^{३} + इत्यादि$$

$$फ(क्ष-य) = अ_{०} - अ_{१}य + अ_{२}य^{२} - अ_{३}य^{३} + इत्यादि$$

यापासून,

$$फ(क्ष+य)+फ(क्ष-य) = २अ_{०} + २अ_{२}य^{२} + २अ_{४}य^{४} + इत्यादि$$

$$फ(क्ष-य)-फ(क्ष-य) = २अ_{१}य + २अ_{३}य^{३} + २अ_{५}य^{५} + इत्यादि$$

क्षचेजागीं अ मांड, तर $अ_{०}$, $अ_{१}$, इत्यादि हीं केवळ अचीं फङ्‌शनें होतात; यचेजागीं $ब\sqrt{-१}$ मांड, ह्मणजे मनांत आण, कीं

| | |
|---|---|
| $य = ब\sqrt{-१}$ | $य^{५} = ब^{५}\sqrt{-१}$ |
| $य^{२} = ब^{२}\times-१ = -ब^{२}$ | $य^{६} = -ब^{६}$ |
| $य^{३} = -ब^{२}\times ब\sqrt{-१} = -ब^{३}\sqrt{-१}$ | $य^{७} = -ब^{७}\sqrt{-१}$ |
| $य^{४} = -ब^{३}\sqrt{-१}\times ब\sqrt{-१}$ | $य^{८} = ब^{८}$ इत्यादि |
| $= -ब^{४}\times-१ = ब^{४}$ | |

यावरून,

$$फ(अ+ब\sqrt{-१})+फ(अ-ब\sqrt{-१})=२अ_{०}-२अ_{२}ब^{२}+२अ_{४}ब^{४}-इत्यादि$$

हें शक्य परिमाण आहे: आणि

$$फ(अ+ब\sqrt{-१})-फ(अ-ब\sqrt{-१})=२अ_{१}ब\sqrt{-१}-२अ_{३}ब^{३}\sqrt{-१}+इत्यादि$$

$$=\{२अ_{१}ब-२अ_{३}ब+इत्यादि\}\sqrt{-१}$$

हें शक्यरूप परिमाण $\times \sqrt{-१}$ आहे.

**उदाहरणें.** $$\frac{१}{अ+ब\sqrt{-१}}+\frac{१}{अ-ब\sqrt{-१}}=\frac{२अ}{अ^{२}+ब^{२}}$$

$$\frac{१}{अ+ब\sqrt{-१}}-\frac{१}{अ-ब\sqrt{-१}}=-\frac{२ब}{अ^{२}+ब^{२}}\sqrt{-१}$$

$$(अ+ब\sqrt{-१})^{न}+(अ-ब\sqrt{-१})^{न}=२अ^{न}-२न\frac{न-१}{२}अ^{न-२}ब^{२}+इत्यादि$$

$$(अ+ब\sqrt{-१})^{न}-(अ-ब\sqrt{-१})^{न}=(२नअ^{न-१}ब-२न\frac{न-१}{२}.\frac{न-२}{३}अ^{न-३}ब^{३}+इत्या०)\sqrt{-१}$$

अचे सर्व किमतीविषयीं वरचा सिद्धांत खरा आहे, यामुळें जेव्हां $अ=०$ तेव्हांही खरा आहे; ह्मणजे, या पुढील विषयीं

$$फ(ब\sqrt{-१})+फ(-ब\sqrt{-१})\ आणि\ फ(ब\sqrt{-१})-फ(-ब\sqrt{-१}).$$

**उदाहरणें.** न धन पूर्णांक आहे असें मनांत घे; तर

$$(ब\sqrt{-१})^{न}+(-ब\sqrt{-१})^{न}=\begin{cases}+२ब^{न}, जेव्हां\ न\ समतेने\ सम^{*}\ आहे.\\ ०, जेव्हां\ न\ विषम\ आहे.\\ -२ब^{न}, जेव्हां\ न\ विषमतेने\ सम^{\dagger}\ आहे.\end{cases}$$

$$(ब\sqrt{-१})^{न}-(-ब\sqrt{-१})^{न}=\begin{cases}०, जेव्हां\ न\ सम\ आहे.\\ २ब^{न}\sqrt{-१}, जेव्हां\ न\ १,५,९,\ इत्यादि\ आहे.\\ -२ब^{न}\sqrt{-१}, जेव्हां\ न\ ३,७,११,\ इत्यादि\ आहे.\end{cases}$$

---

* समतेने सम अंक ह्मणजे, जो ४ यांणीं भागिला जातो; जसें ४,८,१२, इत्यादि हे समतेने सम आहेत.

† विषमतेने सम अंक ह्मणजे, जो २ यांणी भागिला जातो, परंतु ४ यांणें भागिला जात नाहीं; जसा २,६,१०, इत्यादि.

$e^{क्ष\sqrt{-1}}$ आणि $e^{-क्ष\sqrt{-1}}$ यांस जर वरची कृती लागू केली, तर याप्रमाणें निघेल

$$e^{क्ष\sqrt{-1}} = 1 + क्ष\sqrt{-1} - \frac{क्ष^2}{2} - \frac{क्ष^3}{2\cdot3}\sqrt{-1} + \frac{क्ष^4}{2\cdot3\cdot4} + \text{इत्यादि}$$

$$e^{-क्ष\sqrt{-1}} = 1 - क्ष\sqrt{-1} - \frac{क्ष^2}{2} + \frac{क्ष^3}{2\cdot3}\sqrt{-1} + \frac{क्ष^4}{2\cdot3\cdot4} - \text{इत्यादि}$$

$$\frac{e^{क्ष\sqrt{-1}} + e^{-क्ष\sqrt{-1}}}{2} = 1 - \frac{क्ष^2}{2} + \frac{क्ष^4}{2\cdot3\cdot4} - \frac{क्ष^6}{2\cdot3\cdot4\cdot5\cdot6} + \text{इत्यादि} \cdots\cdots (ञ)$$

$$\frac{e^{क्ष\sqrt{-1}} - e^{-क्ष\sqrt{-1}}}{2\sqrt{-1}} = क्ष - \frac{क्ष^3}{2\cdot3} + \frac{क्ष^5}{2\cdot3\cdot4\cdot5} - \text{इत्यादि} \cdots\cdots (घ)$$

यापूर्वी या पुस्तकांत $\sqrt{-1}$ असें चिन्ह कामांत आणण्याची योग्यता, केवळ अनुभवावर ठेविली, २०४ **पृष्ठ पहा**; कोठपर्यंत खरीं उत्तरें निघतील हें पहाण्या करितां उलगडण्याचे लांब क्रमाचें उत्तर शोधायाचा आतां प्रसंग आला आहे. वरचे (ञ) आणि (घ) समीकरणाचा दोनही बाजूमध्यें बरोबरीचें बीजगणितरूप चिन्ह मांडिलें आहे; तर हेंच विचारायाचें आहे, कीं जे संबंध **पहिल्ये** दोन बाजूंत आहेत, तेच संबंध त्यांचे **दुसऱ्ये** बाजूंत असतील कीं नाहीं ?

म्हणजे $\quad = \dfrac{e^{क्ष\sqrt{-1}} + e^{-क्ष\sqrt{-1}}}{2}$ यास $\varphi$ क्ष म्हण

आणि $\quad \dfrac{e^{क्ष\sqrt{-1}} - e^{-क्ष\sqrt{-1}}}{2\sqrt{-1}}$ यास $\psi$ क्ष म्हण

तर यावरून याप्रमाणें होतें

$$(\varphi क्ष)^2 = \frac{e^{2क्ष\sqrt{-1}} + 2e^{क्ष\sqrt{-1}}e^{-क्ष\sqrt{-1}} + e^{-2क्ष\sqrt{-1}}}{4}$$

$$(\psi क्ष)^2 = \frac{e^{2क्ष\sqrt{-1}} - 2e^{क्ष\sqrt{-1}}e^{-क्ष\sqrt{-1}} + e^{-2क्ष\sqrt{-1}}}{-4}$$

$$(\varphi क्ष)^2 + (\psi क्ष)^2 = \frac{4e^{क्ष\sqrt{-1} - क्ष\sqrt{-1}}}{4} = e^0 = 1$$

$$(\varphi क्ष)^2 - (\psi क्ष)^2 = \frac{e^{2क्ष\sqrt{-1}} + e^{-2क्ष\sqrt{-1}}}{2} = \varphi\, 2क्ष$$

$$\varphi क्ष \times \psi क्ष = \frac{e^{2क्ष\sqrt{-1}} - e^{-2क्ष\sqrt{-1}}}{4\sqrt{-1}} = \frac{1}{2}\psi(2क्ष)$$

तर

$$(\varphi क्ष)^२ + (\psi क्ष)^२ = १ \qquad (\varphi क्ष)^२ - (\psi क्ष)^२ = \varphi(२क्ष)$$

$$२\varphi क्ष \times \psi क्ष = \psi(२क्ष)$$

या तीन संबंधांविषयीं हेंच विचारायाचें आहे, कीं (ञ) आणि (घ) या समीकरणाच्या दुसऱ्या बाजूंविषयीं हे संबंध खरे आहेत कीं नाहींत ?

कोणतीही श्रेणी तिणें तीच गुणायाची असेल, तर तिचा गुणाकार या पुढील रीतीवरून निघेल : प्रत्येक पदाचा वर्ग कर, आणि त्याचे पुढील सर्व पदें त्याच पदाचे दुपटीनें गुण. ह्मणजे (ञ) या श्रेणीचा वर्ग या प्रमाणें आहे.

$$\begin{aligned} &१ - क्ष^२ + \frac{क्ष^४}{३·४} - \frac{क्ष^६}{३·४·५·६} + इत्यादि \\ &\qquad + \frac{क्ष^४}{२} - \frac{क्ष^६}{२·३·४} + इत्यादि \\ &\qquad\qquad + इत्यादि \end{aligned}$$

(घ) या श्रेणीचा वर्ग या प्रमाणें आहे

$$\begin{aligned} &क्ष^२ - \frac{क्ष^४}{३} + \frac{क्ष^६}{३·४·५} - इत्यादि \\ &\qquad + \frac{क्ष^६}{२·३} - इत्यादि \\ &\qquad\qquad - इत्यादि. \end{aligned}$$

यांत पहिला वर्ग दुसऱ्यानें अधिक केला असतां, या प्रमाणें होईल,

$$१ + \left\{\frac{१}{३·४} + \frac{१}{२} - \frac{१}{३}\right\} क्ष^४ - \left\{\frac{१}{३·४·५·६} + \frac{१}{२·३·४} - \frac{१}{३·४·५} - \frac{१}{२·३}\right\} क्ष^६ + इ०$$

$$= १ + \{०\} \qquad - \{०\} \qquad + इ०$$

आणि पहिल्यांत दुसरा वर्ग वजा केला असतां, या प्रमाणें होईल,

$$१ - २क्ष^२ + \left\{\frac{१}{३·४} + \frac{१}{२} + \frac{१}{३}\right\} क्ष^४ - \left\{\frac{१}{३·४·५·६} + \frac{१}{२·३·४} + \frac{१}{३·४·५} + \frac{१}{२·३}\right\} क्ष^६ + इत्यादि$$

$$= \quad १ - \frac{(२क्ष)^२}{२} + \frac{(२क्ष)^४}{२·३·४} - \frac{(२क्ष)^६}{२·३·४·५·६} + इत्यादि$$

गुणाकारानें याच रीती प्रमाणें तिसरा संबंध ही खरा केला आईल.

(ञ) आणि (घ) या समीकरणाचे पहिल्ये आणि दुसऱ्ये बाजूंविषयीं

तर (छ) आणि (च) ही समीकरणें योग्य होतील;

$$\frac{१}{\sqrt{-१}}\cdot\frac{प-\frac{१}{प}}{प+\frac{१}{प}}=\frac{\psi क्ष}{\phi क्ष}=\chi क्ष \text{ अथवा } \frac{प^{२}-१}{प^{२}+१}=\sqrt{-१}\,\chi क्ष$$

यावरून $$प^{२}=\frac{१+\sqrt{-१}\,\chi क्ष}{१-\sqrt{-१}\,\chi क्ष}$$ ३५९ पृष्ठाप्रमाणें

$$\text{लाग } प^{२}=२\left\{\sqrt{-१}\,\chi क्ष+\tfrac{१}{३}(\sqrt{-१}\,\chi क्ष)^{३}+\text{ इत्यादि}\right\}$$
$$=२\sqrt{-१}\left\{\chi क्ष-\tfrac{१}{३}(\chi क्ष)^{३}+\tfrac{१}{५}(\chi क्ष)^{५}-\text{ इत्यादि}\right\}$$

परंतु $प^{२}=e^{२क्ष\sqrt{-१}}$ अथवा लाग $प^{२}=२क्ष\sqrt{-१}$, यामुळें

$$क्ष=\chi क्ष-\tfrac{१}{३}(\chi क्ष)^{३}+\tfrac{१}{५}(\chi क्ष)^{५}-\text{ इत्यादि}.$$

(ञ) आणि (घ) या दोन श्रेण्या नेहेमी उतरत्या आहेत, हें **३०६ आणि ३०७ पृष्ठावरून** सिद्ध केलें जाईल; परंतु क्ष पुरतेपणीं मोठा केल्यानें, कोणतेंही पद तें कितीही लांब असेल, त्यापासून उतरण्याचा आरंभ केला जाईल. ह्मणजे, जर क्ष = १००० असलें, तर या पुढील लिहिलेल्या पदाचे पूर्वी पहिल्या श्रेणीचे उतरण्याचा आरंभ होणार नाहीं.

$$\frac{क्ष^{२६४}}{२\cdot३\cdot४\cdot५\cdots\cdots२६३\cdot२६४}$$

परंतु लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं पदें अनुक्रमानें धन आणि ऋण आहेत, तरजरी श्रेणीचीं पहिलीं पदें मोठीं आहेत, तथापि $\phi$ क्ष आणि $\psi$ क्ष यांची खरी किंमत १ पेक्षां अधिक कधीं होऊं शकत नाहीं; कांकीं १ हा धन असेल किंवा ऋण असेल, त्यापेक्षां वरचा दोहोंतून एक तरी अंकगणितरूपानें अधिक असला, तर $(\phi क्ष)^{२}+(\psi क्ष)^{२}=१$ हें खरें होण्यास अशक्य.

त्रिकोणमितीमध्यें, वरच्या श्रेण्यांचे गुण या पुढील रीतीनें भूमितिशीं जोडिलेले आहेत. एक वर्तुळ कर;




आणि **अ** बिंदूपासून **ब** बिंदू पुढें चालतो, असा कीं शेवटीं त्याचे चालण्यापासून **ओअ** त्रिज्येचा क्ष वेळांचे लांबीबरोबर कौंस होतो, आणि हवी तर वर्तुळाची पुनः प्रदक्षिणा करावी. **बड** रेघ **कअ** रेघेवर लंब कर; तेव्हां सिद्ध केलें जाईल, कीं **बड** ह्मणजे $\psi$क्ष हा **ओअ** चा अपूर्णांक आहे आणि **ओड** ह्मणजे $\varphi$क्ष हा **ओअ** चा अपूर्णांक आहे.

## अभ्यासाकरितां उदाहरणें.

१. $\dfrac{१+\text{क्ष}}{१+\frac{१}{\text{क्ष}}} = \text{क्ष}$, या समीकरणाचे सहाय्यानें,

हें पुढील समीकरण सिद्ध कर,

$$\text{लाग क्ष} = \text{क्ष} - \frac{१}{\text{क्ष}} - \frac{१}{२}\left(\text{क्ष}^{२} - \frac{१}{\text{क्ष}^{२}}\right) + \frac{१}{३}\left(\text{क्ष}^{३} - \frac{१}{\text{क्ष}^{३}}\right) - \text{इत्यादि}$$

२. हें पुढील सिद्ध कर,

$$e^{\text{क्ष}\sqrt{-१}} = \varphi\text{क्ष} + \sqrt{-१}\,\psi\text{क्ष}$$

$$e^{-\text{क्ष}\sqrt{-१}} = \varphi\text{क्ष} - \sqrt{-१}\,\psi\text{क्ष}$$

$$(\varphi\text{क्ष} + \sqrt{-१}\,\psi\text{क्ष})^{\text{म}} = \varphi(\text{मक्ष}) + \sqrt{-१}\,\psi(\text{मक्ष}).$$

# तेरावा अध्याय.

## गणित कृति सोपी करण्यासाठीं लायतम कामांत आणण्याच्या रीतीविषयीं.

पूर्वीलि अध्यायांमध्यें स्वाभाविक लायतमाचा पर्याय दाखविला, त्यांत अंशाचें लायतमांतून छेदाचें लायतम वजा केल्यानें अपूर्णांकाचें लायतम निघतें, याशिवाय दुसरी कांहीं सोपी रीति नाहीं. आणि तो पर्याय गणितकृति करण्याचें साधन खरें, परंतु त्यांत वर सांगीतलेला कमीपणा आहे. उदाहरण, ·३ यांचें लायतम काढण्याची या पुढील पेक्षां दुसरी कांहीं तोंकडी रीति नाहीं, ह्मणजे

लाग ३ − लाग १० अथवा १·०९८६१२२९ − २·३०२५८५०९ = −१·२०३९७२८०

·३ चें लायतम आणि ·३, ·०३, इत्यादिकांचीं लायतमें यांमध्यें वरपेक्षां कांहीं अधिक स्पष्ट संबंध दिसून येण्याविषयीं दुसरा पर्याय काढितों.

$लाग_{अ}\ क्ष$ याचा **मूळरूप** व्याख्याना पासून हें होतें

$$क्ष = अ^{लाग_{अ} क्ष} \qquad अ = क्ष^{\frac{1}{लाग_{अ} क्ष}}$$

तर याप्रमाणेंहोतें $क्ष = अ^{लाग_{अ} क्ष} = ब^{लाग_{ब} क्ष}$

परंतु $ब = अ^{लाग_{अ} ब}$ $\therefore क्ष = अ^{लाग_{अ} ब\ लाग_{ब} क्ष}$

त्याचसारिखें $क्ष = अ^{लाग_{अ} क\ लाग_{क} ब\ लाग_{ब} क्ष}$

$= अ^{लाग_{अ} इ\ लाग_{इ} क\ लाग_{क} ब\ लाग_{ब} क्ष}$

हें शेवटील उत्तर या पुढील प्रमाणें सिद्ध केलें जाईल :

$$\text{अ}^{\text{लाग}_\text{अ}\text{इ लाग}_\text{इ}\text{क लाग}_\text{क}\text{ब लाग}_\text{ब}\text{क्ष}} = \left\{\text{अ}^{\text{लाग}_\text{अ}\text{इ}}\right\}^{\text{लाग}_\text{इ}\text{क लाग}_\text{क}\text{ब लाग}_\text{ब}\text{क्ष}}$$

$$= \text{इ}^{\text{लाग}_\text{इ}\text{क लाग}_\text{क}\text{ब लाग}_\text{ब}\text{क्ष}} = \text{क}^{\text{लाग}_\text{क}\text{ब लाग}_\text{ब}\text{क्ष}} = \text{ब}^{\text{लाग}_\text{ब}\text{क्ष}} = \text{क्ष}$$

आतां, अ यास एकच अंकगणितरूप घातप्रकाशक लाविला जाईल, जापासून क्ष असें उत्तर निघेल; कांकीं, शक्य असेल तर त्यास दोन घातप्रकाशक प आणि क आहेत असें मनांत आण, आणि $\text{अ}^{\text{प}} = \text{क्ष}$, $\text{अ}^{\text{क}} = \text{क्ष}$ असें घे, यावरून $\text{अ}^{\text{प}} = \text{अ}^{\text{क}}$, आणि $\text{अ}^{\text{प}-\text{क}} = 1$; यामुळें $\text{प} - \text{क} = 0$, अथवा $\text{प} = \text{क}$, ह्मणजे कल्पना केल्या प्रमाणें, प आणि क यांमध्यें कांहीं भेद नाहीं. यावरून,

$$\text{क्ष} = \text{अ}^{\text{लाग}_\text{अ}\text{क्ष}} = \text{अ}^{\text{लाग}_\text{अ}\text{ब लाग}_\text{ब}\text{क्ष}},$$ असें असतां हें पुढील होतें,

$$\text{लाग}_\text{अ}\text{क्ष} = \text{लाग}_\text{अ}\text{ब लाग}_\text{ब}\text{क्ष} = \text{लाग}_\text{अ}\text{क लाग}_\text{क}\text{ब लाग}_\text{ब}\text{क्ष} \text{ इत्यादि},$$

या पुढील एकरूप समीकरणाचे सहाय्यानें हीं वरचीं उत्तरें स्मरणांत रहातील.

$$\frac{\text{क्ष}}{\text{अ}} = \frac{\text{क्ष}}{\text{ब}}\frac{\text{ब}}{\text{अ}} \qquad \frac{\text{क्ष}}{\text{अ}} = \frac{\text{क्ष}}{\text{ब}}\frac{\text{ब}}{\text{क}}\frac{\text{क}}{\text{अ}}$$

यापासून हा पुढील सिद्धांत होतो :

$$\frac{\text{अ}}{\text{ब}} = \frac{\text{अ}}{\text{क}}\frac{\text{क}}{\text{ब}} = \frac{\text{अ}}{\text{इ}}\frac{\text{इ}}{\text{क}}\frac{\text{क}}{\text{ब}} = \frac{\text{अ}}{\text{फ}}\frac{\text{फ}}{\text{इ}}\frac{\text{इ}}{\text{क}}\frac{\text{क}}{\text{ब}} \text{ इत्यादि}$$

**जर प्रत्येक अपूर्णांकाचे जागीं त्याचे छेदाचे पायास त्याचे अंशाचे लाग्रतम घेऊन मांडिलें असतां, वरचे समीकरणाची श्रेणी खरी होईल.**

$\frac{\text{अ}}{\text{ब}}\frac{\text{ब}}{\text{अ}} = \frac{\text{अ}}{\text{अ}}$ याचे सहाय्यानें स्मरणांत रहोतें कीं, $\text{लाग}_\text{ब}\text{अ लाग}_\text{अ}\text{ब} = \text{लाग}_\text{अ}\text{अ} = 1$

अथवा
$$\text{लाग}_\text{अ}\text{ब} = \frac{1}{\text{लाग}_\text{ब}\text{अ}}$$

हेंही होतें

$$\text{लाग}_{\text{ब}}\,\text{क्ष} = \frac{\text{लाग}_{\text{अ}}\,\text{क्ष}}{\text{लाग}_{\text{अ}}\,\text{ब}}$$

**अथवा; जा लाग्रतमाचा पाया अ आहे, अशा कांहीं दिलेल्या पर्यायास दुसऱ्या ब पायाचा पर्यायांत रूपभेद करण्याकरितां, प्रत्येक दिलेल्या लाग्रतमास बचा दिलेल्या लाग्रतमानें भाग.**

व्यवहारांत सर्व अपूर्णांकांस दशांश अपूर्णांकांचें रूप देण्यास सोईस पडतें, तर जो पाया निवडून घेण्यास योग्य आहे, तो असा असावा कीं १०, १००, इत्यादि याचें लाग्रतम पूर्णांक असावें, ह्मणजे तो पाया १० असावा. कांकीं, अशा पक्षांत याप्रमाणें होईल,

$$\text{लाग}\,१० = १,\quad \text{लाग}\,१०० = २,\quad \text{लाग}\,१००० = ३,\ \text{इत्यादि}$$

आणि जर कोणत्याही अंकाचें लाग्रतम दाखविण्यासाठीं प घेतला, ह्मणजे जर तो अंक २५ आहे, तर याप्रमाणें होईल

$$\text{लाग}\ २.५ = \text{लाग}\ २५ - \text{लाग}\ १० = \text{प} - १$$

$$\text{लाग}\ .२५ = \text{लाग}\ २५ - \text{लाग}\ १०० = \text{प} - २$$

$$\text{लाग}\ .०२५ = \text{लाग}\ २५ - \text{लाग}\ १००० = \text{प} - ३\ \text{इत्यादि}$$

$$\text{लाग}\ २५० = \text{लाग}\ २५ + \text{लाग}\ १० = \text{प} + १$$

$$\text{लाग}\ २५०० = \text{लाग}\ २५ + \text{लाग}\ १०० = \text{प} + २\ \text{इत्यादि}$$

तर अशानें, **जेव्हां पाया १० आहे**, तेव्हां अंकांत जर दशांश चिन्हाचा स्थळभेद झाला, तर लाग्रतमाला कांहीं पूर्णांक मात्र मिळवावे किंवा त्यांतून वजा करावे लागतील.

जा लाग्रतमाचे पर्यायाचा पाया १० आहे, तो पर्याय या पुढील समीकरणाचे सहाय्यानें स्वाभाविक पर्यायापासून काढिला आहे,

$$\text{लाग}_{१०}\,\text{क्ष} = \frac{\text{लाग}_{e}\,\text{क्ष}}{\text{लाग}_{e}\,१०} = \frac{\text{लाग}_{e}\,\text{क्ष}}{२.३०२५८५०९} = \text{लाग}_{e}\,\text{क्ष} \times .४३४२९४४८१९.$$

या लाग्रतमाचे पर्यायास साधारण किंवा **कोष्टकरूप** किंवा **दशांशरूप**, अथवा **ब्रिगसाहेबाचा पर्याय** असें ह्मणतात; आणि ·४३४२९···· यांस त्या पर्यायाचा, **माडयूलस** ह्मणतात; आणि सामान्यतः जा पर्यायाचा पाया अ आहे, त्याचा माडयूलस १ ÷ लाग $e$ अ, अथवा लाग$_{अ}$ $e$ आहे.

**या अध्यायांत पुढें जा लाग्रतमाविषयीं विचार होईल, तीं सर्व साधारण लाग्रतमें आहेत असें मनांत ठेवावें.**

सांगीतल्ये अंकाचें लाग्रतम किंवा सांगीतल्ये लाग्रतमापासून अंक कसे काढावे, हें दाखविण्यासाठीं लाग्रतमाचे कांहीं कोष्टकांची रचना दाखवितों.

## १. लालांड साहेबाची रचना.

| अंक | लाग्रतम | बाकी | अंक | लाग्रतम | बाकी |
|---|---|---|---|---|---|
| १०८० | ३·०३३४२४ | | १११० | ३·०४५३२३ | |
| १०८१ | ३·०३३८२६ | ४१ | ११११ | ३·०४५७१४ | ३९ |
| १०८२ | ३·०३४२२७ | ४० | १११२ | ३·०४६१०५ | ३९ |
| १०८३ | ३·०३४६२८ | ४० | १११३ | ३·०४६४९५ | ४० |
| १०८४ | ३·०३५०२९ | ४० | १११४ | ३·०४६८८५ | ३९ |
| इ० | इ० | इ० | इ० | इ० | इ० |

## २. शेर्वीन, हट्टन, बाबेज, या तीन साहेबांची रचना.

| अंक | ० | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | बाकी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५११५० | ७११८०७२ | ८१५७ | ८२४१ | ८३२५ | ८४१० | ८४९४ | ८५७८ | ८६६३ | ८७४७ | ८८३१ | ८४ | |
| १ | ८९१५ | ९००० | ९०८४ | ९१६८ | ९२५३ | ९३३७ | ९४२१ | ९५०६ | ९५९० | ९६७४ | १<br>२ | ८<br>१७ |
| २ | ९७५९ | ९८४३ | ९९२७ | ००११ | ००९६ | ०१८० | ०२६४ | ०३४९ | ०४३३ | ०५१७ | ३<br>४ | २५<br>३४ |
| ३ | ७१२०६०१ | ०६८६ | ०७७० | ०८५४ | ०९३९ | १०२३ | ११०७ | ११९१ | १२७६ | १३६० | ५<br>६<br>७ | ४२<br>५०<br>५९ |
| ४ | १४४४ | १५२८ | १६१३ | १६९७ | १७८१ | १८६५ | १९५० | २०३४ | २११८ | २२०२ | ८<br>९ | ६७<br>७६ |
| इ० | इ० | इ० | इ० | इ० | इ० | इ० | इ० | इ० | इ० | इ० | | |

तां दाखवितों.

१.. एक ऋण लाग्रतम घे.जसें $-३\cdot१६८०४$, हें या पुढील रूपाचें आहे, $-३-\cdot१६८०४$, अथवा $-४+(१-\cdot१६८०४)$, अथवा $-४+\cdot८३१९६$. असें लाग्रतम विशेषें करून याप्रमाणें मांडितात, $\bar{४}\cdot८३१९६$ यांत, चोहों वर जें ऋणचिन्ह मांडिलें तें हें दाखवितें, कीं तो अंक मात्र ऋण आहे. यावरून, $\bar{१}३$ याचा अर्थ $-१०+३$, अथवा $-७$ आहे; $१\bar{३}६$ याचा अर्थ $१०६-३०$ अथवा $७६$ आहे. या रीतीनें, प्रत्येक ऋण लाग्रतमाचा रूपभेद असा केला जाईल, कीं त्याचा दशांश भाग धन होईल.

२. लाग्रतमाचे दशांशाचा जो अंक आहे तो अंक कळल्यावर, सर्व लाग्रतमाचा अंक आहे तो त्वरेनें या पुढील कोष्टकावरून काढिला जाईल.

| | |
|---|---|
| लाग $\frac{१}{१०००}$ अथवा लाग $१०^{-३}=-३$ | लाग १० अथवा लाग $१०^{१}=१$ |
| लाग $\frac{१}{१००}$ अथवा लाग $१०^{-२}=-२$ | लाग १०० अथवा लाग $१०^{२}=२$ |
| लाग $\frac{१}{१०}$ अथवा लाग $१०^{-१}=-१$ | लाग १००० अथवा लाग $१०^{३}=३$ |

असें, $\cdot३०१०३$ या लाग्रतमाचा अंक जवळजवळ २ आहे; म्हणजे, $\cdot३०१०३=$ लाग २: यामुळें, $१\cdot३०१०३=$ लाग १० + लाग २ = लाग २०, $\bar{१}\cdot३०१०३=$ लाग $\frac{१}{१०}$ + लाग २ = लाग $\frac{२}{१०}$ = लाग $\cdot२$, आणि याप्रमाणें पुढेंही.

जर एकंमापेक्षां कमी, कांहीं दशांश अपूर्णांक असेल, आणि त्यास दाखविण्यासाठीं ड घेतला, तर ३५६ पृष्ठावरून हें कोष्टक होतें

| याखालीं सांगतल्या अंका मधील अंकाचें लाग्रतम | या खालच्या अंकां- मध्यें असावें. | आणि यामुळें तो अंक या खालचे रूपाचा असावा. | अशी अंकाचीं उदा हरणें. |
|---|---|---|---|
| $\frac{१}{१०००}$ आणि $\frac{१}{१००}$ | −३ आणि −२ | −३ + ड | ·००१३, ·००९८ |
| $\frac{१}{१००}$ आणि $\frac{१}{१०}$ | −२ आणि −१ | −२ + ड | ·०१४, ·०७३८ |
| $\frac{१}{१०}$ आणि १ | −१ आणि ० | −१ + ड | ·१०३, ·४२९६ |
| १ आणि १० | ० आणि १ | ० + ड | २·५६, ७·९९ |
| १० आणि १०० | १ आणि २ | १ + ड | ११·०३, ४५·९६ |
| १०० आणि १००० | २ आणि ३ | २ + ड | १५९, १५९·१०८ |
| इ० | इ० | इ० | इ० |

**व्याख्यान.** साधारण लाग्रतमाचा पूर्ण भाग, तो धन असो किंवा ऋण असो, त्यास त्या लाग्रतमाचा **गुणप्रकाशक** ह्मणतात; आणि त्याचा दशांश भागास **मान्‌टिस्सा** ह्मणतात. जें पूर्वीं सांगीतलें त्यापासून जे सिद्धांत स्पष्ट निघतात, त्यांतून कांहीं सांगतों.

१. (जा लाग्रतमांत ० सुद्धां पूर्णांक येतो) त्यांत दशांश चिन्हाचे स्थळाचा कसाही भेद केल्यानें लाग्रतमाचा **मान्‌टिस्सा** मध्यें कांहीं भेद होत नाहीं, परंतु त्याचे **गुणप्रकाशकां** मध्यें मात्र भेद होतो.

२. जेव्हां अंकाचे दशांश चिन्हाचे **पूर्वीं** अर्थरूप अंक **येतात**, तेव्हां लाग्रतमाचा गुणप्रकाशक, **धन** आहे, आणि तो **त्या अंकस्थळांचे संख्येंत एक एकं कमी इतका असतो.** जसें, १२३४५·६७ यांचें लाग्रतम ४+ **मान्‌टिस्सा** आहे; ६·९ यांचें लाग्रतम ०+ **मान्‌टिस्सा** आहे.

३. जेव्हां दशांश चिन्हाचे पूर्वीं अर्थरूप अंक **येत नाहींत**, तेव्हां लाग्रतमाचा गुणप्रकाशक **ऋण** आहे, आणि पहिल्ये अर्थरूप अंकाचे पूर्वीं जितकी ० स्थळांची संख्या येल्ये, त्यापेक्षां **एक अधिक** इतका गुणप्रकाशक असतो. जसें, ·०००८३ यांचें लाग्रतम −४+ **मान्‌टिस्सा**

त्या कोष्टकांतून १·०८१ यांचें लाग्रतम काढायाचें असेल, तर ·०३३८३ हा मानृटिस्सा मात्र काढावा, आणि त्याला ० प्रकाशक जोडावा. असें, १·०८१ यांचें लाग्रतम ०·०३३८३ आहे, आणि वर सांगीतल्ये रीतीवरून हा पुढील कोष्टक होतो :

| | | | |
|---|---|---|---|
| लाग १०८१००० | = ६·०३३८३ | लाग १·०८१ | = ०·०३३८३ |
| लाग १०८१०० | = ५·०३३८३ | लाग ·१०८१ | = १̄·०३३८३ |
| लाग १०८१० | = ४·०३३८३ | लाग ·०१०८१ | = २̄·०३३८३ |
| लाग १०८१ | = ३·०३३८३ | लाग ·००१०८१ | = ३̄·०३३८३ |
| लाग १०८·१ | = २·०३३८३ | लाग ·०००१०८१ | = ४̄·०३३८३ |
| लाग १०·८१ | = १·०३३८३ | लाग ·००००१०८१ | = ५̄·०३३८३ |

दुसरे कोष्टकांत ५ अंकस्थळाचे अंकांचीं लाग्रतमें आहेत. पहिल्ये कोष्टकांतून ५१५३ आणि ५१५४, अथवा ५१५३० आणि ५१५४० यांचींही लाग्रतमें काढितां येतील; कां कीं त्यांत केवळ गुणप्रकाशकाचा मात्र भेद आहे; परंतु या दोन शेवरील अंकामध्यें जे अंक येतात त्यांचीं लाग्रतमें ह्मणजे ५१५३१, ५१५३२, .... ५१५३९ यांचीं सगळीं लाग्रतमें दुसऱ्ये कोष्टकांतून काढितां येतील.

आतां लक्षांत आणिलें पाहिजे, कीं जेव्हां एकाद्ये अंकसंख्येमध्यें एक अंक बदल होतो, तेव्हां लाग्रतमांतील जो पहिल्यानें अंक बदल होतो तो अंक संख्येतील बदललेल्ये अंकाप्रमाणें डाव्येकडे जवळ किंवा दूर जाईल. ही गोष्ट या ह्मणण्याप्रमाणें आहे, कीं सर्व अंकाचे प्रमाणाशीं जितका अंकाचा फेर लहान आहे, तितका लाग्रतमांमध्यें फेर लहान होईल, आणि

ही गोष्ट या पुढील सिद्धांतावरून दाखविली जाईल. ३६० आणि ३७२ पृष्ठांवरून १+क्ष यांचें साधारण लाग्रतम (म = ·४३४२९····) हे घेउन,

लाग १+क्ष = लाग क्ष+२म $\left(\frac{१}{२क्ष+१} + \frac{१}{३}\cdot\frac{१}{(२क्ष+१)^३} + \text{इत्यादि}\right)$ आहे, यामुळें लाग १+क्ष होण्यासाठीं जें कांहीं लाग क्ष मध्यें मिळवावें लागतें, तें जसजसा क्ष मोठा होत जातो, तसें तें मिळवायाचें कमी होतें. ही गोष्ट या पुढील उदाहरणांपासून प्रगट होईल, त्यांत जा अंकाचा बदल होतो, त्यास (′) या चिन्हानें खुणाविला आहे. वेगळे वेगळे अंक आणि त्यांचें लाग्रतम पहिल्यानें मांडिलें आहे, आणि त्याचे उजवे बाजूस पहिल्ये कोष्टकांत फेर केलेल्ये अंकाचे मूळचे सर्व अंक संख्येशीं जें प्रमाण होतें तें मांडिलें आहे; आणि दुसऱ्ये कोष्टकांत एकं मान्त्रा केवढा फेर लाग्रतमामध्यें होतो, तो सुमारानें मांडिला आहे.

| | | मूळचे सर्व अंकाशीं फेराचें प्रमाण. | लाग्रतमांतील खरा फेर. |
|---|---|---|---|
| लाग १′ | = ०·०००००० | | |
| लाग २′ | = ०·३०१०३०० | १ | $\frac{१}{३}$ |
| लाग १०′ | = १·००००००० | | |
| लाग ११′ | = १·०४१३९२७ | $\frac{१}{१०}$ | $\frac{१}{२५}$ |
| लाग १००′ | = २·००००००० | | |
| लाग १०१′ | = २·००४३२१४ | $\frac{१}{१००}$ | $\frac{१}{२५०}$ |
| लाग १०००′ | = ३·००००००० | | |
| लाग १००१′ | = ३·०००४३४१ | $\frac{१}{१०००}$ | $\frac{१}{२५००}$ |
| लाग १००००′ | = ४·००००००० | | |
| लाग १०००१′ | = ४·००००४३४ | $\frac{१}{१००००}$ | $\frac{१}{२५०००}$ |
| लाग १०००००′ | = ५·००००००० | | |
| लाग १००००१′ | = ५·०००००४३ | $\frac{१}{१०००००}$ | $\frac{१}{२५००००}$ |

वाढ $\frac{१}{२०००}$ या अपूर्णांकापेक्षां कमी होईल, आणि याप्रमाणें पुढेंही. याव-रून, कोणत्येही कोष्टकांत लाग्रतमाचीं अंकस्थळें किती काढायाचें अगत्य आहे तें पुरतेपणीं कळलें आईल. ह्मणजे मनांत आण, कीं असा एक कोष्टक करायाचा आहे, ज्यांत १०००० पासून ९९९९९ पर्यंत प्रत्येक पांच स्थळांचा अंक यावा. कोष्टकाचे शेवटीं अंकाचा फेर सुमारानें $\frac{१}{१०००००}$ होतो, आणि यामुळें लाग्रतमाची खरी वाढ $\frac{१}{२५०००००}$, अथवा ·०००००४ आहे. यामुळें लाग्रतमाचीं अंकस्थळें सहा अगत्य असावीं. सहा स्थळांपेक्षां कमीं असलीं, तर फेर दिसून येणार नाहीं;

उदाहरण,

लाग ९९८४६ = ५·९९९३३०७

लाग ९९८४७ = ५·९९९३३५०

या दोन लाग्रतमांमध्यें साहाव्ये स्थळीं मात्र भेद आहे. कोष्टकाचे आरंभीं अंकांची वाढ $\frac{१}{१००००}$ यापेक्षां किंचित अधिक आहे, आणि लाग्रतमाची खरी वाढ ·००००४ जवळजवळ आहे, तेथे पांच अंकस्थळें पुरेशीं होतील. परंतु व्यवहाराचे सोयीसाठीं, सर्व कोष्टकांत अंकस्थळें सारिखींच असलीं पाहिजेत, यामुळें थोडीं तरी साहा अंकस्थळें असावीं. वरचे दुसऱ्ये कोष्टकांत अंकांचीं पांच स्थळें आहेत, आणि त्याचे समोर लाग्रतमाचीं सात स्थळें आहेत. परंतु लाग्रतमाचीं पहिलीं तीन स्थळें कांहीं वेळपावेतों सारिखींच रहातात, यासाठीं, यद्यपि कोष्टकामध्यें फेर पुष्कळ होतो, तथापि जाजागीं फेर होतो, त्याजागीं ते अंक पहिल्या ओळींत मांडिलेले असतात: एणेकरून पुष्कळ जागा वांचल्ये, परंतु तशे रचनेपासून, हीच अ-

[redacted]

डचण होते, कीं लायतमाचे तिसऱ्या अंकाचा फेर ओळीचे प्रारंभींच क्वचित पडतो, तर तिसरा नवा अंक पहिल्यानें दृष्टीस पडे तो पर्यंत मांडिला जात नाहीं. हीं पुढील उदाहरणें जीं दुसऱ्या कोष्टकांतून काढिलीं आहेत, तीं त्या कोष्टकाची रचना आणि ही नवी अडचण, शब्दांनीं सांगीतल्यापेक्षां अधिक चांगली दाखवितील.

| अंकसंख्या. | लायतमाचा मान्‌टिस्सा. | अंकसंख्या. | लायतमाचा मान्‌टिस्सा. |
|---|---|---|---|
| ५१५२० | ·७११ ९७५९ | ५१५२६ | ·७१२ ०२६४* |
| ५१५२१ | ·७११ ९८४३ | ५१५२७ | ·७१२ ०३४९* |
| ५१५२२ | ·७११ ९९२७ | ५१५२८ | ·७१२ ०४३३* |
| ५१५२३ | ·७१२ ००११* | ५१५२९ | ·७१२ ०५१७* |
| ५१५२४ | ·७१२ ००९६* | ५१५३० | ·७१२ ०६०१ |
| ५१५२५ | ·७१२ ०१८०* | ५१५३१ | ·७१२ ०६८६ |

या कोष्टकांत पहाण्यांत येईल, कीं प्रत्येक लायतम आणि त्याचे पूर्वींचें लायतम यांचें अंतर ·००००८३ आहे, किंवा ·००००८४ किंवा ·००००८५ आहे. सारांश, ५१५२० आणि ५१५२० + १० यांचे लायतमाचें अंतर ·०००००८४२ आहे, म्हणजे जशी अंकसंख्या क्रमाने एकएक वाढत जाते, तशी लायतमाची मध्यप्रमाण वाढ ·००००००८४ इतकी होते. यावरून, ५१५२० या अंकाचे जागीं आणि त्याचे अवळचे अंकाचे जागीं हीं पुढील समीकरणें होतात :

लाग (५१५२० + १) = लाग ५१५२० + ·००००००८४

लाग (५१५२० + २) = लाग ५१५२० + ·००००००८४ × २

अथवा जर १० पेक्षां ह अधिक नसेल, तर

लाग (५१५२० + ह) = लाग ५१५२० + ·००००००८४ × ह ....(अ)

---

पहिले तीन अंकांविषयीं खालीं पाहिलें पाहिजे.

अथवा कोष्टकांतील कित्येक लहान भागाविषयीं, जेव्हां अंकसंख्याचीं लाग्रतमें एकएकमाने वाढत जातात, तेव्हां ते अंक जवळजवळ गणित श्रेढी प्रमाणें वाढत जातात. आतां ३५९ आणि ३७२ पृष्ठांवरून

म = ·४३४२९···· असें असून,

$$\text{साधारण लाग}\left(१+\frac{ह}{क्ष}\right) = म\left(\frac{ह}{क्ष} - \frac{१}{२}\left(\frac{ह}{क्ष}\right)^{२} + \frac{१}{३}\left(\frac{ह}{क्ष}\right)^{३} - \text{इत्यादि}\right)$$

$$= म\frac{ह}{क्ष}, \text{ फारजवळ जेव्हां } \frac{क्ष}{ह} \text{ लहान आहे}$$ {३७९ पृष्ठपहा}

अथवा $\text{लाग}(क्ष+ह) = \text{लाग } क्ष + म\frac{ह}{क्ष}$, फारजवळजवळ,

हें समीकरण आणि वरचें (ञ) समीकरण एकरूपाचीं आहेत: यावरून जेव्हां ह = १० आहे त्या पक्षीं जर (ञ) जवळजवळ खरें आहे, तर जेव्हां ह एकमाचा अपूर्णांक आहे, तर (ञ) अगत्य अधिक खरें असावें. यावरून या पक्षांत याप्रमाणें होतें,

$$क्ष = ५१५२० \text{ आणि } \frac{म}{क्ष} \text{ अथवा } \frac{·४३४२९४५}{५१५२०} = ·००००००८४$$

$$\text{लाग } ५१५२०\tfrac{१}{२} = \text{लाग } ५१५२० + ·००००००८४ \times \tfrac{१}{२}$$

$$\text{लाग } ५१५२०·३६ = \text{लाग } ५१५२० + ·००००००८४ \times ·३६$$

कोष्टकांत जी ओळीवर बाकी मांडिली असत्ये, ती या कामासाठीं आहे, कीं जेव्हां साहा किंवा सात स्थळांपर्यंत लाग्रतम काढायाचें इच्छिलें आहे, तेव्हां वरचे समीकरणांत जो गुणाकार करावा लागतो, तो त्वरेनें करितां यावा. त्या ओळींत जवळचे पूर्णांक असे ८४चे दशक आहेत:

असें,

८४ यांचा एक दशक = ८·४, याचे जवळचा पूर्णांक = ८ आहे

८४ यांचे दोन दशक = १६·८ ................ १७ आहे

८४ यांचे तीन दशक = २५·२ ................ २५ आहे

आणि याप्रमाणें पुढेंही. ८४चे दशकांतून एक अंक कापून टाकिल्याने

त्यांचे शतक काढितां येतात, परंतु टाकिलेला अंक ५ अथवा पांचांचेवर असेल, तर बाकीचा अंक एकानें वाढवावा.

जसें,

८४ यांचा एक शतक जवळजवळ = ·८, याचेजवळचा पूर्णांक = १ आहे

८४ यांचे दोन शतक ········· = १·७, याचेजवळचा पूर्णांक = २ आहे

८४ यांचे तीन शतक ········· = २·५, याचेजवळचा पूर्णांक = ३ आहे

आणि याप्रमाणें पुढेंही. यावरून बाक्याची ओळ पहाण्यानें बाकीचे दशक आणि शतक लागलेच कळतात. आतां ३७२ पृष्ठावरचे दुसऱ्ये कोष्टकापासून ५१·५३९४६ यांचें लाग्रतम काढितों.

या अंकसंख्येचा मानूटिस्सा, आणि ५१५३९·४६ यांचे लाग्रतमाचा मानूटिस्सा सारिखाच आहे, आणि

$$\text{लाग} (५१५३९ + ·४६) = \text{लाग } ५१५३९ + ·००००० ८४ \times ·४६$$

$$= \text{लाग } ५१५३९ + ·०००००८४ \left(\frac{४}{१०} + \frac{६}{१००}\right)$$

परंतु

$$·०००००८४\left(\frac{४}{१०} + \frac{६}{१००}\right) = ·००००००१\left(\frac{४}{१०} \times ८४ + \frac{६}{१००} \times ८४\right)$$

$$\text{कोष्टकांतून} \quad = ·००००००१ (३४ + ५)$$

·१, ·०१, ·००१, इत्यादि यांणीं, जर कोणताही पूर्णांक गुणायाचा असेल, तर पूर्णांकाचा एकं स्थळींचा अंक दशांशाचें पहिलें किंवा दुसरें किंवा तिसरें इत्यादिस्थळीं मांडावा लागतो: यावरून हें होतें,

कोष्टकांतून लाग ५१५३९ यांचा मानूटिस्सा ···· = ·७१२१३६०

९ चे पुढें जो ४ अंक येतो, त्याविषयीं मिळवायाचें = ३४

आणि ४ चा पुढें जो ६ अंक येतो ········· = ५

बेरीज = ·७१२१३९९

ही बेरीज ५१५३९·४६ यांचे लाग्रतमाचा मानूटिस्सा आहे, आणि ५१५३९४६ यांचा लाग्रतमाचा मानूटिस्साही तोच आहे; यामुळे,

या शेवटील अंकाला योग्य गुणप्रकाशक लावला असतां, याप्रमाणें होईल

लाग ५१·५३९४६ = १·७१२१३९९

तशीच रीतीवरून, हीं पुढील उदाहरणें निघतात,

| लाग·५१५२७४८ ? | | लाग ५·१५०००८ ? | |
|---|---|---|---|
| लाग·५१५२७ | १·७१२०३४९ | लाग ५·१५०० | ०·७११८०७२ |
| ४ | ३४ | ० | ०० |
| ८ | ७ | ८ | ७ |
| लाग·५१५२७४८ | १·७१२०३९० | लाग ५·१५०००८ | ०·७११८०७९ |

| लाग ५१५२७६८००० ? | | लाग·००००५१५४८९९ | |
|---|---|---|---|
| लाग ५१५२७००००० | ९·७१२०३४९ | लाग·००००५१५४८ | ५·७१२२११८ |
| ६ | ५० | ९ | ७६ |
| ८ | ७ | ९ | ८ |
| लाग ५१५२७६८००० | ९·७१२०४०६ | लाग·००००५१५४८९९ | ५·७१२२२०२ |

या प्रश्नाचें उलटें या पुढील प्रमाणें करितात: मनांत आण, कीं १·७११८३६६ या लाग्रतमाचा बरोबरीची अंकसंख्या कोष्टकांतून काढायाची आहे. गुणप्रकाशक सोडून कोष्टकांतून जो मानूदिस्सा ·७११८३६६ यांचेजवळ असून, त्याहून कमी आहे त्यास शोधून काढिलें. तर दिसण्यांत येतें, कीं तो मानूदिसा ·७११८३२५ हा आहे, याची अंकसंख्या ५१५०३ आहे: यावरून अर्थ अंकांविषयीं इच्छिली अंकसंख्या एकमाचे आंत बाहेर सुमारें ५१५०३ इतकी आहे. तो इच्छिला अंक ५१५०३ + ह असा घे, तर ठाऊक आहे, कीं ह असा घेतला पाहिजे, कीं

लाग (५१५०३ + ह) = ४·७११८३६६

परंतु ३७८ पृष्ठावरून

लाग (५१५०३ + ह) = लाग ५१५०३ + ·००००८४ × ह फारजवळ.

= ४·७११८३२५ + ·००००८४ × ह

यावरून.

$$ह = \frac{४·७११८३६६ - ४·७११८३२५}{·००००००८४} = \frac{·००००००४१}{·००००००८४} = \frac{४१}{८४}$$

आतां, कोष्टकांतल्ये बाकीचे स्थळांत पहाण्यांत येतें, कीं

३४ हे ८४ चे $\frac{४}{१०}$ चे जवळ आहेत,

७६ हे ८४ चे $\frac{८}{१०}$ अथवा,

७ हे ८४ चे $\frac{८}{१००}$ चेजवळ आहेत;

ह्मणून ३४+७ अथवा ४१ हे ८४ चे $\frac{४}{१०} + \frac{८}{१००}$; ह्मणजे $\frac{४१}{८४}$ = ·४८ = ह:
यावरून ५१५०३+ह = ५१५०३·४८ आणि

४·७११८३६६ हें ५१५०३·८४ यांचें लायतम आहे

$\bar{१}$·७११८३६६ हें ·५१५०३८४ यांचें लायतम आहे

परंतु लायतम काढण्याची जी रीति आहे, तिचे उलट कृती केल्यानें व्यवहार कामासाठीं फार सोईस पडतें. आतां कोष्टकाचे दुसऱ्ये भागांतून एक उदाहरण सांगतों.

२१७४८३·६ यांचें लायतम काय आहे.

| | | |
|---|---|---|
| लाग २१७४८ | (*) | ५·३३७४१९३ |
| ३ | | ६० |
| ६ | (†) | १२ |
| लाग २१७४८३६ | = | ५·३३७४२६५ |

५·३३७४२६५ या लायतमाचा बरोबरीची अंकसंख्या काय आहे?

| | |
|---|---|
| | ·३३७४२६५ |
| कोष्टकांत याचेजवळचें लायतम जाची अंकसंख्या २१७४८ | ·३३७४१९३ |
| वजाबाकी | ७२ |

* पद्यांत एकदांच गुणप्रकाशक मांडिला आहे.

† पूर्वीप्रमाणें, एथें ६ चे समोर पाहिलें असतां, १२० दिसतात, त्यांतून एक अंक सोडून देतों.

कोष्टकांत अंतरांचे ओळींत या वजाबाकीचे जवळचा अंक
त्याचे समोर ३ आहेत . . . . . . . . . . . . . . ६०

१२०

बाकीवर ० मांड, कांकीं एक अंक सोडिला होता. यामुळें एक अंक, वर मांडिला पाहिजे*, परंतु तो अंक कोणता हें माहित नाहीं. कोष्टकांत १२० यांचे समोर ६ हा अंक आहे.

यामुळें ५ गुणप्रकाशक आहे म्हणून दशांशचिन्हापूर्वी ६ अंकस्थळें असावीं, तरसांगीतल्ये लाग्रतमाचा बरोबरीचा इच्छिला अंक २१७४०३.६ आहे.

१. कोष्टकांतील बाकीची ओळ एकदां कामांत आणिल्यानंतर, शेवटींजी वजाबाकी येत्ये तिला, एक अंक कशासाठीं जोडिला पाहिजे. २. तो अंक काय आहे हें कशासाठीं समजूं शकत नाहीं. ३. ० खरें होईल असें कशानें घडेल. जरकित्येक लाग्रतमें काढून नंतर प्रत्येकाची उलट कृती केली तर ही गोष्ट शिकणाराचे मनांत अधिक ठसली जाईल. ११५ आणि १२५ जांचें मध्यप्रमाण १२० आहे त्यांचे कोष्टकांतील वजाबाकीचें उत्तर कदाचित वर निघालेले १२ असेल. वरचे कृतीचीं हीं पुढील उदाहरणें आहेत.

२.११८३२१४ आणि १.९६४८३१७ या लाग्रतमांचा अंकसंख्या काय आहेत?

| | | | |
|---|---|---|---|
| | ·११८३२१४ | | ·९६४८३१७ |
| १३१३१ | ·११८२९७८ | ९२२२१ | ·९६४८२९८ |
| | २३६ | | १९ |
| ७ | २३२ | ४ | १९ |
| | ४० | | ० |
| १ | ३३ | | |
| उत्तर. ·०१३१३१७१ | | उत्तर. ९२·२२१४० | |

* याविषयींजें पुढें येईल तें पहा.

$\bar{२}$·९ अशा तऱ्हेचे परिमाणाचे गुणाकार आणि भागाकार शिकणारांस करण्यासाठीं कदाचित येतील. या परिमाणांस ५नीं गुणायाचें असेल, तरजे हातचे येतील ते बीजगणिताचे मिळवणीचे रीतीप्रमाणें ऋणपरिमाणास मिळीव. जसें, ५वेळा ९ हे ४५, यावरचे ५मांडून हातीं ४घे; ५वेळा −२ हे −१० आहेत, आणि ४मिळून −६ होतात, तर $\bar{६}$·५ हें उत्तर आहे. अथवा

$$५(·९-२)=४·५-१०=४-१०+·५=\bar{६}·५$$

$\bar{२}$·९ यांस ५नीं भागायाचें असेल, तर ऋणपद ५नीं भागिलें जाई असें कर, आणि तितक्याने पदाची बाकी वाढवून नीटकर. जसें, $\bar{२}$·९ हे $\bar{५}$+३·९ आहेत, आणि

$$\frac{\bar{२}·९}{५}=\frac{\bar{५}}{५}+\frac{३·९}{५}=\bar{१}+·७८=\bar{१}·७८$$

हीं पुढील कांहीं दुसरीं उदाहरणें आहेत:

$\bar{३}$·४६
८
६) $\overline{२१}$·६८
$\bar{४}$·६१३

$\bar{१}$·४१७
१०
५) $\bar{६}$·१७०
$\bar{२}$·८३४

गुणाकार आणि भागाकार यांविषयीं लायलमें कामांत आणण्याचीं हीं पुढील उदाहरणें देतों. ·५७२९५७८ यांस २०·६२६४८यांणीं गुणिलें असतां, आणि तो गुणाकार ७८५३९८२ यांणीं भागिला असतां, नंतर भागाकाराचा नउ घात केला असतां, आणि त्या घाताचें दश घात मूळ काढिलें असतां, उत्तर काय येईल? अथवा हें पुढील काय होईल,

$$\left\{\frac{\cdot ५७२९५७८ \times २०\cdot ६२६४८}{\cdot ७८५३९८२}\right\}^{\frac{\cdot ९}{१०}}$$

| | | |
|---|---|---|
| लाग ·५७२९५७८ | | १̄·७५८१२२६ |
| लाग २०·६२६४८ | | १·३१४४२५१ |
| | बेरीज | १·०७२५४७७ |
| लाग ·७८५३९८२ | | ६·८९५०८९९ |
| | वजाबाकी | ६̄·१७७४५७८ |
| | | ९ |
| | १० ) | ५̄३̄·५९७१२०२ |
| | | ६̄·७५९७१२० |
| ५·७५०५ | | ·७५९७०५६ |
| | | ६४ |
| ८ | | ६० |
| | | ४० |
| ५ | | ३८ |

उत्तर        ·००००५७५०५८५

शिकणाराने अभ्यासाकरितां या पुढील प्रमाणें समीकरणांची सत्यता दाखवायासाठीं उदाहरणें करावीं, ह्मणजे, असा अ(अ+ब) = अ²+अब, जांत अ आणि ब भलते कांहीं अंक असतील. अ आणि अ+ब यांचीं लाग्रतमें मिळवून त्यापासून अ(अ+ब) यांची किंमत निघाली, आणि त्यापासून अ² आणि अब यांची निराळी किंमत काढावी; आणि जर सगळी कृती शुद्ध केली असेल, तर शेवटील पदांची बेरीज पहिल्या पदाचे बरोबर होईल.

तशेच रीतीनें हीं पुढील समीकरणें कामांत आणिलीं जातील:

$$(अ+ब)(अ-ब) = अ^2 - ब^2$$

$$\sqrt{अब} = \sqrt{अ} \times \sqrt{ब}$$

$$(अब)^{\frac{म}{न}} = अ^{\frac{म}{न}} \times ब^{\frac{म}{न}}.$$

लाघवतमानें चुकीयांचून काम करणें याविषयीं शिकणारा केवळ अभ्यासानें मात्र निपुण होईल, आणि व्यवहारांतील जे सर्व प्रश्न येतात त्यांचीं विस्तार रूप उदाहरणें लाघवतमाविषयींचा बहुतेक पुस्तकांत आहेत.

इतिसमाप्त.

मुंबई

माहे एप्रील सन १८४८

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १२ | दुसर्या | दुसऱ्या |
| ९ | २१ | आकृति | कृति |
| १० | १६ | पेट्यांत | पेटींत |
| १४ | ८ | कुंडळी | कुंडली |
| १५ | १२ | अपेक्षां | वपेक्षां |
| १६ | ९ | कृत्याच्या | कृतीच्या |
| २३ | १९ | पदांपुढें | पदांपूर्वी |
| २७ | ८ ड, ९ अ, १० क, १५ क्ष | पाणी | पाणें |
| ४८ | १२ | $\frac{\text{१अअ+अब}}{\text{अ+ब}}$ | $\frac{\text{२अअ+बब}}{\text{अ+ब}}$ |
| ५० | ५ | वास | तीस |
| ५६ | ५ | ११ | ११ष्ट |
| ९२ | २ | प्राविटीचे | प्राविटीचा |
| ९८ | ६ | हें पाशीं | पाशीं |
| १०२ | १९ | होई | होईल |
| १५६ | १० | बिंदु | बिंदू |
| १६० | ११ | वांगली | वांगल्या |
| २२७ | २ | अपचा | अवघ्या |